ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीची ग्रंथमाला

ग्रंथ ४१ वा.

---

श्रीविद्यारण्यस्वामीप्रणीत जीवन्मुक्तिविवेकाच्या आधारानें लिहिलेलें

# जीवन्मुक्तिविवेकसार.

---

सारलेखक,

वे. शा. सं. विष्णु वामन बापट, शास्त्री.

---

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

---

सन १९०९ इ.

---



---

किंमत १२ आणे.



# प्रस्तावना.

**जीवन्मुक्तिविवेकसार** ' हें पुस्तक मी आज माझ्या देशबांधवांस अर्पण करीत आहें. श्रीविद्यारण्यमुनिविरचित जीवन्मुक्तिविवेकाचें सार मीं या ग्रंथांत आणिलें आहे. तेव्हां हें त्या सुंदर ग्रंथाचें शब्दशः भाषांतर नव्हे, हें निराळें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. तरीपण त्या ग्रंथांतील कोणताही मुख्य भाग मीं सोडलेला नाहीं. शिवाय त्यांतील रमणीय अवतरणें मी यांत दिलीं आहेत, एवढें येथें सांगणें अवश्य वाटतें. हा ग्रंथ किती चांगला आहे, हें तो वाचल्यावर वाचकांच्या लक्ष्यांत येईलच.

वैदिकधर्माचे प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन प्रकार आहेत. वेदांतशास्त्र दुसऱ्या प्रकाराचेंच मुख्यतः समर्थन करितें. हा ग्रंथ पंचदशीप्रमाणेंच शुद्ध निवृत्तिमार्गाचें प्रतिपादन करणारा आहे. श्रीविद्यारण्यस्वामींनीं वेदभाष्यें, उपनिषद्दीपिका, पूर्वोत्तरमीमांसा इत्यादि अनेक मान्य ग्रंथ लिहिले आहेत. पण ते सर्वच स्वतंत्र ग्रंथ नाहींत. तर त्यांतील कांहीं टीकाग्रंथ असून कांहीं अगदीं स्वतंत्र आहेत. त्याचप्रमाणें त्यांतील कांहीं प्रवृत्तिधर्मपर व कांहीं निवृत्तिधर्मपर आहेत. पण त्यांच्या स्वतंत्र ग्रंथांत एका जैमिनीयन्यायमाला-विस्तरास सोडून दुसरा कोणताही प्रवृत्तिधर्मपर ग्रंथ आढळत नाहीं. निवृत्ति-धर्मपर ग्रंथांत पंचदशी, जीवन्मुक्तिविवेक, अनुभूतिप्रकाश, सर्वदर्शनसंग्रह, विवरणप्रमेयसंग्रह इत्यादि पुष्कळ स्वतंत्र ग्रंथ असून ते सर्व रमणीय आहेत. स्वामींची विषय समजून देण्याची शैली फारच उत्तम आहे. त्यांच्या ग्रंथांवरूनच ते अनुभवी वेदांती होते, अलीकडच्या वेदांत्यांप्रमाणें नुसते शाब्दिक वेदान्ती नव्हते, असें सहज समजतें. संस्कृत वाङ्मयावर व संस्कृतज्ञ विद्वानावर त्या माहात्म्याचे किती उपकार आहेत, हें आज नव्यानें सांगावयास नको.

असो, हा ग्रंथ जरी निवृत्तिमार्गपर आहे व तो मार्ग व्यवहाराच्या मुळींच उपयोगी नाहीं असेंही जरी ठरल्यासारखेंच आहे, तरी जन्मास आलेल्या प्राण्यास जसें मरणावांचून गत्यंतर नाहीं, त्याप्रमाणें मनुष्यास त्या मार्गावांचून गत्यंतर नाहीं; कारण संसारसागरांत पडलेल्या जीवास त्यांतून वर येण्यास निवृत्तिमार्गावांचून दुसरा उपाय नसतो. प्रवृत्तिमार्गाचा अवलंब केल्यास ऐहिक व पारलौकिक अभ्युदय होतो हें खरें; पण जन्ममरणपरंपरेंतून सुटण्यास निवृत्तिमार्गावांचून दुसरा मार्ग नसतो. तथापि स्वभावतःच प्रवृत्तिप्रिय लोकांस तो आवडत नाहीं व त्यांतील कांहीं त्याचा द्वेषही करितात; हें खरें, व त्यामुळें असले ग्रंथ लिहिण्यांत श्रम करणें व्यर्थ आहे, हेंही कांहीं अंशीं खोटें नाहीं, तरीपण ज्या थोडयाशा भाग्यवानांना या मार्गाची गोडी लागलेली असते, त्यांस असले ग्रंथ म्हणजे अमूल्य रत्नेंच वाटतात आणि असा प्रकार असल्यामुळें ते लिहिणाऱ्या लेखकाचे श्रम अगदींच व्यर्थ जात नाहींत. रत्नाचे ग्राहक व परीक्षक, जोंधळे, तांदुळ इत्यादिकांच्या ग्राहकांइतके व परीक्षकांइतके कधींही असत नाहींत. मग जीं रत्नें, रत्नें आहेत असें समजण्यासही पुष्कळ काळ लागतो, त्यांच्या ग्राहकांविषयीं तर बोलावयासच नको. अशा अवस्थेंत श्रमाचें सार्थक्य होईलच अशी आशा करणेंच व्यर्थ आहे. तस्मात् वेदान्तशास्त्राकरितां, हल्लींच्या व पुढें होणाऱ्या त्याच्या भोक्त्यांकरितां, पूर्वजांकरितां, व स्वतःच्या बोधाकरितांच असलीं कार्यें करणें नेहमींच अधिक श्रेयस्कर असतें.

असो, वस्तुस्थिति जरी अशी आहे, तरी प्रवृत्तिमार्गाच्या लोकांसही या ग्रंथाच्या वाचनापासून पुष्कळ चांगल्या व उपयुक्त गोष्टी कळतील. जीवन्मुक्ति म्हणजे काय, संन्यासी व ज्ञानी वस्तुतः कसे असतात, वेदान्तशास्त्राची खरी योग्यता किती आहे, ज्ञानाचीं साधनें व्यवहारांतही कशीं व किती उत्कृष्ट ठरतात व निवृत्तिमार्गच मनुष्यास साक्षात् ब्रह्म बनविण्यास कसा समर्थ आहे, हें याच्या वाचनानें समजून येईल. आज जरी त्यांची अवस्था त्या मार्गाचा आश्रय करण्यास अनुकूल नसली, तरी असल्या ग्रंथांच्या वाचनापासून मनावर झालेले परिणाम व्यर्थ जाणार नाहींत. सारांश; प्रवृत्तिमार्गाच्या व निवृत्तिमार्गाच्या लोकांसही याचा उपयोग होईल. अशा समजुतीनें हें पुस्तक लिहिलें आहे.

ग्रंथ होईल तितका सोपा करण्याकडे मी चांगलें लक्ष दिलें आहे. अनवश्यक व प्रसिद्ध वचनें मूळ संस्कृतांत न देतां त्यांचें प्राय: तात्पर्य मी यांत दिलें आहे. पांचव्या प्रकरणांत परमहंसोपनिषद्ही मूळ न देतां अवतरण चिन्हांत त्याचें सार दिलें आहे व अशा रीतीनें मीं हें प्रकरण शक्य तितक्या तऱ्हेनें सजविलें आहे. असंस्कृतज्ञ मराठीवाचक त्याचा यथेच्छ उपयोग करोत, अशी सदिच्छा व्यक्त करून व ज्या ईश्वररूप आचार्यांच्या कृपाकटाक्षानें हें काम माझ्या हातून निर्विघ्नपणें पार पडलें, त्यांचें अनन्यभावानें चित्तांत अनुसंधान करून मी ही प्रस्तावना संपवितों.

सिंध—हैद्राबाद,
कार्तिक, शु. १ रविवार
शके १८३०.

विष्णु वामन बापट,
गिडुमल संस्कृत पाठशाळेंतील मुख्याध्यापक.



# विषयानुक्रमणिका.

## १. प्रमाणप्रकरणम् । १–३८.



## २. वासनाक्षयप्रकरणम् । ३८–८९.

---

## ३. मनोनाशप्रकरणम् । ८९–१२४.

---

## ४. प्रयोजनप्रकरणम् । १२४–१३९.

## ५. विद्वत्संन्यासप्रकरणम् । १३९–१५६.

## या ग्रंथांतील ठळक चुकांचें
# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | २ | संन्यासांतील | संन्यास्यांतील. |
| ४ | २१ | आश्वलायन प्रभृति | अश्वल प्रभृति. |
| १३ | २ | स्वर्गादि अर्थी० | स्वर्गादि अर्थीतील |
| ,, | ९ | मुनेत | मुने |
| १७ | १५ | ब्राह्मण, अतिव. | ब्राह्मण—अतिव० |
| ,, | १९ | नृण | नृणां |
| १९ | ५ | असल्यामुळें | असतो |
| ,, | ७ | यास्तव | त्यामुळें |
| २० | १७ | यस्मीन्नो. | यस्मान्नो० |
| २१ | २४ | विदेहमुक्ता | विदेहमुक्तो |
| २१ | ९-१२ | ( दुसऱ्या...... जीवन्मुक्त होय. ) | याबद्दल खालील मजकूर वाचावा. |
| २४ | २६ | भय, सुख व क्रोध | भय व क्रोध |
| २६ | १२ | निमित्त असतां | निमित्त झालें असतां |
| ,, | २३ | पुरुषाच्या योगानें | पुरुषाच्या उद्योगाच्या योगानें |
| ,, | २४ | पुरुषाच्या उद्योगाच्या प्रय० | पुरुषाच्या प्रयत्नावांचून |
| ३५ | १५ | असनावर | आसनावर |

जसा एकादा व्यवहारी, शेजाऱ्याच्या घरीं विवाहादि कार्यें मांडलीं असतां तेथें जाऊन पडेल तें काम करीत असतो; पण त्या घरधन्याच्या हानिलाभानें त्याला दुःख किंवा हर्ष होत नाहीं; त्याप्रमाणें आपल्या घरच्या कार्यांत निमग्न असूनही हानिलाभानें जो दुःख-हर्षयुक्त होत नाहीं तर व्यवहार करीत असतांनाही चित्तांत शांतल असतो तो जीवन्मुक्त होय.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३६ | ८ | शन्यं | शून्यं |
| ४४ | १ | मनावृत्ताचा | मनोवृत्तीचा |
| ,, | ४ | हा दोष• विरोध | यावर पूर्वोत्तर विरोध हा दोष |
| ४७ | १० | सोडणें | सोडावें. |
| ५२ | ५ | शत्र | शत्रु |
| ६९ | ८ | दुष्ट, आशा, | दुष्ट आशा, |
| ,, | १८ | ताभिव्यवहर० | ताभिर्व्यव्यहरन्नपि |
| ,, | २० | ता अप्यन्तः | तामप्यन्तः |
| ७८ | १ | द्वेष | दोष |
| ८१ | ५ | हीं | हे |
| ९१ | १ | अंधःकारास | अंधकारास |
| ९९ | ३ | भूत | भूत प्रत्ययानें |
| ,, | १० | व पूर्ण | व शेवटीं पूर्ण |
| १०४ | ८ | योग होय असें, | योग होय, असें |
| ,, | ९ | करितों | करितां |
| ११६ | २२ | ०वचनांतक धैर्ययुक्त | ०वचनांत " धैर्ययुक्त |
| ११७ | ४ | काम | " काम |
| १३० | ११ | आवकाश | अवकाश |
| ,, | १९ | सत्यक् | सम्यक् |
| १३१ | १६ | सुस्वर् | सुवर् |
| १३७ | १६ | ( ब्रह्मास ) | ( ब्रह्मास ) |
| ,, | २९ | अनात्ववस्तूशींच | अनात्मवस्तूशींच |
| १३८ | ११ | अंतःशीलत्व | अंतःशीतलत्व |
| १४४ | १३ | लंगोट्या, एक वस्त्र, | लंगोट्या, दंड, एक वस्त्र. |



॥ श्रीः ॥

श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत

# जीवन्मुक्तिविवेकसार.

## १ अथ जीवन्मुक्तिप्रमाणप्रकरणम् ।




गणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीशंकराचार्यचरणकमलाभ्यां नमः । सर्व परमपूज्य वेदान्ताचार्यांस अनन्यभावानें वंदन करून मी श्रीविद्यारण्यस्वामिप्रणीत जीवन्मुक्तिविवेकाचें सार आपल्या मुग्ध बोधाकरितां लिहितों.

विविदिषासंन्यास व विद्वत्संन्यास असा दोन प्रकारचा संन्यास आहे. त्यांतील पहिल्या प्रकारचा संन्यास विदेहमुक्तीस व दुसऱ्या प्रकारचा संन्यास जीवन्मुक्तीस कारण होतो. विविदिषासंन्यास, विद्वत्संन्यास, विदेहमुक्ति व जीवन्मुक्ति या चार शब्दांचा अर्थ पुढें स्पष्टपणें कळणार आहे, म्हणून येथें सांगत नाहीं. "ज्या दिवशीं वैराग्य प्राप्त होईल त्या दिवशींच संन्यास करावा" असें श्रुतीनें सांगितलेलें असल्यामुळें विरक्ति हें संन्यासाचें कारण आहे, असें ठरतें. पुराणामध्यें या वैराग्याचे—मंद, तीव्र व तीव्रतर—असे तीन भेद सांगितले आहेत. स्त्री मेली असतां, पुत्रास काळानें नाहींसें करून टाकिलें असतां, घर जळालें असतां, चोरांनीं लुटलें असतां किंवा असेंच कांहीं संकट व दुःख कोसळलें असतां या कष्टकारक संसारास धिक्कार असो, अशी भावना क्षणभर होते. पण ती फार वेळ टिकत नाहीं. म्हणूनच तिला व्यवहारांत स्मशान वैराग्य व शास्त्रांत मंद वैराग्य म्हणतात. मंद विरक्तास कोणत्याही संन्यासाचा अधिकार नाहीं. मला या जन्मीं स्त्रीपुत्रादि कोणी नकोत, कारण त्यांच्या-

पासून सुख न होतां असह्य दुःख मात्र होईल; अशी स्थिर बुद्धि होणें हेंच तीव्र वैराग्य आहे. ज्याला अशा प्रकारचें वैराग्य झालें असेल त्यानें कुटीचक किंवा बहूदक संन्यास करावा. यात्रा इत्यादि करण्याचें सामर्थ्य नसल्यास कुटीचक व्हावें व यात्रादि करण्याचें सामर्थ्य असल्यास बहूदक व्हावें. मला या सृष्टींतील कोणताही नाशवंत लोक नको, असें स्थिर मन होऊन ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोकांविषयीं जो विरक्त झालेला असतो, तो तीव्रतर विरक्त होय. अर्थात् त्याचें तें वैराग्य तीव्रतर म्हणजे अतिशय तीव्र आहे. अशा विरक्तानें हंस किंवा परमहंस संन्यास करावा. हंसास ब्रम्हलोक हें फळ मिळतें व परमहंसास मोक्ष मिळतो. हंसास ब्रह्मलोकीं तत्त्वज्ञान होतें व परमहंसास या लोकीं तत्त्वज्ञान होतें. या चारी प्रकारच्या संन्याशयांचे आचार पराशरस्मृतीच्या व्याख्यानांत श्रीविद्यारण्यस्वामींनींच सांगितले आहेत. त्यांचा सारांश असाः—यात्रादि करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानें पुत्र, भ्राता इत्यादिकांनीं करून दिलेल्या कुटींत सर्वसंगपरित्याग करून रहावें; काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मात्सर्य इत्यादिकांचा त्याग करून तीन दंड, शिखा, यज्ञोपवीत, कमंडलु व काषाय ( भगवीं ) वस्त्रें धारण करावींत. जप, वेदाध्ययन, ब्रह्मचर्य व ध्यान यांमध्यें तत्पर होऊन भिक्षाकालीं आपल्या पुत्रादिकांपासूनच शरीरनिर्वाहापुरतें अन्न घेऊन खावें. अशा रीतीनें आयुष्याचे राहिलेले दिवस कुटीमध्यें घालवून जे शरीरत्याग करितात, ते कुटीचक संन्यासी होत. या संन्यासास कुटीचर अशीही संज्ञा आहे. संन्यास करून बंधु पुत्रादिकांस सोडून सदाचारसंपन्न गृहस्थांच्याच सात घरीं भिक्षा मागून, एकाच घरीं भोजन न करितां, त्रिदंड, कमंडलु, शिखा, सूत्र, काषाय वस्त्रें धारण करून, वेदान्तार्थ समजून घेऊन, रहाण्याचें स्थान, आसन, वस्त्र इत्यादि कोणत्याही वस्तूंवर आसक्ति न ठेवितां सतत यात्रा करीत राहून ब्रह्मचिंतनांत काल घालविणें, हे बहूदक संन्याशाचें आचार आहेत. संन्यास करून यज्ञोपवीतादि धारण करून नित्य त्रिकाल स्नान करीत, मोक्षपरायण होऊन चांद्रायणादि करीत वृक्षाखालीं किंवा गुहेंत वास्तव्य करणें, हा हंस संन्याशांचा धर्म आहे. कौपीन, आच्छादन, शीतनिवारण करणारी कंथा, रुद्राक्षादिकांची जपमाळा, वेळूचा व्रणरहित दंड इत्यादि धारण करून, माधुकर अन्न अथवा एकाच घरचें अन्न खाऊन शिखा, यज्ञोपवीत व नित्य कर्म यांचा त्याग करून ब्रह्मात्मैक्य ( ब्रह्म व आत्मा

याचें ऐक्य आहे अशी ) भावना करीत रहाणें हा परमहंसाचा आचार आहे. या चार प्रकारच्या संन्यासांतील परमहंसाचें अधिक स्पष्ट विवेचन येथें करावयाचें आहे. जिज्ञासु व ज्ञानवान् असे परमहंसांचे दोन प्रकार होऊ शकतात. बृहदारण्यक उपनिषदामध्यें जिज्ञासूनें ज्ञानाकरितां संन्यास करावा, असें " याच आत्मलोकाची इच्छा करणारे त्यागी पुरुष संन्यास करितात," या वाक्यानें सांगितलें आहे. याच वाक्याचा अर्थ मंदबुद्धि पुरुषाकरितां अगोदर स्पष्ट करितों. आत्मलोक व अनात्मलोक असा दोन प्रकारचा लोक आहे. पुत्राच्या योगानें प्राप्त होणारा मनुष्यलोक, कर्माच्या योगानें प्राप्त होणारा पितृलोक व उपासनेच्या योगानें मिळणारा देवलोक हे तिन्ही अनात्मलोक होत. जो " परमात्मसंज्ञक ब्रह्म मी आहें " अशा रीतीनें या स्वलोकास न जाणतां या शरीरास सोडून जातो, म्हणजे आत्मसाक्षात्कार झाल्यावांचून मरतो, तो कृपण होय. परमात्मा अशा अविद्वान् पुरुषाचें–शोकमोहादिकांच्या नाशद्वारा–रक्षण करीत नाहीं. यास्तव आत्मलोकाचीच म्हणजे परमात्म्याचीच उपासना करावी. आत्मोपासकाचें कर्म एकच फल देऊन कधींही क्षीण होत नाहीं; तर तें सर्व इष्ट फल व मोक्षही देतें. बृहदारण्याच्याच सहाव्या अध्यायांत " ज्या आम्हांस परमात्मभूत आत्मलोक हेंच फल इष्ट आहे, त्या आम्हीं अध्ययन किंवा यज्ञयागादि कर्मे कशाकरितां करावीं ? ज्यांनीं प्रजेची इच्छा केली ते मृत्युमुखीं पडले व ज्यांनीं प्रजेची इच्छा केली नाहीं, ते मुक्त झाले." असें स्पष्ट म्हटलें आहे. यास्तव याच आत्मलोकाची इच्छा करणारे त्यागी पुरुष संन्यास करितात, अशा अर्थाच्या श्रुतिवचनावरून आत्म्याच्या अनुभवाची इच्छा करणारे संन्यास करितात; म्हणजेच आत्मजिज्ञासूंनीं आत्मज्ञानाकरितां संन्यास करावा, असें ठरतें. " ब्रह्मसाक्षात्काराकरितां शम, दम, इत्यादि साधनांसह परमहंसनामक संन्यास करावा," असें स्मृतींत सांगितलें आहे. या जन्मीं किंवा पूर्व जन्मीं उत्तम प्रकारें केलेलें वेदांचें व्याख्यान, यज्ञ, दान, तप, उपवास इत्यादिकांच्या योगानें आत्म्यास जाणण्याची इच्छा होते. तिलाच विविदिषा ( म्हणजे जाणण्याची इच्छा ) म्हणतात. अशा विविदिषेमुळें होणारा जो संन्यास तो विविदिषासंन्यास होय; हा ज्ञानास कारण होतो. केवल जन्म देणाऱ्या काम्य कर्मादिकांचा त्याग करणें हा एक प्रकारचा संन्यास आहे व प्रैष–उच्चार करून दंडादि धारण करणें, हा आश्रमरूप दुसऱ्या प्रकारचा संन्यास आहे.

" या आश्रमरूप संन्यासाचा केवल स्वीकार केल्यानेंच माता व पत्नी यांस मरणोत्तर पुरुष जन्म मिळतो व त्या संन्याशास उत्तम आचरणानें ज्ञान होतें," असें या संन्यासाचें माहात्म्य सांगितलें आहे " कर्म, प्रजा व धन यांतील कोणत्याही साधनानें मोक्ष मिळत नाहीं, तर केवळ संन्यासानेंच मोक्ष मिळतो," असें तैत्तिरीयादि उपनिषदांतून स्पष्ट म्हटलें आहे. बृहदारण्यकांतही मैत्रेयीनें— "ज्याच्या योगानें मी अमृत होणार नाहीं त्या वित्तास घेऊन मला काय करावयाचें आहे ? भगवन्, आपणास मोक्षाचें जें साधन ठाऊक असेल तेंच मला सांगा." असें संन्यास घ्यावयास तयार झालेल्या आपल्या याज्ञवल्क्यनामक पतीस म्हटलें आहे. ब्रह्मचारी, गृहस्थ व वानप्रस्थ यांस कांहीं अडचणींमुळें संन्यासाश्रम जरी घेतां आला नाहीं, तरी आपल्या आश्रमाचीं कर्मे करीत अस त्यनाही त्यांचा मानस त्याग करितां येतो. कारण श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणें यांमध्यें तसें वर्णन आढळतें व व्यवहारांत तशा प्रकारचे अनेक तत्त्ववेत्ते आढळतात. असो, दंड धारण करणें इत्यादिरूप ज्ञानहेतु परमहंसाश्रमाचें सविस्तर वर्णन पूर्वीच्या आचार्यांनीं केलें आहे, यास्तव येथें त्याचा अधिक विस्तार करीत नाहीं. इति विविदिषासंन्यासप्रकरणम् ।

आतां विद्वत्संन्यासाचें निरूपण करितों. श्रवण, मनन व निदिध्यासन यांचें उत्तम प्रकारें अनुष्ठान केल्यामुळें ज्यांस परम तत्त्वाचा साक्षात्कार झाला आहे, अशा विद्वानांकडून केला जाणारा जो संन्यास, तो विद्वत्संन्यास होय. याज्ञवल्क्यांनीं अशा प्रकारचा संन्यास केला, असें बृहदारण्यक उपनिषदावरून ठरतें. कारण त्या उपनिषदांत—जनकाच्या सभेंत विद्वच्छ्रेष्ठ याज्ञवल्क्यांनीं अनेक प्रकारें तत्त्वनिरूपण करून आश्वलायनप्रभृति ब्राम्हणांस जिंकलें. पुढें जनकास संक्षेपतः व विस्तारानें तत्त्वोपदेश केला. शेवटीं मैत्रेयीस बोध करण्याच्या इच्छेनें मी आतां संन्यास करणार आहें, यास्तव तुला जें विचारावयाचें असेल तें विचार, असें म्हणून त्या ज्ञानी याज्ञवल्क्यांनीं तिला बोध करून नंतर संन्यास केला—असें वर्णन आहे. बृहदारण्यकाच्या कहोल ब्राह्मणांतही—"याप्रमाणें त्या आत्म्यास जाणून ब्रह्मवेत्ते ब्राह्मण पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा या तीन एषणांपासून निवृत्त होऊन म्हणजे या तिन्ही आशा सोडून भिक्षाचरण करितात."—असें म्हटलें आहे. या वाक्यांत " जाणून " व " ब्रह्मवेत्ते ब्राह्मण " एषणात्याग करितात असें म्हटलें आहे, त्यावरून हा विद्वत्संन्यासच आहे, विविदिषासंन्यास नव्हे, हें उघड होतें. शारीर ब्राह्म-

णांतही या दोन्ही प्रकारच्या संन्यासांचा स्पष्ट निर्देश केलेला आहे. " या आत्म्यासच जाणून पुरुष मुनि ( मननशील ) होतो. याच आत्मलोकाची इच्छा करणारे त्यागी संन्यास करितात. " असें तेथील वाक्य आहे. दुसरें कांहीं कर्तव्य नसल्यासच मननशील होणें शक्य आहे. यास्तव येथें प्रत्यक्ष शब्दानें जरी नाहीं, तरी अर्थतः संन्यासाचेंच विधान आहे, असें वाटतें. व तेंच दुसऱ्या एका वाक्यांत स्पष्ट केलें आहे. " याच तत्त्वास जाणणारे पूर्व विद्वान संततीची इच्छा करीत नव्हते. ते म्हणत—ज्या संततीच्या योगानें आम्हांस हा आत्मलोक मिळत नाहीं, त्या पुत्रादि संततीस घेऊन आम्हांस काय करावयाचें आहे ? असा विचार करून ते विद्वान् पुत्रैषणादि तीन एषणांस सोडून भिक्षाचरण करीत. वरील पहिल्या वाक्यांत " जाणून मुनि होतो " असें म्हटलें आहे. त्यामुळें जाणणें हें साधन व मुनि होणें हें साध्य ( फल ) आहे, असें वाटतें, व तें बरोबरही आहे. कारण आत्मज्ञान हें विविदिषा संन्यासाचें फळ आहे. व मुनित्व हें त्याचें ( आत्मज्ञानाचें ) फल आहे. यास्तव विविदिषा संन्यास व विद्वत्संन्यास हे दोन भिन्न संन्यास आहेत. आतां—ज्ञानाचीच अत्यंत परिपाकावस्था म्हणजे मुनित्व होय. यास्तव मुनित्व हें विविदिषा संन्यासाचेंच, ज्ञानद्वारा प्राप्त होणारें, फल आहे; असें जर कोणी म्हणेल, तर ते बरोबर आहे. आणि त्याकरितांच साधनरूप अशा विविदिषा संन्यासाहून फलरूप असा हा विद्वत्संन्यास भिन्न आहे, असें आम्ही म्हणतों. ज्याप्रमाणें विविदिषा संन्याश्यानें तत्त्वज्ञानाकरितां श्रवणादिकांचें संपादन करणें अवश्य आहे, त्याप्रमाणें विद्वत्संन्याश्यानेंही जीवन्मुक्तीकरितां मनोनाश व वासनाक्षय यांचें संपादन करणें अवश्य आहे. याचाच अधिक विस्तार आम्ही पुढें करूं. येणेंप्रमाणें पोटभेद असतांही परमहंस या आकारानें त्यांचें एकत्व मानून ( स्मृतीमध्यें ) संन्यासाचे चार भेद सांगितले आहेत. या दोन्ही साधनफलरूप संन्यासांचा परमहंस संन्यासांत अंतर्भाव होतो, हें जाबाल श्रुतीवरून स्पष्ट होतें. कारण त्या उपनिषदाच्या चवथ्या खंडांत जनकानें संन्यासाविषयीं प्रश्न केला असतां याज्ञवल्क्यानें विशेष अधिकाऱ्याचें विधान करून व संन्यासानंतर अनुष्ठान करावयास योग्य असलेले धर्म सांगून प्रथम विविदिषा संन्यास सांगितला आहे. त्यानंतर पांचव्या खंडांत अत्रीनें—यज्ञोपवीतावांचून असलेला तो संन्याशी ब्राम्हण कसा ? असा आक्षेप घेतला असतां—आत्मज्ञान हेंच त्याचें यज्ञोपवीत आहे, असें सांगून त्याचें समाधान

केलें आहे. यास्तव बाह्य यज्ञोपवीताच्या अभावीं या संन्याशाचें परमहंसत्व निश्चित होतें. कारण कुटिचरादि पहिल्या तीन प्रकारच्या संन्याशांस यज्ञोपवीत असतें, हें वर स्पष्ट झालेंच आहे. त्याचप्रमाणें सहाव्या कंडिकेमध्यें "परमहंसो नाम" या वाक्यानें आरंभ करून संवर्तकादि अनेक ब्रह्मवेत्त्या जीवन्मुक्तांचीं नांवें सांगून—ज्यांचीं चिन्हें व्यक्त नाहींत, ज्यांचे आचार व्यक्त नाहींत, जे वेडे नसतांनाही वेड्याप्रमाणें वागणारे—अशाप्रकारें विद्वत्संन्याशयांचें वर्णन केलें आहे. तसेंच—त्रिदंड, कमंडलु, भिक्षापात्र ठेवावयाचें शिंकें, भिक्षापात्र, जलपवित्र (हें एक वीतभर लांब व तितकेंच रुंद शुभ्र चाकोनी वस्त्र असतें, आचमनादि प्रसंगीं जल शुद्ध करण्याकडे याचा उपयोग करितात.) शिखा, यज्ञोपवीत, इत्यादि सर्व "भूः स्वाहा" असें म्हणून जलांत टाकावें. व स्वयंप्रकाश आत्म्याचा साक्षात्कार करावा. असें म्हणून पूर्वी त्रिदंडी असलेल्या अधिकाऱ्यास एकदंड-युक्त विविदिषा संन्यास करावयास सांगून पुढें त्याच्याच फलरूप विद्वत्संन्यासाचा निर्देश केला आहे; तो असाः—जसा उत्पन्न झाला असेल तसेंच रूप धारण करणारा (म्हणजे दिगंबर, नग्न) शीतोष्णादि सहिष्णुः यदृच्छेनें प्राप्त झाल्यास कंथा, कौपीन, अध्यात्मपुस्तक इत्यादि अति अवश्य वस्तूंवांचून दुसऱ्या कशाचाही स्वीकार न करणारा; कधींही बाधित न होणारें जें आत्मतत्त्व तेंच त्रिविधपरिच्छेद-शून्य ब्रह्म आहे, अशा संशयविपर्ययरहित ज्ञानानें संपन्न; ज्याचं मन कामक्रोधादि व संकल्पादि मलांनीं रहित आहे असा; प्राणांच्या रक्षणार्थ शास्त्रोक्त कालीं मी सर्व बंधनापासून मुक्त आहें, असें चिंतन करीत माधुकरादि भिक्षाचरण करणारा; उदरपात्र असणारा म्हणजे कोणी भिक्षा आणली असतां ती तोंड उघडून त्यांत घेऊन उदररूपी पात्रांत सांठविणारा; भिक्षा मिळाली किंवा न मिळाली तरी सुखदुःख न मानणारा; शून्यगृह, देवमंदिर, कांहीं निमित्तानें आपोआप झालेला गवताचा समूह, मुंग्यांचें वारुळ, वट, अश्वत्थ इत्यादि वृक्षांचें मूळ, कुंभाराची मातीचीं भांडीं ठेवण्याची शाला, अग्निगृह महानदीच्या तीराजवळचा प्रदेश, पर्वतावरील वेळु, वेली इत्यादिकांनीं आच्छादित झालेला प्रदेश, गुहा, वृक्षाची ढोल, पाण्याचा झरा, शुद्ध भूप्रदेश इत्यादिकांतील कोणत्या तरी एका स्थळीं रहाणारा; तेथें नानाप्रकारचीं उपकरणें जमविण्याविषयीं प्रयत्न न करणारा; कोणत्याही वस्तूचे ठायीं ही माझी आहे असें म्हणून ममत्व न ठेवणारा; परमात्म्याच्या ध्यानामध्यें परायण असणारा; अंतर्मुख व त्यामुळेंच अनेक जन्मार्जित अशुभकर्मांचा नाश करण्यांत

नंतर झालेला जो संन्यासी स्वल्पकाल अथवा दीर्घकाल संन्यासधर्मानुष्ठानानें शरीरत्याग करितो तो परमहंस होय. या दोन्ही वाक्यांवरून विविदिषा व विद्वत्संन्यास हे परमहंस संन्यासाचेच पोटभेद आहेत, असें सिद्ध होतें. कांहीं धर्म भिन्न व परस्पर विलक्षण असल्यामुळें एकाच परमहंस संन्यासाचे असे दोन भेद होणें फारसें अशक्यही नाहीं. आरुणी व परमहंस उपनिषदांचें चांगलें अवलोकन केलें असतां त्यांत विलक्षण धर्म कोणते आहेत, तें सहज समजतें. आरुण्युपनिषदांत " हे भगवन्, कोणत्या उपायानें मी सर्व सोडूं ? " असें, शिखा–यज्ञोपवीत–स्वाध्याय–गायत्रीजप इत्यादि सर्व कर्मांचा त्याग करणें या विविदिषा संन्यासाविषयीं अरुणनामक शिष्यानें विचारिलें असतां प्रजापति गुरूंनीं शिखा, यज्ञोपवीत इत्यादि सर्वांचा त्याग करावयास सांगून दंड, आच्छादन व कौपीन ( लंगोटी ) यांचा स्वीकार करावा; त्रिकाल स्नान करावें; चित्त स्थिर करून परमानंदरूप आत्म्याचें अनुसंधान करावें; सर्व वेदांतील उपनिषद्भागाची आवृत्ति करावी; असा उपदेश केला आहे. परमहंसोपनिषदांत–परमहंसाचा हा कोणता मार्ग आहे? असा नारदानें विद्वत्संन्यासाविषयीं प्रश्न केला असतां प्रजापति नामक गुरूनें वर सांगितल्याप्रमाणेंच सर्वांचा त्याग करावयास सांगून कौपीन, दंड व आच्छादन यांचा स्वशरीरोपभोगार्थ व लोकोपकारार्थ स्वीकार करावा, असें ह्मटलें आहे. पण दंडादिकांचा स्वीकार करणें ही लौकिक गोष्ट आहे व त्यामुळेंच ती मुख्य शास्त्रीय नव्हे, असें ह्मणून " दंड नाहीं, शिखा नाहीं, यज्ञोपवीत नाहीं, आच्छादन नाहीं" अशा प्रकारें परमहंस फिरत असतो, असें म्हणून व या दंडादि चिन्हांनीं रहित असलेल्या अवस्थेसच मुख्यत्व व शास्त्रीयता आहे असें सांगून, शीत नाहीं, उष्ण नाहीं इत्यादि वाक्यांनीं व दिगंबर, नमस्काररहित इत्यादि वाक्यांनीं तो परमहंस सर्व लोकव्यवहारास सोडून रहातो, असें त्याचें वर्णन करून शेवटीं "जें पूर्णानन्द व केवल ज्ञानरूप ब्रह्म तें मी आहें," असें समजून तो कृतकृत्य होतो, असें म्हणून केवल ब्रह्मानुभवांत त्याचें पर्यवसान होतें, असें सांगितलें आहे. त्यावरून या दोन अवस्थांतील धर्म परस्पर विलक्षण आहेत, असें स्पष्ट होतें. अर्थात् त्या दोन्हीं संन्यासांत मोठा भेद आहे. अनुस्मृतींतही हा भेद दाखविला आहे. कसा ह्मणाल तर पहाः–

संसारमेवं निःसारं दृष्ट्वा सारदिदृक्षया ।
प्रव्रजन्त्यकृतोद्वाहाः परं वैराग्यमाश्रिताः ॥ १ ॥

प्रवृत्तिलक्षणो योगो ज्ञानं संन्यासलक्षणम् ।
तस्माज्ज्ञानं पुरस्कृत्य संन्यसेदिह बुद्धिमान् ॥ २ ॥

यांचा भावार्थ—येणेंप्रमाणें संसार निःसार आहे, असें जाणून त्यांतील सार जाणण्याच्या इच्छेनें तीव्र वैराग्याचा आश्रय केलेले साधक, विवाह न करितां संन्यास करितात. योग प्रवृत्तिलक्षण आहे; व ज्ञान हें संन्यासाचें लक्षण आहे. यास्तव बुद्धिमानानें ज्ञानाचा पुरस्कार करून म्हणजे ज्ञानाच्या उद्देशानें संन्यास करावा १-२. हीं व अशींच दुसरींही विविदिषासंन्यासाविषयीं वचनें आहेत. आणि

यदा तु विदितं तत्त्वं परं ब्रह्म सनातनम् ।
तदैकदण्डं संगृह्य सोपवीतां शिखां त्यजेत् ॥
ज्ञात्वा सम्यक्परं ब्रह्म सर्वं त्यक्त्वा परिव्रजेत् ॥

इत्यादि वचनांनीं विद्वत्संन्यास सांगितला आहे. या वाक्यांचा अर्थ—जेव्हां नित्य ब्रह्मनामक परमतत्त्व ज्ञात होतें म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होतो, तेव्हां एका दंडाचा संग्रह करून यज्ञोपवीतासह शिखेचा त्याग करावा. परब्रह्माचा यथार्थ अनुभव आला असतां सर्वांचा त्याग करून संन्यास करावा. असो; यावरून विविदिषा व विद्वत्संन्यास हे परमहंससंन्यासाचेच दोन पोटभेद आहेत, असें सप्रमाण सिद्ध झालें. आतां कोणत्या प्रकारची विविदिषा व विद्वत्ता आम्हांस विवक्षित आहे, तें सांगितलें पाहिजे. कारण, लोक कधीं कधीं केवल विनोदाकरितां किंवा नुसत्या उत्सुकतेनेंही एकाद्या कलेचें किंवा विद्येचें ज्ञान संपादन करण्याची इच्छा करितात व ज्यांस पूर्ण साक्षात्कार झालेला नाहीं असे पुष्कळ पंडितमानीही विद्वान् असतात. तेव्हां त्या ज्ञानाच्या इच्छेस विविदिषा व विद्वत्तेस विद्वत्ता म्हणतां येईल कीं नाहीं, असाही प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे. यास्तव ज्याप्रमाणें कडकडीत भूक लागली असतां भोजनावांचून दुसरें कांहीं सुचत नाहीं व भोजनास विलंब लागला तर तोही सहन होत नाहीं, त्याप्रमाणें जेव्हां जन्मास कारण होणाऱ्या कर्मांविषयीं अरुचि व श्रवणादि ज्ञानसाधनांविषयीं अतिशय त्वरा होते, तेव्हां तिला विविदिषा म्हणावें. ही संन्यासास कारण होते. विद्वत्तेची अवधि आचार्यांनीं उपदेशसाहस्रींत सांगितली आहे; ती अशी—

देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम् ।
आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते ॥ १ ॥

म्हणजे—प्रायः सर्व जीवांस देह हाच आत्मा आहे असें ज्ञान असतें. त्याविषयीं त्यांस कधीं संशय येत नाहीं अथवा विपरीत ज्ञान होत नाहीं. त्याप्रमाणेंच देह आत्मा आहे या ज्ञानाचा बाध करणारें आत्मज्ञान ज्यास होतें म्हणजे आत्मा देहाहून अगदीं भिन्न व सत्-चित्-आनंदरूप आहे, असें ज्यास निश्चित ज्ञान होतें त्याची इच्छा नसली तरी तो मुक्त होतो. १ "भिद्यते०" इत्यादि श्रुतींतही असेंच सांगितलें आहे. त्या श्रुतिवचनाचा सारांश असा-हिरण्यगर्भाचें पदही ज्याच्याहून कमी योग्यतेचें आहे त्या परब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां हृदयग्रंथी तुटते; सर्व संशय नाहींसे होतात; व प्रारब्धावांचून सर्व संचित व आगामी कर्मे क्षीण होतात. बुद्धीचे ठायीं साक्षीचा तादात्म्य-अध्यास होणें, हीच ग्रंथी होय. व अनादि अविद्येमुळें तो होत असल्यामुळें गांठीसारखा दृढ असतो. म्हणजे ती ग्रंथी सुटणें फारच कठिण होतें. आत्मा साक्षी आहे कीं कर्ता? साक्षी जरी असला तरी तो ब्रह्मरूप आहे कीं नाहीं? ब्रह्मरूप जरी तो असला तरी बुद्धीनें त्याचें ग्रहण होतें कीं नाहीं; व जरी तें (ब्रह्म) बुद्धिग्राह्य असलें तरी केवल त्याच्या ज्ञानानेंच मुक्ति होते कीं नाहीं? इत्यादि संशय साक्षात्कारानें नष्ट होतात. प्रारब्धकर्माचा भोगानेंच क्षय होतो असा नियम आहे. यास्तव कर्मशब्दानें येथें पुढच्या जन्मास कारण होणारें संचित व क्रियमाण कर्मच घेतलें पाहिजे. सारांश, हृदयग्रंथी, संशय व कर्मे अविद्येमुळें निर्माण झालेलीं असल्यामुळें आत्मज्ञानानें अविद्यानिवृत्तिद्वारा तीं निवृत्त होतात. स्मृतीमध्येंही हाच अर्थ आढळतो. कसा तो पहा—

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १ ॥

या भगवद्वचनाचा भावार्थ असा-ज्या ब्रह्मवेत्त्याचा भाव (सत्तास्वभाव आत्मा) अहंकारानें आच्छादित झालेला नसतो; व ज्याच्या बुद्धीस-मी हा दोष तर करीत नाहींना? असा संशय येत नाहीं त्यानें या त्रैलोक्याचा जरी वध केला तरी तो कोणास मारीत नाहीं व बद्धही होत नाहीं. वध करूनही जर तो निर्दोषी ठरतो, तर इतर कर्मानीं दोषी होणार नाहीं, हें उघड आहे.

आतां येथें कोणी असें म्हणेल कीं–विविदिषासंन्यासाचें तत्त्वज्ञान हें फल आहे. त्याच्या योगानें पुढच्या जन्माचें निवारण होईल व वर्तमान जन्मास कारण झालेल्या प्रारब्धाचा भोगानेंच क्षय होणार हें ठरलेलें आहे. तेव्हां विद्वत्संन्यासाकरितां व्यर्थ प्रयास करण्यांत लाभ कोणता ? याचें उत्तर असें–जीवन्मुक्तीकरितां विद्वत्संन्यासाची आवश्यकता आहे. कारण तो त्या मुक्तीचें कारण आहे. यास्तव ज्ञानाकरितां जसा विविदिषासंन्यास तसाच जीवन्मुक्तीकरितां विद्वत्संन्यास केला पाहिजे. इति विद्वत्संन्यासनिरूपणम् ॥

आतां जीवन्मुक्ति म्हणजे काय ? तिच्या विषयीं प्रमाण काय आहे ? तिची सिद्धि कशी होते ? व तिचें फल काय आहे ? या प्रश्नांचीं उत्तरें क्रमानें देतों. जीवंत पुरुषास कर्तृत्व, भोक्तृत्व, सुखदुःख इत्यादिरूप चित्तधर्म क्लेश देत असतात. यास्तव तोच त्याचा बंध होय. त्याचें निवारण करणें हीच जीवन्मुक्ति आहे. पण या बंधाचें निवारण साक्षीपासून करणार कीं चित्तापासून? साक्षीपासून बंधनिवारण करावयाचें असल्यास तें तर तत्त्वसाक्षात्काराच्या वेळींच केलें आहे, म्हणून पुनः करण्याची गरज नाहीं. बरें चित्तापासून त्याचें निवारण करावयाचें असेल तर तें असंभवनीय आहे. कारण जलापासून द्रवत्वाचें व अग्नीपासून उष्णत्वाचें निवारण जर करितां आलें, तरच चित्तापासून कर्तृत्वादि बंधाचें निवारण करितां येईल. कारण जलाचें द्रवत्व व अग्नीचें उष्णत्व जसें स्वाभाविक आहे, तसेच चित्ताचे कर्तृत्वादि धर्म स्वाभाविक आहेत. स्वाभाविक धर्म वस्तूस सोडून राहत नाहींत.–असें कोणी म्हणेल, तर त्याचें उत्तर असें–कर्तृत्वादि चित्ताचे स्वाभाविक धर्म आहेत; व त्यामुळें त्यांचें निवारण करितां येणार नाहीं, हें खरें; पण त्यांचा पराभव होणें शक्य आहे. जलांत माती कालविली असतां ज्याप्रमाणें त्याच्या द्रवत्वाचा पराभव होतो; मणि, मंत्र, औषधि यांच्या योगानें अग्नीचें उष्णत्व जसें पराभूत होतें, त्याप्रमाणें सर्व चित्तवृत्ति योगाभ्यासानें पराभूत होऊं शकतात. पण—अविद्या आणि तिचें कार्य यांचा नाश करण्यास प्रवृत्त झालेल्या तत्त्वज्ञानास प्रतिबंध करून प्रारब्ध कर्म आपलें फल देण्यास देह, इंद्रियें इत्यादिकांस सिद्ध करितें व सुखदुःखादिभोग चित्तवृत्तीवांचून होत नाहींत; तेव्हां सर्व प्रयत्नांस व्यर्थ करून सोडणारें प्रारब्धकर्म असे पर्यंत चित्तवृत्तींचा पराभव कसा होणार ? या प्रश्नाचें उत्तर असें:–चित्तवृत्तींचा पराभव केला असतां साध्य होणारी जी जीवन्मुक्ति तीही अतिसुखरूप असल्यामुळें तिचाही प्रारब्धाच्या फलामध्येंच

अंतर्भाव होतो. ( सुख व दुःख यांचा अनुभव येणें हाच फलभोग आहे. अर्थात् सुख व दुःख यांच्या पलीकडे फल म्हणून कांहीं नाहीं. जगांतील कोणताही प्राणी कोणतेंही कर्म करो, त्याचें फल एक तर सुख असेल अथवा दुःख असेल. पुण्यकर्माचें फल सुख व पापकर्माचें फल दुःख आहे. पुण्य-पापाच्या न्यूनाधिकतेप्रमाणें सुखदुःखादि फलही न्यूनाधिक मिळतें; पण या सुखदुःखांचा अनुभव अंतःकरणाच्या वृत्तींच्या द्वाराच येतो. म्हणून त्यांस निरतिशय म्हणतां येत नाहीं. अंतःकरणाच्या वृत्तींचा निरोध केला असतां केवल सुखच होतें, दुःख कधींही होत नाहीं. व तें सुख अतिशय म्हणजे सर्व वृत्तिजन्य सुखांहून अधिक असतें. ) तर मग—कर्मच जीवन्मुक्ति संपादन करील. पुरुषाच्या प्रयत्नाची काय गरज आहे ? असें जर कोणी विचारूं लागलें तर आम्हीही त्याला असें विचारूं कीं शेती, व्यापार इत्यादिकांसही प्रारब्ध संपादन करील. त्याकरितां तरी प्रयत्न करण्याचें काय प्रयोजन आहे ? यावर कर्म स्वतः अदृष्ट असल्यामुळें तें दृष्टसाधनाच्या संपत्तीवांचून फल देण्यास असमर्थ असतें म्हणून कर्माची गरज आहे; असें जर उत्तर आलें तर जीवन्मुक्तीविषयीं जो वर प्रश्न केला आहे, त्याचेंही हेंच उत्तर आहे, असें समजावें. म्हणजे कर्म प्रत्यक्ष नसल्यामुळें जीवन्मुक्तिरूप फलाकरितां पुरुषाच्या प्रयत्नाची अपेक्षा असते. प्रयत्न केल्यावरही जेव्हां शेती, व्यापार इत्यादिकांचें फल लाभत नाहीं तेव्हां त्यास प्रतिबंध करणाऱ्या दुसऱ्या प्रबल कर्माची कल्पना करावी लागते. तें प्रबल कर्म आपल्यास अनुकूल असलेल्या अनावृष्टि ( पाऊस न पडणें ) अग्नीचा उत्पात इत्यादि दृष्ट सामग्रीच्या द्वाराच फलास प्रतिबंध करितें. पण दुसऱ्या अतिप्रबल व अतिविरोधी कर्मानें त्या प्रतिबंधासही दूर करितां येतें. जसें—अनावृष्टि झाल्यास वेदांत सांगितल्याप्रमाणें कारीरी इष्टि करितात; पुराणांत सांगितल्याप्रमाणें संततधार धरितात, इत्यादि. अशा प्रकारचें कर्म, आपल्यास अनुकूल असलेली वृष्टि इत्यादि दृष्टसामग्री संपादन करूनच कर्मफलाच्या प्रतिबंधास दूर करितें. यास्तव प्रारब्ध कर्माचे जे अत्यंत भक्त असतील त्यांसही योगाभ्यासनामक पुरुषप्रयत्न व्यर्थ आहे, असें मनांत आणणें सुद्धां योग्य व शक्य नाहीं; किंवा प्रारब्ध कर्म जसें तत्त्वज्ञानाहून प्रबल आहे त्याप्रमाणें प्रारब्धकर्माहून योगाभ्यास प्रबल आहे असें समजावें. त्यामुळेंच उद्दालक, वीतहव्य इत्यादि योगीपुरुषांस आपल्या इच्छेनें देहत्याग करितां आला. आतां आमच्या सारख्या अल्पायु लोकांस तशा प्रकारचा योग जरी असंभवनीय वाटला, तरी

केवल कामादिरूप चित्तवृत्तींचा निरोध करणें एवढाच योग असंभवनीय वाटणार नाहीं. कारण त्यांत फारसा प्रयास नाहीं. शिवाय या शास्त्रीय प्रयत्नाचें प्राबल्य जर न मानलें, तर वैद्यक शास्त्रांतील चिकित्सेपासून मोक्षशास्त्रापर्यंत सर्व शास्त्रें व सर्व उपाय व्यर्थ होणार. केव्हां केव्हां कर्मफलांत बदल पडतो किंवा तें मिळत नाहीं, एवढ्यावरूनच तें ( शास्त्रीय कर्म, प्रयत्न ) दुर्बल आहे, असें समजणें योग्य नव्हे. कारण तसें समजूं लागल्यास कधीं कधीं पराजय होतो म्हणून कोणत्याही राजानें सेना मुळीं ठेवूंच नये असें होणार. एवढ्याकरितांच आनन्दबोधाचार्यांनीं—अजीर्ण होईल या भीतीनें कोणी भोजन टाकीत नाहीं; भिक्षुक ( याचक, भिकारी ) आहेत म्हणून कोणी स्वयंपाक करावयास आळस करीत नाहीं व उवा किंवा ढेंकूण होतील या भीतीनें कोणी वस्त्र-प्रावरणाचा त्याग करीत नाहीं—असें म्हटलें आहे. सारांश, जरी कधीं कधीं कर्म निष्फळ होत असलें तरी तें पुष्कळदां सफल होतें, असा अनुभव येत असल्यामुळें त्याचा त्याग करणें अयोग्य आहे. शास्त्रीय प्रयत्न प्रबल आहे, ही गोष्ट वसिष्ठ व राम यांच्या संवादावरून स्पष्ट समजते. यास्तव योग-वासिष्ठांतील त्या प्रसंगाचे कांहीं श्लोक येथें देतों.

सर्वमेवेह हि सदा संसारे रघुनन्दन ॥
सम्यक्प्रयत्नात्सर्वेण पौरुषात्समवाप्यते ॥ १ ॥

रघुनंदना, या संसारांतील पुत्र, वित्त, स्वर्गलोक, ब्रह्मलोक इत्यादि सर्व फल, कोणालाही झालें तरी पुत्रकामेष्टि, शेती, व्यापार, ज्योतिष्टोम, ब्रह्मोपासना, इत्यादिरूप पुरुषाच्या चांगल्या प्रयत्नानेंच प्राप्त होतें. प्रयत्नावांचून कांहीं मिळत नाहीं १ पण—

उच्छास्त्रं शास्त्रितं चेति पौरुषं द्विविधं स्मृतम् ॥
तत्रोच्छास्त्रमनर्थाय परमार्थाय शास्त्रितम् ॥ २ ॥

परद्रव्याचा अपहार करणें, परस्त्रीगमन करणें, इत्यादि उच्छास्त्र, व नित्यनैमित्तिकादिकांचें अनुष्ठान हें शास्त्रित असें पौरुष दोन प्रकारचें आहे.

१ योगवासिष्ठ हा एक अद्वैत वेदान्ताचा उत्तम ग्रंथ आहे, त्याच्या आधारानें श्रीयोगवासिष्ठसार—या नांवाचें एक रमणीय पुस्तक मी लिहित आहें. ईश्वराची कृपा झाल्यास तें लवकरच प्रसिद्ध होईल.

त्यांतील उच्छास्त्र पौरुष अनर्थास कारण होतें व शास्त्रित परमार्थास कारण होतें. अनर्थ म्हणजे नरक व परमार्थ म्हणजे स्वर्गादि. अर्थांतील परम अर्थ—मोक्ष. २

आबाल्यादलमभ्यस्तैः शास्त्रसत्संगमादिभिः ॥
गुणैः पुरुषयत्नेन सोऽर्थः संपाद्यते हितः ॥ ३ ॥

अगदीं बालपणापासून उत्तम प्रकारें ज्यांचा अभ्यास केला आहे अशा-शास्त्र, सत्संग इत्यादि गुणांच्या योगानें दृढ प्रयत्न केला असतां तो कल्याण-रूप अर्थ प्राप्त होतो ३. हें ऐकून राम म्हणतोः—

प्राक्तनं वासनाजालं नियोजयति मां यथा ॥
मुनेत तथैव तिष्ठामि कृपणः किं करोम्यहम् ॥ ४ ॥

मुनिवर्य, प्राक्तनवासनासमूह मला जशी जशी प्रेरणा करितो त्याप्रमाणेंच मी व्यवहार करितों. म्यां कृपणानें काय करावें ? (मी वासनांच्या अधीन आहें; वाटेल तसा प्रयत्न करण्यास स्वतंत्र नाहीं, असा याचा भावार्थ.) प्राक्तन वासना म्हणजे पूर्वजन्मीं केलेल्या धर्माधर्माचे जीवगत संस्कार. ४. रामाचें हें दैन्य पाहून वसिष्ठ म्हणतात,

अत एव हि हे राम श्रेयः प्राप्नोषि शाश्वतम् ॥
स्वप्रयत्नोपनीतेन पौरुषेणैव नान्यथा ॥ ५ ॥

हे रामा, 'मी वासना—परतंत्र आहें,' असें तुला वाटत आहे म्हणूनच स्वप्रयत्नानें केलेल्या कायिक, वाचिक व मानसिक व्यापारानें तूं शाश्वत कल्याणास प्राप्त होशील. त्यावांचून तुझें परम कल्याण होणार नाहीं. सारांश; तें तुझें भ्रामक पारतंत्र्य नाहींसें करण्याकरितां मोठ्या उत्साहामुळें प्राप्त होणाऱ्या प्रयत्नाचीच अपेक्षा आहे. ५. कारण—

द्विविधो वासनाव्यूहः शुभश्चैवाशुभश्च ते ॥
प्राक्तनो विद्यते राम द्वयोरेकतरोऽथ वा ॥ ६ ॥

शुभ व अशुभ असा दोन प्रकारचा प्राक्तन वासनासमूह असतो. पण बा रामा, शुभ व अशुभ म्हणजे धर्म व अधर्म हे दोन्ही तुला कर्मामध्यें नियुक्त करितात कीं एकच ? व एकच जर तुला प्रेरणा करीत असला, तर तो कोणता; शुभ कीं अशुभ ? ६.

वासनौघेन शुद्धेन तत्र चेदपनीयसे ॥
तत्क्रमेणाशु तेनैव पदं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ७ ॥

त्यांतील शुद्ध वासना–ओघानें जर तूं प्रेरित होत असशील, तर तुला आणखी निराळ्या प्रयत्नाची आवश्यकता नाहीं. कारण त्याच क्रमानें तुला शाश्वत स्थान प्राप्त होईल. ७

अथ चेदशुभो भावस्त्वां योजयति सङ्कटे ॥
प्राक्तनस्तदसौ यत्नाज्जेतव्यो भवता स्वयम् ॥ ८ ॥

पण अशुभ वासना जर तुला संकटांत पाडीत असेल तर अशुभाच्या विरोधी जो शास्त्रीय धर्म, त्याच्या अनुष्ठानानें तुला तिला स्वतः जिंकलें पाहिजे. ८. कारण–

शुभाशुभाभ्यां मार्गाभ्यां वहन्ती वासनासरित् ॥
पौरुषेण प्रयत्नेन योजनीया शुभे पथि ॥ ९ ॥

शुभ व अशुभ या दोन मार्गांनीं वासनारूपी नदी वहात असते. यास्तव दीर्घ प्रयत्न करून तिची शुभ मार्गांतच योजना करावी. अशुभ मार्गानें तिला वाहूं देऊं नये. सारांश, शुभ व अशुभ या दोन्हीं वासना तुला प्रेरणा करीत असल्यास शुभ वासनेस प्रतिबंध करण्याचें कारणच नसल्यामुळें तिच्या करितां प्रयत्नाची मुळींच आवश्यकता नाहीं. पण अशुभ वासनेचें निवारण करण्याकरितां शास्त्रीय प्रयत्न करून अशुभ कर्माबद्दल शुभ कर्मच केलें पाहिजे.

अशुभेषु समाविष्टं शुभेष्वेवावतारयेत् ॥
स्वमनः पुरुषार्थेन बलेन बलिनां वर ॥ १० ॥

हे बलवानांतील श्रेष्ठा, परस्त्री, परद्रव्य इत्यादि अशुभामध्यें आसक्त झालेलें आपलें मन प्रबल पुरुषार्थाच्या योगानें शास्त्रार्थ, देवताध्यान इत्यादि शुभामध्यें प्रवृत्त करावें. १०. कारणः–

अशुभाच्चालितं याति शुभं तस्मादपीतरत् ॥
जन्तोश्चित्तं तु शिशुवत्तस्मात्तच्चालयेद्बलात् ॥ ११ ॥

माती खात असलेल्या बालकास त्या मृद्भक्षणापासून निवृत्त करून ज्या-प्रमाणें फलादि हितकर पदार्थ खावयास लावितात; किंवा रत्नें, मोत्यें यांस

त ५.कू लागल्यास त्याच्या हातांत चेंडू देऊन जसें त्यास त्या अनर्थावह कर्मापासून हटवितात, त्याप्रमाणें प्राण्याचें चित्तही अशुभापासून परतवून बलात्कारानें शुभामध्यें लावावें. कारण बालकाप्रमाणेंच तेंही अशुभापासून परतविलें असतां शुभाकडे वळतें व शुभापासून परतविलें असतां अशुभाकडे जातें असा नियम आहे. सत्संग, शास्त्रविचार, इत्यादि त्यास शुभमार्गांत प्रवृत्त करण्याचे उपाय आहेत. ११

**समता सान्त्वनेनाशु न द्रागिति शनैः शनैः ॥**
**पौरुषेण प्रयत्नेन लालयेच्चित्तबालकम् ॥ १२ ॥**

उडाण गुरास गोठ्यांत नेण्याचे दोन उपाय आहेत. एक हिरवें गवत दाखविणें, खाजविणें इत्यादि सौम्य व दुसरा मोठ्यानें ओरडणें; काठी उगारणें इत्यादि तीव्र. त्यांतील पहिल्या उपायानें तें त्वरित दाव्यावर जातें व दुसऱ्या उपायानें इकडे तिकडे पळण्याचा प्रयत्न करीत हळु हळु इष्ट स्थानीं जातें. त्याचप्रमाणें १ शत्रुमित्रादिकांचे ठायीं समभाव ठेवून चित्तास स्वाभाविक शांतींत निमग्न करणें; आणि २ प्राणायाम, प्रत्याहार, इत्यादि पौरुष प्रयत्न: असे चित्तशांतीचे दोन उपाय आहेत. त्यांतील पहिल्या मृदु उपायानें चित्तरूपी बालकाचें लालन शीघ्र करावें व दुसऱ्या हठ योगानें त्याचें लालन एकाएकीं करूं नये, तर हळु हळु करावें. १२.

**द्रागभ्यासवशाद्याति यदा ते वासनोदयम् ॥**
**तदाभ्यासस्य साफल्यं विद्धि त्वमरिमर्दन ॥ १३ ॥**

हे शत्रुनाशना, तुला मृदुयोगाच्या अभ्यासामुळें त्वरित सद्वासना झाली असतां, अभ्यास सफल झाला असें तूं समज. थोड्या काळांत अभ्यास सफल कसा होईल अशी शंका घेऊं नकोस. मृदुयोगाचा तसाच अचिंत्य प्रभाव आहे. १३.

**संदिग्धायामपि भृशं शुभामेव समाहर ॥**
**शुभायां वासनावृद्धौ तात दोषो न कश्चन ॥ १४ ॥**

शुभ वासनेचा अभ्यास करीत असतांना ती संपूर्ण झाली कीं नाहीं असा मनांत संदेह आला तरी त्या शुभ वासनेचाच अभ्यास करावा. याविषयीं

एक उदाहरण देतों. सहस्र जप करण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषास दहावा शेंकडा मी केला कीं नाहीं, असा संदेह आल्यास पुनः नऊशेंपासून पुढचा शंभर जप करावा. कारण तसें केल्यानें खरोखरच जप कमी असल्यास पूर्ण होतो व कमी नसल्यास जप अधिक होतो. त्यामुळें सहस्र जपास कांहीं दोष लागत नाहीं. यास्तव या रामा, शुभ वासनेचा अभ्यास करावा. ती वाढली असतां कांहीं दोष लागत नाहीं; उलट एकप्रकारें लाभच होतो. १४

अव्युत्पन्नमना यावद्भवानज्ञाततत्पदः ॥
गुरुशास्त्रप्रमाणैस्तु निर्णीतं तावदाचर ॥ १५ ॥
ततः पक्वकषायेण नूनं विज्ञातवस्तुना ॥
शुभोऽप्यसौ त्वया त्याज्यो वासनौघो निराधिना ॥ १६ ॥
यदतिसुभगमार्यसेवितं तच्छुभमनुसृत्य मनोज्ञभावबुद्ध्या ॥
अधिगमय पदं यदद्वितीयं तदनु तदप्यवमुच्य साधु तिष्ठ ॥ १७॥

रामा, जोंपर्यंत तुझ्या मनास तत्त्व बोध झालेला नाहीं व तें परम पद तुला अज्ञात आहे तोंपर्यंत गुरु व शास्त्र यांनीं निर्णय केल्याप्रमाणें तूं आचरण कर. १५ पुढें आसक्ति, क्रोध इत्यादि मल निघून गेले असतां व त्यामुळेंच वस्तूचें ज्ञान झालें असतां मानसिक दुःखरहित असलेल्या तूं शुभवासनांचाही त्याग करावा. १६. श्रेष्ठांनीं ज्याचें सेवन केलें आहे व जें अत्यंत शुभ फल देणारें आहे अशा शुभाचें आचरण करून शुभवासनायुक्त बुद्धीनें तूं त्या परम पदाचा साक्षात्कार कर. नंतर शुभवासनेचें अनुकरण करण्याचेंही सोडून तूं स्वस्वरूपीं स्थिर होऊन रहा. १७.

असो; तर या सर्व श्लोकसंदर्भावरून योगाभ्यासानें कामादिकांचा पराभव होणें शक्य आहे असें ठरतें. करितां या जीवन्मुक्तीकरितां वाद करूं नये.

॥ इति जीवन्मुक्तिस्वरूपं ॥

या जीवन्मुक्तीविषयीं श्रुतिस्मृति वचनें प्रमाण आहेत. कठवल्लींत " विमुक्तश्च विमुच्यते " असें वचन आहे. जीवंत असतांनाच कामादि दृष्ट बंधापासून विशेषतः मुक्त होत्साता पुरुष मरणानंतर भावि बन्धापासून ( ह्मणजे उत्तर जन्मरूपी अदृष्ट बंधापासून ) विशेषतः मुक्त होतो असा याचा भावार्थ आहे. ज्ञान होण्यापूर्वींही शम-दमादि साधनांचें संपादन केल्यानें पुरुष कामादि दृष्ट

( प्रत्यक्ष ) बंधापासून मुक्त होतो हें खरें; पण त्या अवस्थेंत उत्पन्न झालेल्या कामादिकांचा निरोध प्रयत्नानें करावा लागतो; आणि या ज्ञान-अवस्थेंत बुद्धिवृत्तीचा अभावच झाल्यामुळें कामादिकांची उत्पत्तिच होत नाहीं. ह्मणून —विशेषतः मुक्त होत्साता—असें वर ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें मरणसमयीं देहपात झाला असतां प्राणी कांहीं काल भावि देहबंधांतून नेहमींच मुक्त होत असतो; पण ज्ञानी पुनः कधींही देहबंधांत पडत नाहीं. अर्थांत त्यास परम मोक्ष प्राप्त होतो हें सुचविण्याकरितां वरच्या वाक्यांत 'विशेषतः मुक्त होतो' असें ह्मटलें आहे. बृहदारण्यकांत—या पुरुषाच्या हृदयाचा आश्रय करून असलेले सर्व काम जेव्हां सर्वथैव नष्ट होतात तेव्हां मनुष्य अमृत ( मुक्त ) होतो व जीवंतपणींच ब्रह्मानुभव घेतो.—अशा अर्थाचें वचन आहे. दुसऱ्या एका उपनिषदांत नेत्रयुक्त असूनही नेत्ररहित असल्यासारिखा, कर्णयुक्त असूनही कर्णरहित असल्यासारिखा, मनोयुक्त असून मनावांचून असल्यासारिखा अर्थात् दर्शन, श्रवण, मनन इत्यादि वृत्तियुक्त क्रिया न करणारा, असें ह्मटलें आहे. अशींच आणखींही अनेक श्रुतिवचनें दाखवितां येतात. स्मृतींतही जीवन्मुक्त-स्थितप्रज्ञ—भगवद्भक्त—गुणातीत—ब्राह्मण, अतिवर्णाश्रमी, इत्यादि नांवांनीं याच अवस्थेचें ठिकठिकाणीं वर्णन केलेलें आहे. वसिष्ठ व राम यांचा जीवन्मुक्तीविषयीं असा संवाद झाला आहे:—

वसिष्ठः—

> नृणां ज्ञानैकनिष्ठानामात्मज्ञानविचारिणाम् ॥
> सा जीवन्मुक्ततोदेति विदेहान्मुक्ततेव या ॥ १ ॥

वसिष्ठ ह्मणतातः—सर्व लौकिक व वैदिक कर्में सोडून केवल ज्ञाननिष्ठ व आत्मज्ञानाचा विचार करणाऱ्या पुरुषांस विदेहमुक्तीसारखीच जीवन्मुक्ति प्राप्त होते. जीवन्मुक्तींत देह, इंद्रियें इत्यादिकांचा संबंध असतो व विदेहमुक्तींत तो नसतो; असें जरी सामान्यतः या दोन अवस्थांत अंतर आहे तरी त्यांच्या —द्वैत न भासणें—या अनुभवांत कांहीं एक अंतर नसतें. कारण दोन्हीं मुक्तांस चित्तवृत्तींच्या क्षयामुळें द्वैताचें भान एकसारिखेंच होत नाहीं !

श्रीरामः—

> ब्रह्मन्विदेहमुक्तस्य जीवन्मुक्तस्य लक्षणम् ॥
> ब्रूहि येन तथैवाहं यते शास्त्रगया दृशा ॥ २ ॥

श्रीरामः—हे मुनिराज, विदेह मुक्ताचें व जीवन्मुक्ताचें लक्षण मला सांगा. म्हणजे शास्त्रीय दृष्टीनें मी तसाच प्रयत्न करीन. २

वसिष्ठः—

यथास्थितमिदं यस्य व्यवहारवतोऽपि च ॥
अस्तंगतं स्थितं व्योम स जीवन्मुक्त उच्यते ॥ ३ ॥

वसिष्ठः—महाप्रलयसमयीं अनुभवास येणारें हें–पर्वत, नद्या, समुद्र, भूमि, वृक्ष, पाषाण, चतुर्विध प्राणी इत्यादिकांनीं भरलेलें–जग, ज्ञात्या जीवांच्या शरीरेंद्रियादिकांच्या व्यापारासह अस्त पावतें. म्हणजे परमेश्वरानें त्या सर्वांचा उपसंहार केला असतां त्याचें स्वरूपच नष्ट होतें. पण जीवन्मुक्त अवस्थेंत तसें होत नाहीं. तर देह, इंद्रियें यांचा व्यवहार होत असतो. पर्वत, नद्या, इत्यादिकांचा ईश्वरानें संहार केलेला नसल्यामुळें त्या सर्वांचा अनुभव इतर प्राण्यांस नेहमींप्रमाणें स्पष्टपणें येतच असतो; परंतु जीवनन्मुक्तास जगाचा अनुभव करविणारी वृत्तिच नसल्यामुळें निद्रेप्रमाणें सर्व अस्त पावल्यासारिखें वाटतें व केवल स्वयंप्रकाशित होणारें चिदाकाश अवशिष्ट रहातें. बद्ध पुरुषासही सुषुप्तींत जगाचा अनुभव येत नाहीं, कारण जीवन्मुक्ताच्या सार्वकालिक चित्तवृत्तिक्षयाप्रमाणें त्याच्याही वृत्तींचा तेवढ्या वेळे पुरता अभावच असतो. पण पुढच्या जाग्रत् व स्वप्न अवस्थेंत उत्पन्न होणाऱ्या त्याच्या वृत्तींचें बीज नाहींसें झालेलें नसतें, ह्मणून त्यास जीवन्मुक्त ह्मणतां येत नाहीं. तात्पर्य बद्ध पुरुषाच्या सुषुप्तीप्रमाणें जीवन्मुक्ताची सहज स्थिति असते आह्मांस निद्रासमयीं जसें जग भासत नाहीं तसें त्यास तें तिन्हीं अवस्थांत भासत नाहीं. ३.

नोदेति नास्तमायाति सुखदुःखैर्मुखप्रभा ॥
यथा प्राप्ते स्थितिर्यस्य स जीवन्मुक्त उच्यते ॥ ४ ॥

सुख झालें असतां मुखप्रभा चमकूं लागणें व दुःख झालें असतां ती नाहींशी होणें, हा बद्धांचा स्वाभाविक धर्म आहे. पण जीवन्मुक्ताच्या मुखप्रभेचा सुखदुःखांच्या योगानें उद्भव व नाश होत नाहीं, तर तो जी अवस्था येईल तिच्यामध्यें आनंदानें रहातो. सुखसाधनें व सत्कारादि यांच्या योगानें प्राकृत जन कसे सुखी होतात व धनादि सुखसाधनांची हानि व अपमानादि झाला असतां ते कसे दीन होतात हें प्रसिद्ध आहे. वर्तमानसमयीं प्रयत्न

केल्यावाचून प्रारब्धानुरूप जें अन्नादि केवल देहरक्षणाचें साधन प्राप्त होईल त्याच्यावर देहरक्षा करणें हें जीवन्मुक्ताचें लक्षण आहे, अशा माहात्म्याचें चित्त अत्यंत स्थिर झालेलें असल्यामुळें, त्याला धन, स्त्री इत्यादि सुखसाधनांची प्रतीतीच येत नाहीं. व जरी कदाचित् चित्त अस्थिर झाल्यामुळें त्यास त्यांचा अनुभव आला, तरी त्याचा विवेक दृढ असल्यामुळें, म्हणजे हे अनात्मपदार्थ आहेत, यास्तव त्यांतील एकही मला अनुकूल किंवा प्रतिकूल नाहीं, असा त्याचा दृढ निश्चय असतो, यास्तव त्यास हर्षविषाद न होणें साहजिक आहे. ४

वरील दोन श्लोकांत जीवन्मुक्तांचीं दोन लक्षणें सांगितलीं, आतां तिसरें सांगतात:—

यो जागर्ति सुषुप्तिस्थो यस्य जाग्रन्न विद्यते ॥
यस्य निर्वासनो बोधः स जीवन्मुक्त उच्यते ॥ ५ ॥

नेत्रादि इंद्रियें आपापल्या–डोळे, कान, नाक, इत्यादि गोलकांत असल्या मुळें, ह्मणजे त्यांचा चित्तांत लय झालेला नसल्यामुळें जो जागत आहे पण मन वृत्तिरहित असल्यामुळें जो सुषुप्तींत आहे; आणि त्यामुळेंच ज्या अवस्थेत इंद्रियांच्या योगानें विषयांचा अनुभव येतो ती जाग्रत् या लक्षणाची जाग्रत् ज्यास नसते; व बोध झाल्यावरही कांहीं लोकांमध्यें–मी ब्रह्मज्ञानी आहें, माझा लोकांनीं सत्कार करावा, माझी धनादिदानानें पूजा करावी–इत्यादि बुद्धिदोष असतात; त्यांची निवृत्ति करण्याकरितां ज्याचा बोध वासनारहित आहे, त्यास जीवन्मुक्त ह्मणतात, असें या श्लोकांत ह्मटलें आहे. वासनावृत्तिच नसल्यामुळें वरील बुद्धिदोषही अ शकत नाहींत. ५

आतां जीवन्मुक्ताचें चवथें लक्षण सांगतात:—

रागद्वेषभयादीनामनुरूपं चरन्नपि ॥
योऽन्तर्व्योमवदत्यच्छः स जीवन्मुक्त उच्यते ॥ ६ ॥

रागानुरूप भोजनादि अवश्य कर्मामध्यें प्रवृत्ति; द्वेषानुरूप बौद्ध, नास्तिक, भ्रष्ट, अन्याय करणारे, इत्यादिकांपासून पराङ्मुख होणें; भयानुरूप सर्प, व्याघ्र इत्यादिकांपासून पळ काढणें; (आदिशब्दानें मात्सर्यादिकांचें ग्रहण करावें.) मात्सर्यानुरूप इतर योग्यांपेक्षां समाधीचें अधिक अनुष्ठान करणें इत्यादि क्रिया व्युत्थान–अवस्थेत करीत असूनही चित्त मलरहित असल्यामुळें, जो आंत आकाशाप्रमाणें स्वच्छ असतो तो जीवन्मुक्त होय. आकाशांत धूर

धूळ, मेघ इत्यादि असले तरी तें निर्लेप असल्यामुळें जसें स्वरूपतः स्वच्छ असतें त्याप्रमाणें—असा आकाशदृष्टांताचा भावार्थ समजावा. व्युत्थान दशा म्हणजे समाधि सोडून स्नान, भिक्षा इत्यादि अवश्य क्रिया करण्याची दशा. ६

आतां जीवन्मुक्ताचें पांचवें लक्षण सांगतातः—

> यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥
> कुर्वतोऽकुर्वतो वापि स जीवन्मुक्त उच्यते ॥ ७ ॥

कर्मादि करीत असतांना अथवा करीत नसतांनाही ज्याचा आत्मा आंतून अहंकारानें आच्छादित झालेला नसतो व ज्याच्या बुद्धीस संशय येत नाहीं तो जीवन्मुक्त होय. व्यवहारांत बद्ध पुरुष शास्त्रीय कर्म करूं लागला असतां "मी कर्ता आहें" अशा भावनेनें त्याचा चिदात्मा आंत आच्छादित होतो, व "मला स्वर्ग मिळेल" अशा हर्षानें त्याची बुद्धि लिप्त होते. त्याचप्रमाणें त्यानें कर्म करावयाचें सोडिलें असतां "मी कर्मांचा त्याग केला आहे" असा अहंकार व स्वर्गाचा लाभ न झाल्यास खेद होणें हा लेप त्यास होतो. पण जीवन्मुक्त बुद्धीच्या ठायीं साक्षीचा तादात्म्य अध्यास करीत नाहीं. व त्यामुळें त्यास हर्षादिकही होत नाहींत. ७

जीवन्मुक्ताचें सहावें लक्षण सांगतातः—

> यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ॥
> हर्षामर्षभयान्मुक्तः स जीवन्मुक्त उच्यते ॥ ८ ॥

निन्दा करणें, भेटेल त्यास ताडण करीत सुटणें इत्यादि लोकभयजनक कृत्यांत प्रवृत्त न होणाऱ्या यास कोणी भीत नाहीं व त्यामुळेंच याचीही कोणी निन्दा इत्यादि करीत नसल्यामुळें हा कोणास भीत नाहीं. अथवा कांहीं दुर्जनांनीं जरी यास ताडनादि केलें तरी हा स्थिरचित्त असल्यामुळें उद्विग्न होत नाहीं आणि त्याचप्रमाणें जो हर्ष, क्रोध व भय यांनींही रहित असतो त्यास जीवन्मुक्त म्हणतात. ८

जीवन्मुक्ताचें सातवें लक्षण सांगतातः—

> शान्तसंसारकलनः कलावानपि निष्कलः ॥
> यः सचित्तोऽपि निश्चित्तः स जीवन्मुक्त उच्यते ॥ ९ ॥

हा मित्र आहे; हा शत्रु आहे; माझा अपमान झाला; माझा सत्कार केला इत्यादि विकल्प ह्याच संसारकलना आहेत. त्या ज्याच्या शांत झाल्या आहेत; चौसष्ट कला येत असूनही त्याच्याविषयीं जो अभिमानादि करीत नाहीं, चित्ताचा स्वरूपतः नाश झाला नसला तरी तें वृत्तिरहित असल्यामुळें जो चित्तरहित असल्याप्रमाणें रहातो तो जीवन्मुक्त होय ९.

जीवन्मुक्ताचें आणखी एक लक्षण सांगून हा विषय समाप्त करितातः—

यः समस्तार्थजातेषु व्यवहार्यपिशीतलः ॥
परार्थेष्विव पूर्णात्मा स जीवन्मुक्त उच्यते ॥ १० ॥

दुसऱ्याच्या घरीं विवाहादि कार्यें मांडलीं असतां तेथें जाऊन त्या घरच्या स्वामीस आनंद व्हावा म्हणून त्याचें पडेल तें कार्य करीत असला तरी जो लाभ, अलाभ, हर्ष, खेद इत्यादि बुद्धिसंतापांस प्राप्त होत नाहीं व त्याप्रमाणेंच आपल्या कार्यांमध्येंही जो शीतल असतो तो जीवन्मुक्त होय. चित्तास संताप होत नसल्यामुळेंच केवल तो शीतल असतो असें नाहीं तर आपल्या परिपूर्ण स्वरूपाचें अनुसंधान करीत असल्यामुळेंही तो अंतःकरणांत शीतल असतो. १० इति जीवन्मुक्तलक्षणम् ॥

आतां अगोदर विदेहमुक्ताचें स्वरूप सांगतातः—

जीवन्मुक्तपदं त्यक्त्वा स्वदेहे कालसात्कृते ॥
विशत्यदेहमुक्तत्वं पवनोऽस्पन्दतामिव ॥ १ ॥

ज्याप्रमाणें वायु केव्हां केव्हां आपलें चलन सोडून निश्चलरूपानें रहातो त्याप्रमाणें मुक्तात्माही देह कालाच्या अधीन झाला असतां, जीवन्मुक्ताची अवस्था सोडून विदेहमुक्तींत प्रवेश करितो. म्हणजे उपाधिकृत संसाराचा त्याग करून आपल्या परमरूपानें रहातो. १

विदेह मुक्ताचें सामान्य लक्षण सांगतातः—

विदेहमुक्तो नोदेति नास्तमेति न शाम्यति ॥
न सन्नासन्न दूरस्थो न चाहं न च नेतरः ॥ २ ॥

विदेहमुक्त हर्षयुक्त होत नाहीं; खिन्न होत नाहीं; शांतही होत नाहीं (म्हणजे हर्षविषादांचा त्यागही करीत नाहीं); लिंगदेहाचा येथेंच लय झाल्यामुळें त्यास सत् असें म्हणतां येत नाहीं. (म्हणजे अविद्या ही ज्याची उपाधि आहे असा

हा जगास कारण होणारा प्राज्ञ किंवा मायोपाधि ईश्वर आहे, असें म्हणतां येत नाहीं.) त्याचप्रमाणें भूत व भौतिक वस्तूंप्रमाणें त्यास असत्‌ही म्हणतां येत नाहीं. हा मायातीत आहे असाही निर्णय होत नाहीं. विदेहमुक्तास अहं असें म्हणतां येत नाहीं व तो समष्टि ईश्वर आहे असेंही ठरत नाहीं. सारांश, त्याचा कोणत्याही प्रकारें व्यवहार करितां येत नाहीं. २

तर मग त्याचें विशेष लक्षण काय? या प्रश्नाचें उत्तर सांगतातः—

ततः स्तिमितगंभीरं न तेजोनतमस्ततम् ॥
अनाख्यमनभिव्यक्तं सत्किंचिदवशिष्यते ॥ २ ॥

देहपात झाल्यावर स्तिमित (स्थिर) गंभीर, ज्याला तेज म्हणतां येत नाहीं व तम अशीही संज्ञा देतां येत नाहीं, जें अनिर्वचनीय व अव्यक्त असें कांहीं "सत्" अवशिष्ट रहातें. सारांश विदेहमुक्ताचें कोणतेंच लक्षण सांगतां येत नाहीं. ब्रह्मरूप तत्त्वाचें लक्षण कसें सांगतां येणार? ज्याच्याविषयीं कांहींच सांगतां येत नाहीं असें "सत्" असतें एवढेंच, फार तर त्याच्याविषयीं म्हणतां येईल. ३

जीवन्मुक्त पुरुषाच्या शांतिप्रमुख गुणांचा जसा जसा उत्कर्ष होत जातो, तसा तसा तो उत्तम जीवन्मुक्त होतो; व शेवटीं विदेहमुक्ताप्रमाणेंच त्याचा उत्कर्ष होतो.

असो; येथवर योगवासिष्ठांतील जीवन्मुक्ताचीं लक्षणें सांगितलीं व प्रसंगोपात्त विदेहमुक्ताची अनिर्वाच्यताही वर्णिली. आतां भगवद्गीतेंतील स्थितप्रज्ञाचीं लक्षणें सांगतोंः—

अर्जुन उवाच—

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ॥
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ १ ॥

प्रज्ञा म्हणजे तत्त्वज्ञान. तें स्थित व अस्थित असें दोन प्रकारचें असतें. जाराचे ठायीं अनुरक्त असलेल्या स्त्रीचें चित्त, ती सर्व व्यवहार करीत असली तरी, त्या जाराचेंच चिंतन करीत असते; त्यामुळें नेत्रादि प्रमाणांनीं ज्यांचा अनुभव आला आहे व जीं ती स्वतः करीत आहे, अशा गृहकर्मांचाही तिला तात्काल विसर पडतो. अत्यंत आसक्तीची बरोबर कल्पना येण्याकरितां हा

दृष्टांत येथें दिला आहे. पण सामान्य मनुष्याचेंही चित्त ज्या विषयांत आसक्त झालेलें असतें त्याचेंच तो सतत चिंतन करितो व त्यामुळें इतर सर्व तो विसरतो, हें आपल्या अनुभवावरूनच आपणास समजण्यासारखें आहे. त्याप्रमाणें ज्यानें परम वैराग्यानें युक्त होऊन व दीर्घ काल योगाभ्यास करून आपलें चित्त आपल्या वश करून घेतलें आहे, त्यास तत्त्वज्ञान झालें असतां, त्याचें चित्त सतत तत्त्वाचेंच ध्यान करीत रहातें. हें स्थितप्रज्ञान होय. पण वैराग्यादि गुणरहित पुरुषास जरी कांहीं पुण्यप्रभावामुळें एकादे वेळीं तत्त्वज्ञान झालें तरी तें तो तात्काल विसरतो. कारण त्याचें चित्त गृहकर्मांत व्यग्र असतें. या त्याच्या तत्त्वज्ञानास अस्थितप्रज्ञान म्हणावें. योगवासिष्ठांतही वरील दृष्टांत देऊन हेंच सांगितलें आहे. असो; स्थितप्रज्ञानानें जो युक्त असतो त्यास स्थितप्रज्ञ म्हणतात. त्याचेही समाहितस्थितप्रज्ञ व व्युत्थितस्थितप्रज्ञ असे कालावरून होणारे दोन भेद आहेत. त्या उभय स्थितप्रज्ञांचें लक्षण या श्लोकाच्या क्रमानें पूर्वार्धानें व उत्तरार्धानें अर्जुन विचारीत आहे. समाधिस्थ स्थितप्रज्ञाचें लक्षण काय आहे ? म्हणजे कोणत्या लक्षणवाचक शब्दांनीं सर्व लोक याच्याविषयीं बोलतात ? त्याचप्रमाणें व्युत्थित म्हणजे समाधि सोडून उठलेला स्थितप्रज्ञ स्वतः कसा वाग्व्यवहार करितो म्हणजे कसें भाषण करितो ? त्याचप्रमाणें त्याचें बसणें व गमन करणें या क्रिया, मूर्खांच्या त्या त्या क्रियांहून कशा विलक्षण असतात ? १.

श्रीभगवानुवाच—

> प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ॥
> आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ २ ॥

बाह्य, आंतर, व वासनारूप असे काम तीन प्रकारचे आहेत. संपादन केलेले लाडु इत्यादि बाह्य काम होत. केवल मनोरथ करणें हे आंतर काम आहेत व मार्गांत पडलेल्या तृणादिकांप्रमाणें सहज अनुभवास येणाऱ्या कामास वासनारूप काम म्हणतात. जो समाहित म्हणजे समाधि लावून बसलेला असतो त्याच्या सर्व चित्तवृत्ति क्षीण झालेल्या असल्यामुळें तो सर्व कामांस सोडतो. ( त्यांचा परित्याग करितो. ) त्यामुळें त्यास परम संतोष होतो. व त्याच्या मुखावरील प्रसन्नतेस पाहून त्या संतोषाचें प्रत्येकास अनुमान होतें. पण तो समाहित स्थितप्रज्ञ कामामध्यें आसक्त झाल्यामुळें त्यास तो संतोष

होतो असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. कारण कामाचा त्यानें पूर्वींच त्याग केलेला असतो, व बुद्धि परमानंदरूपानें आत्म्याच्या सन्मुख झालेली असते. यास्तव त्यास तो आनंद आत्म्यामध्यें निमग्न झाल्यामुळेंच होतो हें निर्विवाद आहे. शिवाय त्या आनंदाचा अनुभव मनोवृत्तीच्या द्वारा होत नाहीं, तर स्वप्रकाश चैतन्यरूप आत्म्याच्या द्वारा होतो. ह्मणजे तो त्याचा संतोष वृत्तिरूप नसतो तर संस्काररूप असतो. सारांश, अशाप्रकारच्या लक्षणबोधक शब्दांनीं समाधिस्थ स्थितप्रज्ञाचें लक्षण सांगतात. २.

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ॥
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ३ ॥

दुःख ह्मणजे आसक्ति, प्रेम, इत्यादि निमित्तामुळें उत्पन्न होणारी रजोगुणाच्या परिणामरूप व संतापात्मक प्रतिकूल चित्तवृत्ति. अशा प्रकारचें संतापरूपी दुःख झालें असतां मी पापी आहें, मज दुरात्म्यास धिक्कार असो; अशी पश्चात्तापरूप चित्तवृत्ति होणें यास उद्वेग ह्मणतात. पण तो तमोगुणाचा विकार असल्यामुळें त्यास पश्चात्ताप न ह्मणतां भ्रांति ह्मणावें लागतें. कारण “ मी पापी आहें ” इत्यादि पश्चात्ताप होणें हा एक प्रकारचा विवेकच आहे असें भासतें; हें खरें. पण तोच जर पापप्रवृत्तीच्या वेळीं ( म्हणजे पूर्वजन्मीं पाप केलें त्यावेळीं ) झाला असतां, तर त्यानें पापप्रवृत्तीस प्रतिबंध केला असता आणि त्यामुळें तो सफल होता. पण आता त्याचें होणें व्यर्थ असल्यामुळें तो विवेक नसून भ्रांतिच आहे असें समजावें. येथपर्यंत दुःख व उद्वेग या दोन शब्दांचा अर्थ निश्चित केला. आतां सुख आणि स्पृहा यांचा अर्थ सांगून सर्व श्लोकाचा अर्थ थोडक्यांत स्पष्ट करितों. राज्य, पुत्र इत्यादि इष्ट वस्तूंचा लाभ झाला असतां प्रीतिरूप अनुकूल सात्त्विक वृत्ति चित्तांत उद्भवते तिलाच सुख म्हणतात. अशा प्रकारचें सुख झालें असतां सुखाचें कारण जें पुण्य, त्याचें अनुष्ठान न करितां पुनःही तसेंच सुख व्हावें अशी व्यर्थ आशा करणें, हीच स्पृहा होय. ही चित्ताची तामसी वृत्ति आहे. राग, भय, सुख व क्रोध, याही चित्ताच्या तामसी वृत्तिच आहेत. असो; व्युत्थित स्थितप्रज्ञास सुख व दुःख यांचा अनुभव होतो. कारण त्या अवस्थेंत त्याचें चित्त समाहित नसल्यामुळें प्रारब्धकर्माप्रमाणें सुख व दुःख यांस व्यक्त करणाऱ्या अनुकूल व प्रतिकूल चित्तवृत्ति

उद्भवणें शक्य असतें, पण त्याचा विवेक सर्वदां जागत असल्यामुळें, त्यास उद्वेग व स्पृहा होणें शक्य नसतें. रागादि तामस वृत्तींचा तर त्याचे ठायीं असंभवच आहे. कारण त्या वृत्ति प्रारब्ध कर्मामुळें उत्पन्न झालेल्या नसतात. सुख व दुःखरूप सात्विक व राजस वृत्ति मात्र प्रारब्धामुळें उद्भवतात. कारण त्यांच्या द्वारा होणारें सुख व दुःख हें प्रारब्धाचें फल आहे. व तें देण्याकरितां प्रारब्ध त्या वृत्तींस उत्पन्न करितें. पण मोहरूप–तामस वृत्तींपासून प्रारब्धाचें कांहींच कार्य होत नसल्यामुळें, तें त्या वृत्तींस उत्पन्न करीत नाहीं. एवढ्याकरितांच अध्यात्म शास्त्रांत रागद्वेषांच्या अधीन न होण्याविषयीं आग्रहानें सांगितलें आहे. उद्वेग, स्पृहा, प्रेम, क्रोध, भय इत्यादि तामसी वृत्तींचा परिणाम पापाचरणाच्या द्वारा दुःखामध्यें होतो, हें खरें, पण प्रतिकूल राजस वृत्तींप्रमाणें दुःख हा त्यांचा साक्षात् परिणाम नव्हे, हें येथें विसरतां कामा नये. असो; दुःख झालें असतां चित्त उद्विग्न न होणें, सुख झालें असतां स्पृहा न करणें आणि राग, भय, क्रोध यांच्या अधीन न होणें, हीं व्युत्थित स्थितप्रज्ञाचीं लक्षणें आहेत. तो मुनि आपला अनुभव प्रगट करून शिष्यांस उदाहरण घालून देण्याकरितां उद्वेगाभाव, स्पृहाभाव इत्यादिकांचें ज्ञान होईल असें भाषण करितो. ३

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ॥
नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ४ ॥

स्नेह ही सुद्धां एकाप्रकारची चित्तवृत्ति आहे. या स्नेहामुळेंच प्राणी दुसऱ्याची हानि, वृद्धि, दुःख किंवा सुख, आपल्या ठायीं आरोपित करीत असतो. जसें–पुत्राला रोग, दुःख इत्यादि झालें असतां, तें मलाच झालें आहे असें समजून त्याचा बाप, आई इत्यादि व्याकुळ होतात व त्यास द्रव्य, विद्या, आरोग्य इत्यादिकांचा लाभ झाला असतां हा आमचा लाभ आहे, असें तीं समजतात; पण या भ्रमाचें कारण स्नेह आहे. जो कोणत्याही वस्तूचे ठायीं असा स्नेह ठेवीत नाहीं तो स्थितप्रज्ञ होय. सुखास कारण होणारी स्वस्त्री, पुत्र, इत्यादि शुभ वस्तु होय. तिच्या गुणांचें वर्णन करावयास लागणाऱ्या चित्तवृत्तीस अभिनन्द म्हणतात. पण आपणास शुभ वाटणाऱ्या वस्तूचें वर्णन दुसऱ्यास ती वस्तु आवडावी या हेतूनें कोणी करीत नाहीं. यास्तव तें गुणवर्णन व्यर्थ आहे असेंच म्हणावें लागतें, आणि त्यामुळें त्या गुणवर्णनास कारण होणारा अभिनन्दही तामस ठरतो. कोणतीही व्यर्थ चित्तवृत्ति तामसी असते; हें वर

सुचविलेंच आहे. दुसऱ्याची विद्या, धन इत्यादि प्राण्यांच्या चित्तांत मत्सर उत्पन्न करितात. आणि त्या मत्सराच्या द्वारा दुसऱ्याची विद्या, धन, इत्यादि त्या मत्सरी प्राण्याच्या दुःखास कारण होतात. त्यामुळें परकीय उत्कर्ष हा प्राण्याचा अशुभ विषय ठरतो. त्याची निंदा करण्यास प्रवृत्त करणारी चित्तवृत्ति हाच द्वेष आहे. पण त्या अशुभाची, यानें कितीही जरी निन्दा केली तरी त्याची कांहींही हानि होत नाहीं. यास्तव निंदा करावयास लावणाऱ्या द्वेषास व्यर्थ म्हणावें लागतें. आणि त्यामुळेंच तोही तामसी भाव आहे. पण विवेकी व्युत्थित स्थितप्रज्ञाचे ठायीं स्नेह, अभिनन्द व द्वेष, हे तामसी भाव शुभाशुभादिकांची प्राप्ति झाली तरी उद्भवत नाहींत. ४

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ॥
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५ ॥

कांहीं भीतीचें निमित्त असतां, कूर्म ( कांसव ) ज्याप्रमाणें आपले सर्व अवयव तात्काळ आंत ओढून घेतो, त्याप्रमाणें जो आपलीं इंद्रियें विषयांपासून निवृत्त करितो, त्याची बुद्धि स्थित आहे असें समजावें. समाधि सोडून उठलेल्या ( व्युत्थित ) स्थितप्रज्ञाच्या अंतःकरणांत तामसी वृत्तींचा उदयच होणें संभवनीय नाहीं, हें वरच्या दोन श्लोकांत सांगितलेंच आहे. समाहित पुरुषाच्या अंतःकरणांत तर कोणत्याच वृत्ति नसतात. मग तामसी वृत्ति कोठून उद्भवणार ? असा या श्लोकाचा अभिप्राय आहे. ५

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ॥
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ६ ॥

प्रारब्ध कर्म, सुख व दुःख यांस कारण होणाऱ्या चंद्रोदय, अंधकार इत्यादि कांहीं विषयांस आपणच संपादन करितें; व गृह, क्षेत्र इत्यादि दुसऱ्या कित्येक विषयांस पुरुषाच्या योगानें तें संपादन करितें. त्यांतील चंद्रोदयादि पुरुषाच्या उद्योगाच्या प्रयत्नावांचून प्राप्त झालेल्या विषयांची निवृत्ति, इंद्रियांचा पूर्णपणें उपहार करणें, या समाधीच्या योगानेंच होते. दुसऱ्या कोणत्याही उपायानें ती होत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारच्या विषयाची निवृत्ति समाधीवांचूनही होते. निराहारस्य या शब्दांतील आहार म्हणजे उद्योग. निराहारस्य म्हणजे निरुद्योगी पुरुषाचे गृहादि विषय आपोआप निवृत्त होतात. पण रस निवृत्त होत नाहीं. रस म्हणजे मानसी तृष्णा. परंतु परमानंदरूप

परब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां स्वल्प आनंदास कारण होणाऱ्या इतर विषयांविषयींचा रसही निवृत्त होतो. ६

असो; या पुढील " यततो ह्यपि कौन्तेय०" व " तानि सर्वाणि संयम्य०" या दोन श्लोकांत इतर विषयांकरितां उद्योग न करितां केवळ ब्रह्मदर्शनाकरितांच प्रयत्न करणाऱ्या पुरुषानेंही कदाचित् घडणाऱ्या प्रमादांचा परिहार व्हावा म्हणून समाधीचा अभ्यास करावा असें सांगितलें आहे. " कथं आसीत " या अर्जुनाच्या वरील प्रश्नाचें हें उत्तर आहे. " ध्यायतो विषयान्० " व " क्रोधाद्भवति संमोहः० " या दोन श्लोकांत त्या व्युत्थित स्थितप्रज्ञानें समाधीचा अभ्यास न केल्यास एकामागून एक कसे प्रमाद घडतात तें सांगितलें आहे. विषयांचें चिंतन करूं लागतांच त्यांच्याविषयीं संग ( आसक्ति ) होतो; संगामुळें त्यांच्याविषयीं इच्छा होते; इच्छा पूर्ण न झाल्यास क्रोध येतो; क्रोधामुळें विवेक नाहींसा होतो; विवेक नाहींसा होतांच स्मृतिभ्रंश होतो, म्हणजे तत्त्वाचें अनुसंधान सुटतें; तत्त्वानुसंधान सुटलें कीं,– मी देहादिरूप आहें–अशी विपरीत भावना वाढल्यामुळें, पर्वी झालेल्या आत्मज्ञानाचें–मोक्ष देण्याचें–सामर्थ्य नष्ट होतें. व त्याच्या अभावीं पुरुष अधोगतीस जातो. विपरीत भावना हा मोठा दोष आहे व त्याच्यायोगानें प्रतिबद्ध झालेलें आत्मज्ञान मोक्ष देण्यास समर्थ होत नाहीं, हें वेदान्तशास्त्रांत स्पष्टपणें सांगितलेलें असतें. " रागद्वेषवियुक्तैस्तु० " या पुढच्या एका श्लोकांत जो आपल्या मनास वश ठेवून रागद्वेषरहित व स्ववश इंद्रियांनीं विषयोपभोग घेतो त्याच्या चित्तांत प्रसाद उत्पन्न होतो, असें सांगून समाधीचा अभ्यास करणारा पुरुष समाधीच्या अभ्यासाची वासना दृढ झाल्यामुळें त्या वासनेच्या बलावर, व्युत्थान दशेंत इंद्रियांच्या योगानें विषयग्रहण करीत असला तरी प्रसादास प्राप्त होतो, हा अभिप्राय व्यक्त केला आहे. " किं व्रजेत् " या प्रश्नाचें हें उत्तर आहे. भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत " रागद्वेष० " या श्लोकाच्या पुढील श्लोकांतही स्थितप्रज्ञाचींच लक्षणें सांगितलीं आहेत. येथें अशी एक शंका येते कीं, प्रज्ञेची उत्पत्ति व स्थिति होण्यापूर्वींही रागद्वेषादि दोषांचा त्याग करणें अवश्य आहे. मग रागद्वेषत्याग हें स्थितप्रज्ञाचें लक्षण कसें ? ही शंका बरोबर आहे. पण त्यांतही थोडासा विशेष आहे. श्रेयोमार्गकारांनीं तो येणेंप्रमाणें सांगितला आहे. आत्मज्ञान होण्याच्या पूर्वीं व तें झाल्यानंतरही जे गुण मोठ्या प्रयत्नानें

संपादन करावे लागतात तेच, म्हणजे साधक अवस्थेतील साधनेंच स्थितप्रज्ञाचे स्वाभाविक गुण अथवा लक्षणें होतात. या स्थितप्रज्ञअवस्थेसच जीवन्मुक्ति म्हणतात. या अवस्थेंत अबाधित (म्हणजे त्रिकाल सत्य) आत्म्याचें ज्ञान झाल्यामुळें भेदप्रतीति बाधित होत असते.

श्रीमद्भगवद्गीतेच्याच बाराव्या अध्यायांत भगवानांनीं भगवद्भक्ताचें वर्णन केलें आहे. त्याचें तात्पर्य असें:—भगवद्भक्ताचें चित्त सर्वदां ईश्वराकडे लागलेलें असल्यामुळें तो एका प्रकारच्या समाधींतच असतो. त्यामुळें त्याला इष्ट, अनिष्ट इत्यादिकांचें भानच होत नाहीं. एकादे वेळीं ईश्वराचें ध्यान सुटल्यामुळें जरी तो व्युत्थित दशेंत आला, तरी त्यावेळींही तो उदासीन होऊन रहात असल्यामुळें त्यास हर्षविषाद वाटत नाहीं आणि हर्षविषादाच्या अभावीं त्यास सुखदुःखही समान वाटतें; त्यामुळें तो कोणत्याही भूताचा (चराचर वस्तूचा) द्वेष करीत नाहीं; सर्वांचा मित्र होतो; सर्वांवर एकसारिखी दया करितो; जगांतील एकाही वस्तूला उद्देशून "ही माझी" असें तो ह्मणत नाहीं; चित्तांत अहंकारास थारा देत नाहीं; सुखदुःखास एक सारिखेंच लेखितो; सर्वांस सदा क्षमा करितो; यदृच्छेनें प्राप्त झालेल्या स्थितींत संतोष मानून रहातो; चित्त सर्वदा शांत ठेवितो; शरीर व इंद्रियें यांचें उत्तमप्रकारें नियमन करितो; "मी ब्रह्म आहें" हा त्याचा निश्चय दृढ असतो, ह्मणजे कुतार्किकांनीं कितीही जरी तर्कटें रचिलीं तरी त्याचा निश्चय ढळत नाहीं; तो आपल्या अंतःकरणास शुद्ध ब्रह्माचें ठायीं समर्पण करितो; त्याच्यापासून कोणाला संताप होत नाहीं व त्यास कोणापासून संताप होत नाहीं; हर्ष, क्रोध, भय, उद्वेग इत्यादि सर्व वृत्तींपासून तो मुक्त असतो; सर्व प्राप्त व अप्राप्त भोगसाधनांविषयीं तो निःस्पृह असतो; बाह्य व आभ्यंतर शौचानें तो संपन्न असतो; ज्ञातव्य व कर्तव्य यांची प्राप्ति झाली असतां तो जाणण्यास व करण्यास समर्थ असतो; मित्र व शत्रु यांतील कोणत्याही पक्षाचा तो आश्रय करीत नाहीं; कोणी निष्ठुरपणें ताडण केलें तरी त्यास पीडा होत नाहीं; ऐहिक फल देणाऱ्या किंवा पारलौकिक फल देणाऱ्या कोणत्याही कर्मास तो आरंभ करीत नाहीं; कोणत्याही स्थितींत हर्ष मानीत नाहीं; द्वेष करीत नाहीं; शोक करीत नाहीं व इच्छा करीत नाहीं; हें सुखाचें साधन आहे, असें समजून तो पुण्याचरण करीत नाहीं व हें दुःखाचें साधन आहे, असें समजून पापाचा त्यागही करीत नाहीं, तर शुभ व

अशुभ हे दोन्ही भाव तो सोडितो; शत्रु, मित्र, मान, अपमान, शति, उष्ण, सुख, दुःख यांतील एकाचेंही त्यास भान होत नाहीं; तो कोठेंच आसक्त होत नाहीं; निंदा व स्तुति या दोन्हींची तो सारखीच योग्यता मानतो; भिक्षेस गेल्यावर जें कांहीं बरें वाईट, थोडें फार मिळेल त्यांतच समाधान मानितो; कोठेंही नियमानें वास्तव्य करीत नाहीं; बुद्धीस चळूं देत नाहीं व भक्तीनें युक्त होऊन रहातो; आणि असा जो भक्त असतो तो ईश्वरास अतिशय आवडतो. स्थितप्रज्ञाच्या गुणांप्रमाणेंच हे भगवद्भक्ताचे गुणही आत्मज्ञानी पुरुषाचे स्वाभाविक गुण किंवा लक्षणें आहेत असें समजावें, कारण वार्तिककार सुरेश्वराचार्यांनीं तसें स्पष्ट सांगितलें आहे.

भगवद्गीतेच्याच चवदाव्या अध्यायांत गुणातीताचें वर्णन केलें आहे तें असें:——सत्त्वादि तीन गुणांचें ज्यानें उल्लंघन केलें आहे त्या गुणातीताचीं लक्षणें काय आहेत; त्याचें आचरण कसें असतें व तो या तीन गुणांचें उल्लंघन कसें करूं शकतो; असा अर्जुनानें प्रश्न केला असतां "प्रकाशं च प्रवृत्तिंच०" इत्यादि श्लोकांनीं भगवानांनीं उत्तर दिलें आहे. सत्त्व, रज व तम हे तीन गुण आहेत. त्यांच्या एक प्रकारच्या परिणामापासून सर्व संसार प्रवृत्त होतो. यास्तव गुणातीत होणें म्हणजे असंसारी होणेंच आहे. असंसारित्व व जीवन्मुक्तत्व यांत अर्थतः कांहीं भेद नाहीं. हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. अर्जुनानें वरील वाक्यांत मुख्यतः १ गुणातीताचें इतरांस ज्या चिन्हांवरून ज्ञान होणें शक्य आहे तीं चिन्हें कोणतीं? २ त्याच्या चित्ताचा प्रचार कसा होतो व ३ गुणातीत होण्याचीं साधनें (उपाय) कोणतीं? असे तीन प्रश्न केले आहेत. भगवानांच्या उत्तराचा सारांश असाः——प्रकाश, प्रवृत्ति व मोह म्हणजे सत्त्व, रज व तमोगुण. ते जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थांत प्रवृत्त होतात व सुषुप्ति समाधि आणि मूर्छा या अवस्थांत निवृत्त होतात. अनुकूल प्रवृत्ति व प्रतिकूल-प्रवृत्ति असे प्रवृत्तीचे दोन प्रकार आहेत. मूढ पुरुष जाग्रदवस्थेत प्रतिकूल प्रवृत्तीचा द्वेष करितो व अनुकूल प्रवृत्तीची इच्छा करितो. पण जो गुणातीत (असंसारी, जीवन्मुक्त) असतो, त्यास गुणांची कोणतीही प्रवृत्ति, अनुकूल किंवा प्रतिकूल वाटत नसल्यामुळें तो कशाचाही द्वेष किंवा अभिलाष करीत नाहीं. ज्याप्रमाणें दोघे कलह करीत असतांना तिसरा कोणी एकादा त्यांच्याकडे तटस्थ वृत्तीनें पहात रहातो व त्यांपैकीं कोणाचाही जय किंवा पराजय झाला तरी त्या उदासीन असणाऱ्या पुरुषाच्या चित्तांत

काहीं विकार होत नाहीं, त्याप्रमाणें गुणातीत विवेकी, सर्व व्यवहारात उदासीन रहातो. हा सर्व गुणांचा बाजार आहे, कांहीं इंद्रियरूपी गुण विषयरूपी गुणांशीं संगत होत आहेत, मी त्यांच्यामध्यें कधींही प्रवृत्त होत नाहीं, असा गुणातीताचा दृढ निश्चय असल्यामुळें तो प्रपंचांत पूर्णपणें उदासीन राहूं शकतो. गुण त्यास चंचल करूं शकत नाहींत. " मी करितों " असा कर्तृत्वादि अभिमान करणें यासच चांचल्य म्हणतात. गुणातीत अभिमान करीत नाहीं व त्यामुळें अचंचल असतो. हें दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर आहे. सुखदुःखांस समान समजणें; प्राप्त झालेल्या स्थितींत स्वस्थपणें रहाणें; दगड माती व सोनें यांस एकसारखें मानणें; प्रिय ( आवडता ) अप्रिय ( नावडता ) यांच्याशीं तुल्य व्यवहार करणें; कोणत्याही प्रसंगीं धैर्य न सोडणें; निन्दा, स्तुति, मान, अपमान, मित्र, शत्रु यांस तुल्य समजणें, आणि बद्ध करणारें कोणतेंही कर्म न आरंभणें; हीं गुणातीताचीं चिन्हें आहेत. या चिन्हांवरून इतरांनीं त्यांस ओळखावें; हें पहिल्या प्रश्नाचें उत्तर आहे. अनन्य भक्तियुक्त होऊन ज्ञान व ध्यान यांच्या अभ्यासानें परमात्म्याची सेवा करणें, हें एकच गुणातीत होण्याचें उत्तम साधन आहे.

व्यासादि महर्षींनीं पुराणादि ग्रंथांतून मुख्य ब्राह्मणाचें असें वर्णन केलें आहे:—

अनुत्तरीयवसनमनुपस्तीर्णशायिनम् ।
बाहूपधायिनं शान्तं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ १ ॥

नेसावयाचें व पांघरावयाचें वस्त्रही आपणापाशीं न ठेवणारा, भूमीवर कांहींही न हांतरतांच शयन करणारा, आपल्या बाहूस उशी समजून त्यावर मस्तक ठेवून निजणारा आणि अत्यंत शांत—अशा पुरुषास देव मुख्य ब्राह्मण समजतात. बाकीचे केवल जातीचे ब्राह्मण होत. येथील ब्राह्मण शब्दाचा—ब्रह्मवेत्ता—असा अर्थ घ्यावा. " अथ ब्राह्मणः० " या बृहदारण्यकोपनिषदांतील वाक्यांत असल्या ब्राह्मणाचाच निर्देश केला आहे. ब्रह्मवेत्त्यास विद्वत्संन्यासाचा अधिकार आहे. " जातरूप धारण करून, म्हणजे उत्पत्तीसमयीं प्राणी जसा नग्न असतो, तसा नग्न होऊन व आच्छादनाचा त्याग करून, परमहंस फिरत असतो " असें परमहंसोपनिषदाचें वचन आहे; त्याचा वर विद्वत्संन्यास प्रकरणीं उल्लेख केला आहे. त्यावरून कोणताही परिग्रह न करणें, हें परमहंसाचें मुख्य लक्षण आहे, असें उघड होत असल्यामुळें येथें सांगितलेलें मुख्य ब्राह्मणाचें लक्षण योग्यच आहे. १

आतां ब्राह्मणाचें दुसरें लक्षण सांगतातः—

**येन केनचिदाच्छन्नो येन केनचिदाशितः ॥**
**यत्र क्वचनशायी स्यात्तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ २ ॥**

मोठेंसें पान, टाळे, केळींचें सोपट, चिंधी इत्यादिकांतील जें मिळेल, त्यानें शरीराचे गुह्य भाग आच्छादित करणारा, फळें, पानें, मुळें, भात, भाकरी, पोळी इत्यादिकांतील जें मिळेल त्यानें शरीर पोषण करणारा, व शिला, लांकूड, गवत, नुस्ती जमीन, धावळी, घोंगडी, इत्यादिकांतील वेळीं जें यदृच्छेनें प्राप्त होईल त्यावर शयन करणारा, असा जो निःस्पृह पुरुष असतो त्यास देव ब्राह्मण समजतात. शरीराच्या रक्षणाकरितां भोजन, आच्छादन व शयन यांची अत्यंत आवश्यकता असते; हें खरें. पण प्रसंगीं जें मिळेल त्यांत समाधान मानून प्राप्त झालेल्या पदार्थांचे गुणदोष पहात न बसणें हें मुख्य ब्राह्मणाचें लक्षण आहे. पोट भरणें व शरीराचे पोषण होणें; लज्जा व शरीर यांचें रक्षण होणें व गाढ निद्रा लागणें, हीं कार्यें ज्या ज्या पदार्थांच्या योगानें होत असतील त्या सर्वांस सम पहाणें, हा एक मोठा गुण आहे. पण तसें न करितां प्राप्त पदार्थांच्या गुणदोषांचा विचार करूं लागल्यास कांहीं उपयोग न होतां उलट असमाधान वाटतें. यास्तव त्या चित्तदोषांचा त्याग करावा. भागवतांतही, उगीच पुष्कळ वर्णनें करून काय करावयाचें आहे; गुण व दोष यांचें लक्षण थोडक्यांत असें आहे. कोणत्याही वस्तूचे ठायीं गुणदोषदृष्टि ठेवणें हाच दोष व त्या उभयतांचाही त्याग करणें हा गुण होय, असें म्हटलें आहे. २

आतां ब्राह्मणाचें तिसरें लक्षण सांगतातः—

**कन्थाकौपीनवासास्तु दण्डधृग्ध्यानतत्परः ॥**
**एकाकी रमते नित्यं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ ३ ॥**

ब्रह्माचा उपदेश करणें इत्यादिकांच्या योगानें प्राण्यांवर अनुग्रह करण्याची इच्छा असल्यास आपल्या उत्तमपणाविषयीं लोकांच्या मनांत संशय न येतां त्यांची श्रद्धा वाढावी म्हणून दंड, कौपीन इत्यादि चिन्हें धारण करावींत. "कौपीन (लंगोटी), दंड व आच्छादन यांचा स्वशरीरोपभोगार्थ व लोकोपकारार्थ परिग्रह करावा." असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. पण लोकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनेंही त्यांच्या गृहकृत्यादिकांची चर्चा करूं

नये. तर ब्रह्मज्ञान, त्याचीं साधनें इत्यादिकांच्याच उपदेशानें त्यांच्यावर अनुग्रह करून बाकीच्या वेळीं ध्यानतत्पर होऊन रहावें. "केवल आत्म्यासच ओळखा; इतर सर्व वाणीचा व्यापार सोडा" असें श्रुतिही बजावून सांगत आहे. पुष्कळ शब्दांचें अध्ययनही करूं नये, कारण तें वाणीस ग्लानि आणतें." असेंही एका उपनिषदांत सांगितलें आहे. पण ब्रह्मोपदेश करणें ही इतर वाणी नव्हे. यास्तव अधिकाऱ्यास तो अवश्य करावा. त्याचप्रमाणें सदा एकट्यानें एकांतांत बसावें, कारण त्यावांचून ध्यान निर्विघ्नपणें लावितां येणार नाहीं. एवढ्याकरितांच एका स्मृतींमध्यें, यतीनें सदां एकाकी रहावें. दोन यती एके ठिकाणीं जमले असतां तें एक जोडपें होतें; तीन यतींच्या समूहास ग्राम म्हणतात; व चार यती म्हणजे तें एक नगरच होतें. यास्तव संन्याशांनीं नगर, ग्राम व जोडपें होऊं देऊं नये. कारण, त्यांचा संघ जमला असतां गांवांतील वार्ता, भिक्षेच्या वार्ता, प्रेम, चाहाड्या, मात्सर्य इत्यादि परस्पर होण्याचा फार संभव असतो, असें स्पष्ट सांगितलें आहे. असो; या लक्षणांनीं युक्त असलेल्या पुरुषास देव ब्राह्मण समजतात. ३

ब्राह्मणाचें चवथें लक्षण असें:—

निराशिषमनारम्भं निर्नमस्कारमस्तुतिम् ॥
अक्षीणं क्षीणकर्माणं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ ४ ॥

शिष्ट संसारी पुरुष नमस्कार करणारांस आशीर्वाद देत असतात. ज्याला जें हवें असेल त्यास त्याची प्राप्ति व्हावी अशी इच्छा शब्दांनीं प्रकट करणें यास आशीर्वाद म्हणतात. पण नमस्कार करणाऱ्या पुरुषांच्या भिन्न भिन्न रुचि असल्यामुळें त्यांस भिन्न भिन्न पदार्थ इष्ट ( हवे ) असतात. पण यांतील कोणाला काय इष्ट आहे हें पाहूं लागल्यास चित्त व्यग्र होतें व लोकवासना वाढते. ती ज्ञानविरोधी आहे असें—लोक वासना, शास्त्रवासना व देहवासना यांच्या योगानें आत्म्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. अशा अर्थाच्या स्मृतिवचनांत सांगितलें आहे. ( लोक वासनादि शब्दांचा अर्थ पुढें स्पष्टपणें समजेल. ) यास्तव जीवन्मुक्तानें कोणालाही आशीर्वाद देण्याच्या भानगडींत पडूं नये. पण नमस्कार करणारांस आशीर्वाद न दिल्यास त्याच्या मनास खेद होण्याचा संभव आहे. यास्तव लोकवासना व खेद या उभयतांचाही परिहार करण्या-

करितां सर्व आशीर्वादांच्या ऐवजीं " नारायण " या शब्दाचा उपयोग करावा. आशीर्वादाप्रमाणेंच मुक्तानें आरंभाचाही त्याग करावा. आपल्याकरितां किंवा परोपकार करण्याच्या इच्छेनें गृह-क्षेत्रादि वस्तु संपादन करण्याचा प्रयत्न करणें यास आरंभ म्हणतात. पण कोणताही आरंभ दोषयुक्तच असतो. " अग्नि जसा धूमानें आवृत असतो त्याप्रमाणें सर्व आरंभ दोषानें आवृत असतात " असें श्रीमद्भगवद्गीतेंतही सांगितलें आहे. विविदिषा संन्यासांत— जो पूर्व संन्यासी ( आपल्याहून जुना ) असेल व जो धर्माचरणानें आपल्या बरोबरीचा असेल त्यास प्रणाम करावा, दुसऱ्या कोणास करूं नये—असें ( नमस्काराचें ) विधान केलें आहे. पण आपल्यापेक्षां पूर्वी कोणी संन्यास केला आहे, आपल्या सारिखेंच कोण धर्माचरण करित आहे, इत्यादि विचार करूं लागल्यास चित्त विक्षिप्त होतें. व केवळ नमस्काराकरितांच कित्येक संन्यासी कलह करीत असल्याचेंही आढळतें. श्रीसुरेश्वराचार्यांनीं त्याचें कारण सांगितलें आहे. तें असें—

> प्रमादिनो बहिश्चित्ताः पिशुनाः कलहोत्सुकाः ।
> संन्यासिनोऽपि दृश्यन्ते दैवसंदूषिताशयाः ॥ १ ॥

दैवयोगानें ज्यांचें चित्त दूषित झालें आहे, असे कांहीं संन्याशीही प्रमाद करणारे, बाह्य वृत्ति, चाहाड्या सांगणारे, व कलह करण्यास उत्सुक असलेले आढळतात. असो; जीवन्मुक्तानें नमस्कार करणें संभवनीय नाहीं, असें आचार्यपादांनीं सांगितलें आहे. त्यांच्या त्या वचनाचें तात्पर्य येणेंप्रमाणें आहे.—नामादि विकल्पांच्या पलीकडील निरतिशय ब्रह्मरूपी स्वाराज्यांत स्थित झाल्यावर आत्मज्ञ कोणास प्रणाम करणार ? त्या अवस्थेंत त्यास कोणत्याही कर्मांचा उपयोग नसतो. या वचनानें आचार्यांनीं चित्ताच्या मलिनतेस कारण होणाऱ्या नमस्काराचा जरी निषेध केला आहे, तरी सर्वत्र समभाव ठेवून केलेला व त्यामुळेंच चित्तांत प्रसाद उत्पन्न होण्यास कारण होणारा नमस्कार त्यांसही मान्य आहे. कारण—

> ईश्वरो जीवकलया प्रविष्टो भगवानिति ।
> प्रणमेद्दण्डवद्भूमावाश्वचाण्डालगोखरम् ॥ १ ॥

असें स्मृतिवचन आहे. त्याचें तात्पर्य असें—षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वरच सर्व शरीरांत जीव—कलेनें प्रविष्ट झाला आहे. यास्तव कुत्रे, चांडाळ, बैल, गाढव

इत्यादिकांच्या पुढेंही साष्टांग लोटांगण घालावें. नमस्काराप्रमाणें स्तुतीचाही त्याग करावा, असें या ( ४ थ्या लक्षणाच्या ) श्लोकांत म्हटलें आहे. पण मनुष्याची स्तुति करूं नये, असा त्याचा अर्थ समजावा. कारण ईश्वराची स्तुति अवश्य करावी, असें बृहस्पतिस्मृतींत म्हटलें आहे. तें वचन असें:—

आदरेण यथा स्तौति धनवन्तं धनेच्छया ॥
तथा चेद्विश्वकर्तारं को न मुच्येत बन्धनात् ॥ १ ॥

याचा अर्थः—लोभी पुरुष धनाच्या इच्छेनें धनवानाची जशी मोठ्या आदरानें स्तुति करितो, त्याप्रमाणेंच जर विश्वकर्त्याची स्तुति केली तर बंधनापासून कोण मुक्त होणार नाहीं ? ( हें वचन मुक्तापेक्षां साधकास अधिक लागू आहे, असें मला वाटतें.) आतां या श्लोकांतील "अक्षीणं" व "क्षीण कर्माणं" या दोन पदांचें व्याख्यान करावयाचें आहे. अक्षीण म्हणजे कधींही दीन न होणारा. याविषयीं—एकादेवेळीं भोजनाचे प्रसंगीं तें न मिळाल्यास खिन्न होऊं नये व उत्तम भोजनाचा लाभ झाल्यास हर्ष मानूं नये. कारण अन्नादि अवश्य वस्तूंचाही लाभ किंवा अलाभ दैवाच्या अधीन असतो, असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. शास्त्रीय विधि व निषेध यांच्या अधीन होणाऱ्या पुरुषास क्षीणकर्म म्हणतात. निस्त्रैगुण्य मार्गांत असणाऱ्या पुरुषास कोणता विधि व निषेध असणार ? असें आचार्यांनीं एका स्तोत्रांत म्हटलें आहे. भगवानानींही श्रीगीतेच्या "त्रैगुण्यविषया वेदा०" या श्लोकांत असेंच सांगितलें आहे. निस्त्रैगुण्य म्हणजे निष्काम अवस्था. नारदांनींही—सर्वदां विष्णूचें स्मरण करावें; त्याचें विस्मरण कधींही होऊं देऊं नये. कारण सर्व विधि व निषेध या स्मरणाचे व अविस्मरणाचे किंकर आहेत, असें म्हटलें आहे. तस्मात् अशा पुरुषास देव ब्राह्मण समजतात. ४

आतां ब्राह्मणाचें पांचवें लक्षण सांगतातः—

योऽहेरिव गुणाद्भीतः सन्मानान्नरकादिव ॥
कुणपादिव यः स्त्रीभ्यस्तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ ५ ॥

जो गुणांस सर्पाप्रमाणें भितो, सन्मानास नरकाप्रमाणें भितो व स्त्रियांस प्रेताप्रमाणें भितो, त्यास देव ब्राह्मण समजतात. हा जीवन्मुक्त गुणी आहे, अशी एकदां कीर्ति झाल्यास राजापर्यंत ती वार्ता पोंचून त्यांच्या दर्शनादिकाचा अनिष्ट व विक्षेप उत्पन्न करणारा प्रसंग येईल, म्हणून तो गुणांस भितो.

लोक आदरसत्कार करूं लागले असतां त्याचीच आवड वाढते; लोकांनीं आपला असाच अधिकाधिक सन्मान करावा, असें वाटूं लागतें. पण ही आसक्ति पुरुषार्थाच्या विरुद्ध असल्यामुळें सन्मानाला नरकाप्रमाणें त्याज्य समजणें उचित आहे. एवढ्यासाठींच एका स्मृतिवचनांत--तपस्व्याचा सन्मान न झाल्यास त्याच्या तपाची वृद्धि होते व तो झाल्यास तपाचा क्षय होतो; कारण एकाद्यानें द्रव्यादि दानानें उपकार केले असतां अथवा मोठ्या सत्कारानें पूजा केली असतां तो साधक धार काढलेल्या गाईप्रमाणें दुःखी होतो, असें म्हटलें आहे. आणि हाच अभिप्राय मनामध्यें धरून दुसऱ्या एका स्मृतिवचनांत--सज्जनांच्या धर्मास दूषित न करितां, योग्यानें लोक आपला अपमान करतील व आपल्या संगतीस लागणार नाहींत असेंच आचरण करावें, असें म्हणून, साधकानें आपला अपमान बुद्ध्या करून घ्यावा, असें सांगितलें आहे. असो; स्त्रियांचे ठायीं प्रतिषिद्धत्व व जुगुप्सितत्व असा द्विविध दोष असतो. त्यांतील पहिला दोष केव्हां केव्हां प्रारब्धकर्माच्या प्राबल्यामुळें किंवा आसक्तीमुळें मनुष्याच्या हातून घडतो, हें लक्षांत आणून, मनु महाराजांनीं--तरुण आई, बहिण व कन्या यांच्यासह एका असनावर बसूं नये व एका शयनावर शयन करूं नये. कारण इंद्रिय समुदाय मोठा बलाढ्य आहे. तो विद्वानासही व्याकुळ करितो--असें सांगितलें आहे. पुरुष स्त्रियांपेक्षां अधिक उच्छृंखळ असल्यामुळें येथें पुरुषाचाच निर्देश केला आहे. पण स्त्रियांनाही तो अक्षरशः लागू आहे, हें विसरूं नये. जुगुप्सितत्व म्हणजे निंदितत्व. अर्थात्, स्त्रिया निंद्य आहेत हें दुसऱ्या एका स्मृतींत स्पष्टपणें सांगितलें आहे. स्त्रियांचा गुह्य भाग अति मलीन असतो. तो सर्व स्त्रियांच्या ठायीं एकसारखाच असतो, पण पुरुष केवळ मनोभेदामुळें फसतो व परस्त्रीच्या ठायीं आसक्त होतो, परंतु कोणत्याही स्त्रीच्या ज्या अवयवांवर तो इतका आसक्त होतो ते अवयव म्हणजे मांसाचे गोळे किंवा फाटलेलें चर्म यावांचून अणखीं कांहीं नसतें. त्यांतील कित्येक रक्तानें व थुंकीनें भरलेले असतात व कित्येकांस अपानवायूचा दुर्गंध येत असतो. तेव्हां अशा घाण अवयवांचे ठायीं जे नर रत होतात ते कृमितुल्यच होत. प्रेतही निषिद्ध व निंद्य असल्यामुळें स्त्रियांस त्याचा दृष्टांत दिला आहे. ( स्त्रियांच्या दृष्टीनें पाहिल्यास पुरुषही असेच प्रतिषिद्ध व निंदित ठरतात. कारण स्त्रिया जशा पुरुषांस आसक्त व बद्ध करितात, तसेच पुरुषही स्त्रियांस आपल्याठायीं आसक्त करितात व त्यामुळें त्या बद्ध होतात. सारांश

केवल पुरुष व स्त्री या दृष्टीनें कोणीही निंद्य नाहीं. पण भोग्य वस्तु या दृष्टीनें तीं दोघेंही निंद्य आहेत व एकमेकांस आसक्त करणारीं तीं दोघेंही एकमेकांच्या पुरुषार्थाची हानि करीत असतात. पुरुषांप्रमाणें स्त्रियाही भक्ति व ज्ञान यांच्या अधिकारी आहेत. ) ५.

असो; आतां ब्राह्मणाचें आणखीं एक लक्षण सांगून हा विषय पुरा करितातः--

येन पूर्णमिवाकाशं भवत्येकेन सर्वदा ।
शून्यं यस्य जनाकीर्णं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ ६ ॥

संसारी पुरुष एकाद्या निर्जन स्थळीं एकटाच राहिल्यास त्यास भय वाटण्याचा संभव आहे. तो फारच धीट असल्यास तेथें त्याला भय वाटणार नाहीं हें खरें; पण एकांतांत एकाकी राहिल्यास तो आळशी होईल अथवा त्याला अतिशय कंटाळा येईल, त्याचा वेळ जाणार नाहीं, यांत तर कांहींच संशय नाहीं. म्हणून संसारी पुरुषानें अनेक लोकांत मिसळून रहावें. एकांतांत राहून कंटाळवाणें आयुष्य कंठूं नये, असें सांगितलें आहे. पण योग्याची स्थिति याच्या अगदीं उलट आहे. तो एकांतांत एकटा राहिल्यास त्याचें ध्यान निर्विघ्नपणें चालतें, व त्यामुळें त्यास सर्व आकाश परिपूर्ण परमानन्दानें भरल्यासारिखें भासतें, व भय, आळस, शोक, मोह इत्यादि होत नाहींत. " सर्व भूतें ( प्राणी ) आत्माच आहेत, असें समजल्यावर त्या ऐक्य पाहाणाऱ्या ज्ञानी पुरुषास शोक व मोह कसा होणार ? " अशा अर्थाची श्रुति आहे. अनेक लोकांनीं भरून गेलेलें स्थान ध्यानास अनुकूल नसतें. तेथें अनेक लोकांचे अनेक वार्तालाप चालतात. त्यामुळें तेथें आनंदरूप आत्म्याचा अनुभव येत नाहीं. म्हणून ज्ञान्यास तें शून्य स्थानाप्रमाणेंच वाटतें. म्हणजे संसारी पुरुषास निर्जन स्थान जसें क्लेश देतें, त्याप्रमाणें जनयुक्त स्थान मुक्तास क्लेश देतें. कारण जग मिथ्या आहे व आत्मा पूर्ण आहे, असा त्याचा दृढ निश्चय असतो. ६

असो; स्कंदपुराणांत सूतसंहिता आहे. तिच्या मुक्तिखंडाच्या पांचव्या अध्यायांत परमेश्वरानें अतिवर्णाश्रमी पुरुषाचें वर्णन केलें आहे. त्याचें तात्पर्य असें:—ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, यति व अतिवर्णाश्रमी हे उत्तरोत्तर श्रेष्ठ गुरु आहेत. अतिवर्णाश्रमी पुरुष सर्व अधिकाऱ्यांचा गुरु आहे व तो

दुसऱ्या कोणाचा शिष्य होत नाहीं. कारण तो साक्षात् सर्व गुरूंचाही गुरु आहे. त्याच्या बरोबरीचा किंवा त्याच्याहून अधिक असा दुसरा कोणताही प्राणी या जगांत नाहीं. शरीर, इंद्रियें, इत्यादिकांहून अत्यंत भिन्न, बुद्धीच्या सर्व व्यापारांचें साक्षी, त्रिकालीं बाधित न होणारें, ज्ञान, स्वयंप्रकाश व सुख-रूप अशा परमतत्त्वास जो जाणतो, तो अतिवर्णाश्रमी होय. परमेश्वर म्हणतात—हे नारायणा, वेदांताच्या महावाक्यांचें श्रवण झाल्यामुळेंच जो—आत्मा ईश्वर आहे—असें साक्षात् जाणतो; जाग्रदादि तीन्ही अवस्थांनीं रहित व त्या अव-स्थांचा साक्षी, अशा महादेवास जो जाणतो; ब्राह्मणादि वर्ण व ब्रह्मचारी, गृहस्थ इत्यादि आश्रम देहाचेठायीं मायेनें कल्पित आहेत, माझा म्हणजे केवल ज्ञानरूप आत्म्याचा, त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं, असें जो वेदांताच्या आधारानें समजतो; आदित्याच्या सांनिध्यामुळें ज्याप्रमाणें सर्व लोक आपो-आप व्यवहार करूं लागतात, म्हणजे उदय पावून त्यांच्या संनिध येणें व प्रकाश देणें यावांचून सूर्य आणखी कांहीं करीत नाहीं, त्याप्रमाणें माझ्या सांनि-ध्यामुळें हें सर्व जग सतत चेष्टा करितें; कडें, कुंडल, बाहुभूषण इत्यादि अलंकारांचे आकार सुवर्णाचे ठायीं जसें कल्पित आहेत, त्याप्रमाणें सर्व जग सदां मज आत्म्यामध्यें कल्पित आहे; शिंपीच्या तुकड्यास पाहून, हें रुपें आहे, असा ज्याप्रमाणें भ्रम होतो, त्याप्रमाणें हें सर्व जग माझ्या ठायीं भ्रमानें भासतें; चांडालाच्या शरीरांत, पशु, पक्षी, इत्यादि शरीरांत, ब्राह्मणशरीरांत व दुसऱ्याही अशाच न्यूनाधिक योग्यतेच्या शरीरांत सर्व संबंधशून्य, एकरूप व आकाशा-प्रमाणें व्यापी, महादेव स्थित आहे, व तोच मी जरामरणरहित आत्मा आहें. एकाद्या भ्रमाची निवृत्ति झाल्यावरही पूर्व संस्कारामुळें पुनरपि तसाच भ्रम होतो, पण त्याची निवृत्तिही लागलीच होते. प्रवाशांस एकादेवेळीं दिग्भ्रम होतो. म्हणजे अंतरीक्ष मेघाच्छादित असल्यास पूर्वादि दिशा त्यास कळत नाहींत, पण अंतरीक्ष जरासें स्वच्छ झालें कीं नक्षत्रें, ग्रह इत्यादिकांची गति पाहून त्या ठरवितां येतात. व त्यानंतर त्या पूर्वींप्रमाणेंच जशाच्या तशाच भासतात. त्याप्रमाणेंच अज्ञानावस्थेंत भासणारें जग विज्ञानाच्या योगानें निवृत्त झाल्यावर पुनः तें भासत नाहीं. आत्मा मात्र जशाचा तसाच अनुभवास येतो. स्वप्नप्रपंचाप्रमाणेंच हा जाग्रत्प्रपंचही मायामय आहे; इत्यादि जो साक्षात् जाणतो; आत्मदर्शन झाल्यामुळें ज्याचा वर्णाश्रमाचार क्षीण झाला आहे; व जो सर्व वर्ण आणि आश्रम यांचें उल्लंघन करून स्वात्म्यामध्यें

स्थित आहे तो अतिवर्णाश्रमी होय. वेदार्थज्ञ पुरुषही अशा ज्ञानासच अतिवर्णाश्रमी म्हणतात. देह, इंद्रियें प्राण, मन, बुद्धि, अहंकार, चित्त, माया, आकाशादि जगत्, कर्ता, भोक्ता व भोग घेवविणारा यांतील एकही आत्मा नव्हे. हे सर्व अनात्मे आहेत. केवळ सच्चिदानन्द ब्रह्मच आत्मा आहे. जल हालूं लागलें म्हणजे त्यांतील सूर्याचें प्रतिबिंबही जसें हालूं लागतें त्याप्रमाणें अहंकाराच्या संसारामुळें आत्मा संसारी आहे असें भासतें. यास्तव, हे केशवा, वर्ण व आश्रम अनात्म्याचे धर्म असून आत्म्याचेठायीं त्यांचा भ्रांतीनें आरोप झालेला असतो. त्यामुळें आत्मवेत्त्यास वर्णही नाहीं व कोणता आश्रमही नाहीं. वस्तुतः त्याला विधि नाहीं, निषेध नाहीं, हें वर्ज्य आहे व हें अवर्ज्य आहे अशी त्याची कल्पना होत नाहीं. सारांश आत्मज्ञाननिष्ठ पुरुष सर्व विकल्पशून्य असतात. नारायणा, त्यांची निष्ठा मीच जाणतों; मायेनें मोहित झालेले मानव जाणत नाहींत. कारण चर्म चक्षूंनीं त्या निष्ठेचें ज्ञान होणें अशक्य आहे. विद्वानांच्या त्या स्वतःसिद्ध स्थितीचें ज्ञान विद्वानांसच ज्ञाननेत्रांनीं होतें. सामान्य जन आत्म्याविषयीं सदां उदासीन असतात. पण ज्ञानी त्याला सतत जाणतो आणि ज्ञानी व्यवहाराविषयीं उदासीन असतो. पण अज्ञानी त्यांत निमग्न असतात. तात्पर्य अशा अद्वय, निर्विकार, निरंजन ( निष्पाप ), नित्यशुद्ध, निराभास, केवल चैतन्यरूप, व परमामृत आत्म्यास जो वेदांताच्या द्वारा व स्वानुभवानें साक्षात् जाणतो तो अतिवर्णाश्रमी व तोच उत्तम गुरु होय.

तस्मात् वर सांगितलेलीं " विमुक्तश्च विमुच्यते " इत्यादि श्रुतिवचनें, आणि जीवन्मुक्त, स्थितप्रज्ञ, भगवद्भक्त, गुणातीत, ब्राम्हण व अतिवर्णाश्रमी यांचें प्रतिपादन करणारीं स्मृतिवचनें जीवन्मुक्तीचें अस्तित्व सिद्ध करीत आहेत; हें निर्विवाद ठरलें. इति प्रथमं जीवन्मुक्तिप्रमाणप्रकरणम् ॥ १ ॥

---

## अथ द्वितीयं वासनाक्षयप्रकरणम् ।

आतां जीवन्मुक्तीच्या साधनांचें निरूपण करितों. तत्त्वज्ञान, मनोनाश व वासनाक्षय हीं तीन जीवन्मुक्तीचीं साधनें आहेत. योगवासिष्ठांत उपशमप्रकरणाच्या शेवटीं वसिष्ठांनीं रामालाही या तीन साधनांचाच दीर्घ काल अभ्यास करावयास सांगितलें आहे. " यांचें एकाच कालीं ( म्हणजे अगोदर तत्त्वज्ञान

मग मनोनाश व शेवटीं वासनाक्षय अशा क्रमानें नव्हे ) अनुष्ठान केलें असतां तीं फलप्रद होतात. " असें त्या मुनिवर्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. त्यावरून साधनांचें अनुष्ठान केल्यास फल मिळतें असा अन्वय सिद्ध होतो. त्याचप्रमाणें " या तीन उपायांचा वारंवार व एकाच कालीं अभ्यास न केल्यास शेकडों वर्षांनींही पदप्राप्ति होत नाहीं. " असें म्हणून–अभ्यासाच्या अभावीं फलाभाव–हा व्यतिरेकही सांगितला आहे. या तीन साधनांचा एकाच कालीं अभ्यास न करितां त्यांतील एकेक साधनाचें दीर्घकाल जरी अनुष्ठान करीत राहिलें तरी फल सिद्ध होत नाहीं. कारण संध्येमध्यें मार्जनाकरितां " आपोहिष्ठा " इत्यादि तीन ऋचांचा विनियोग केलेला आहे. पण मार्जनाचे वेळीं त्या तिन्ही ऋचा न म्हणतां आज पहिली, उद्यां दुसरी व परवां तिसरी, अशा जर त्या म्हटल्या तर तें शास्त्रिय मार्जन होईल का ? अथवा षडंगमंत्रांतील एकेक मंत्र म्हटल्यानें षडंगन्यास सिद्ध होणें शक्य आहे का ? किंवा भाजी, वरण, भात, यांतील एकेका पदार्थानें भोजन होईल का ? कधींही नाहीं. त्याचप्रमाणें वरील साधनांतील एकेका साधनानें साध्य सिद्धि होत नाहीं. पण हे तिन्हीं उपाय दीर्घ काल योजीत राहिल्यास हृदयग्रंथि निःसंशय तुटतात. कारण " हे रामा, प्राण्यानें या संसारस्थितीचा शेकडों जन्म अनुभव घेतलेला आहे. यास्तव दीर्घ काल अभ्यास केल्यावांचून तिचा क्षय होणार नाहीं " शिवाय तत्त्वज्ञान, मनोनाश व वासनाक्षय हे तिन्हीं उपाय एकमेकांचे कारण होतात. ह्मणजे तत्त्वज्ञान मनोनाशाचें कारण होतें व मनोनाश तत्त्वज्ञानास कारण होतो; तत्त्वज्ञान वासनाक्षयास कारण होतें व तें त्यास कारण होतें. आणि मनोनाश वासनाक्षयास कारण होतो व वासनाक्षय मनोनाशास कारण होतो. याप्रमाणें तीं तिन्हीं परस्परांचीं कारणें होत असल्यामुळेंच दुःसाध्य झालीं आहेत. मनोनाश व वासनाक्षय यांचें जोडपें एकमेकांस कसें कारण होतें, तें वसिष्ठांनीं रामास व्यतिरेकमुखानें सांगितलें आहे. " रामा, जोपर्यंत मन अत्यंत लीन झालेलें नसतें, तोंपर्यंत वासनाक्षय होत नाहीं व वासनाक्षय झाल्यावाचून मन क्षीण होत नाहीं. दीपज्योति जशी एकसारखी जळत रहाते, त्याचप्रमाणें वृत्तींच्या प्रवाहद्वारा सतत परिणाम पावत असणाऱ्या अंतःकरणास मननामुळें मन असें ह्मणतात. त्याचा नाश होणें म्हणजे वृत्तिरूप परिणाम जाऊन निरुद्ध आकारानें परिणाम होणें. पतंजलींनीं योगसूत्रांत–" व्युत्थाननिरोधसंस्कारयोरभिभवप्रादुर्भावौ निरोधक्षणचित्ता-

न्वयो निरोधपरिणामः । ” असें म्हटलें आहे. याचा सारांश असा—व्युत्थान-संस्कार पराभूत होतात. निरोध संस्कार व्यक्त होतात व निरोधयुक्त क्षण चित्तानें अन्वित असतो म्हणजे चित्त निरोधरूपानें स्थित आहे, असा अनुभव येतो. क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र व निरुद्ध अशा चित्ताच्या पांच वृत्ति असतात. त्यांतील पहिल्या तीन भूमींस व्युत्थान म्हणतात. रजोगुण वाढल्यामुळें चित्त अस्थिर होतें त्यास क्षिप्त म्हणतात. तमोगुणाच्या वृद्धिमुळें तें कार्याकार्यविवेकशून्य होतें तेव्हां त्यास मूढ म्हणतात; व सत्त्वगुणाच्या वृद्धीमुळें तें सुखसाधनामध्येंच प्रवृत्त होतें तेव्हां त्यास विक्षिप्त म्हणतात. पहिल्या अवस्थेंत चित्त प्रवृत्तिरूप असतें; दुसऱ्या अवस्थेंत तें दुसऱ्यांस अपकार करण्यास तयार असतें व तिसऱ्या अवस्थेंत सुखमय असतें. म्हणूनच दैत्य, दानव इत्यादिकांचें चित्त क्षिप्त असतें; राक्षस, पिशाचें इत्यादिकांचें मूढ असतें व देवांचें विक्षिप्त असतें, असें भोजदेवांनीं योगसूत्रवृत्तींत म्हटलें आहे. या तिन्ही अवस्था किंवा वृत्ति समाधीच्या उपयोगीं नाहींत. पण एकाग्र व निरुद्ध या शेवटच्या दोन वृत्ति समाधीच्या अत्यंत उपयोगीं आहेत. पण एकाग्र वृत्तींत बहिर्वृत्तींचा निरोध होतो व निरुद्ध अवस्थेंत सर्व वृत्तींचा व त्यांच्या संस्कारांचाही विलय होतो. यास्तव चित्ताच्या पहिल्या तीन अवस्थांचा लय होऊन पुढच्या अवस्था व्यक्त झाल्यामुळें चित्तानें निरुद्ध (स्थिर) होऊन रहाणें यासच मनोनाश म्हणावें. मागचा पुढचा विचार न होतां एकाएकीं क्रोधादि वृत्तीस उत्पन्न करणारा जो चित्तांतील संस्कार त्यास वासना म्हणतात. कारण पूर्व क्रोधादिकांच्या अभ्यासामुळें चित्तावर सूक्ष्म परिणाम होतो व त्यामुळें कांहीं निमित्त झालें असतां पुढील क्रोधादि उद्भवतात. यास्तव वासनेचा क्षय होणें—म्हणजे विवेकामुळें प्राप्त होणारी शांति, दांति, शुद्धवासना इत्यादि दृढ झाल्या असतां, बाह्य निमित्त झालें तरी क्रोधादिकांची उत्पत्ति न होणें. सारांश क्रोधादिक येण्यास कारण झालें असतांही ते न येणें, यास वासनाक्षय म्हणतात. पण मनोनाश झालेला नसल्यास वृत्ति उत्पन्न होणारच व त्या उत्पन्न होऊं लागल्या कीं, कांहीं बाह्य निमित्तानें क्रोधादि येणारच, यांत कांहीं संशय नाहीं. अर्थात् मनोनाशाच्या अभावीं वासनाक्षयाचाही अभाव होतो. त्याचप्रमाणें वासना क्षीण झालेली नसल्यास तिच्या अनुरूप क्रोधादि वृत्ति उठणारच; तेव्हां वासनाक्षयाच्या अभावीं मनोनाशाचाही अभाव होणार हें उघड आहे.

आतां तत्त्वज्ञान व मनोनाश हां परस्पर कशीं कारण आहेत, तें वसिष्ठांचें वचन देऊन व्यतिरेक मुखानें सांगतों:—

यावन्न तत्त्वविज्ञानं तावच्चित्तशमः कुतः ॥
यावन्न चित्तोपशमो न तावत्तत्त्ववेदनम् ॥ १ ॥

नेत्र, रसना इत्यादि ज्ञानेंद्रियांच्या द्वारा अनुभवास येणारें हें सर्व रूप रसादि विषयमय जग मायिक आहे, यांत सत्यत्वाचा अंशही नाहीं व हें सर्व आत्माच आहे, असा निश्चय होणें, यास तत्त्वज्ञान म्हणतात. पण अशा प्रकारचें तत्त्वज्ञान झालेलें नसल्यास, रूपादि विषयमय जगाचें सत्त्व अनुभवास येतें व त्याविषयींच्या चित्तवृत्तींचें निवारण करितां येत नाहीं, म्हणजे पेटलेल्या अग्नींत सुकलेलीं लांकडें, गवत इत्यादि टाकण्याचा क्रम एकसारिखा चालविल्यास अग्नीच्या ज्वाळा जशा कधीं बंद होत नाहींत, तसाच चित्त-वृत्तींचा प्रकार समजावा. सारांश तत्त्वज्ञान नसल्यास मनोनाशाचाही अभाव होतो. तसेंच चित्त वृत्तिशून्य झालेलें नसल्यास रूपादि विषयांचा अनुभव अवश्य येत असल्यामुळें " या जगांत एकच अद्वितीय तत्त्व आहे. नाना जातीचें असें कांहीं नाहीं. " या श्रुतीवचनाशीं प्रत्यक्ष प्रमाणाचा विरोध येतो, अशी शंका येणें साहजिक आहे. कर्मकांड प्रकरणांत " यजमानः प्रस्तरः " अशी एक श्रुति आहे. दर्भाच्या जुडीस प्रस्तर म्हणतात. व " तो यजमान आहे " असा त्या श्रुतिवचनाचा अर्थ आहे. येथें प्रत्यक्ष विरोध आहे. म्हणजे दर्भाची जुडी यजमान आहे, हें म्हणणें प्रत्यक्ष अनुभवाच्या विरुद्ध आहे. यास्तव अशा प्रसंगीं गुणार्थवाद समजावा, असें मीमांसकांनीं ठरविलें आहे. असो; तर वरील वचनही प्रत्यक्षविरुद्ध अर्थ सांगत अस-ल्यामुळें तें गुणार्थवादरूप आहे, असें वाटून ब्रह्म अद्वितीय आहे, असा तत्त्वनिश्चय होणार नाहीं. अर्थात् चित्तनाशाच्या अभावीं तत्त्वज्ञानाचाही अभाव होतो. आतां तत्त्वज्ञान व वासनाक्षय हीं दोन्हीं एकमेकांस कारण कशीं होतात, तेंही व्यतिरेक मुखानेंच सांगतात:—

यावन्न वासनानाशस्तावत्तत्त्वागमः कुतः ॥
यावन्न तत्त्वसंप्राप्तिर्न तावद्वासनाक्षयः ॥

क्रोधादिवासना नष्ट झाल्यावांचून शमादिसाधनें स्थिर होत नाहींत; व त्यावांचून तत्त्वज्ञान उत्पन्न होत नाहीं. पण अद्वितीय ब्रह्मतत्त्वाचें ज्ञान

झाल्यावाचून क्रोधादिकाचीं निमित्तें सत्य आहेत, हा भ्रम जात नाहीं, व त्यामुळें त्यांची वासना क्षीण होत नाहीं. तात्पर्य हीं तिन्ही परस्पर उपकारक आहेत, हें येथवर वसिष्ठांचीं वचनें देऊन व्यतिरेक मुखानें ठरविलें. आतां अन्वयमुखानें त्यांचें परस्पर कारणत्व कसें सिद्ध होतें तें दाखवितों. मनाचा नाश झाला कीं संस्कारांस जागें करणाऱ्या बाह्य निमित्तांचा अनुभव येत नाहीं. कारण मनोवृत्तींच्या द्वारा बाह्य निमित्तांचें ज्ञान झाल्यावरच कोणताही संस्कार उद्भूत ( जागा ) होतो व त्यामुळें क्रोधादि उत्पन्न होतात, असा नियम आहे. त्यामुळें मनोनाश झाला कीं वासना ( संस्कार ) क्षीण होते. व ती क्षीण झाली कीं क्रोधादिकांच्या बीजाचाच क्षय झाल्यामुळें ते उत्पन्न होत नाहींत आणि त्यामुळें मनाचा पूर्णपणें क्षय होतो. सारांश—मनोनाशाच्या भावीं वासना क्षयाचा भाव व वासनाक्षयाच्या भावीं मनोनाशाचा भाव—असा हा अन्वय दाखवून तीं दोन्हीं साधनें एकमेकांस कशीं कारण होतात, तें दाखविलें. आतां तत्त्वज्ञान व मनोनाश यांचें अन्वयमुखानें अन्योन्यकारणत्व कसें सिद्ध होतें तें पहा—तें तत्त्व सूक्ष्म बुद्धीस गोचर होतें—अशा अर्थाचें श्रुतिवचन असल्यामुळें आत्म्याच्या एकत्वाचें ग्रहण करण्यास तयार झालेली सूक्ष्म वृत्तीच आत्मसाक्षात्काराचें कारण आहे, असें ठरतें. तस्मात् इतर सर्व वृत्ति क्षीण झाल्यावांचून तत्त्वज्ञान होणें शक्य नाहीं, व एकाग्रवृत्तीच्या द्वारा इतर सर्व वृत्ति क्षीण होऊन तत्त्व ज्ञान झालें असतां, मिथ्या ठरलेल्या जगांतील कोणत्याही वस्तूविषयीं चित्तवृत्ति उत्पन्न होत नाहीं. कारण मनुष्याच्या किंवा घोड्याच्या मिथ्या शिंगाविषयीं कधीं कोणाची चित्त वृत्ति उद्भवत नाहीं, असें आपण व्यवहारांत नेहमीं पाहतों. जगांतील मिथ्या ठरलेल्या वस्तूविषयीं जरी नाहीं तरी आत्म्याविषयीं पुनः चित्तवृत्ति उत्पन्न होईल म्हणून म्हणावें तर, आत्म्याचा साक्षात्कार अगोदरच झालेला असल्यामुळें, दुसऱ्या वृत्तीचा कांहीं उपयोग नसतो. म्हणून आत्म्याविषयींही ती उत्पन्न होणार नाहीं. अर्थात् इंधनरहित अग्नीप्रमाणें मन आपोआप नष्ट होतें. गवत, लांकुड इत्यादि जळण जळून गेलें असतां अग्नीही कांहीं वेळानें आपाआप विझून जातो, हें प्रसिद्ध आहे. सारांश मनोनाश झाला असतां तत्त्वज्ञान होतें व तत्त्वज्ञानाच्या योगानें मनोनाश स्थिर होतो. वार्तिककारांनीं तत्त्वज्ञान क्रोधादि—वासनाक्षयास कारण होतें, असें या पुढिल वार्तिकांत सांगितलें आहे:—

रिपौ बन्धौ स्वदेहे च समैकात्म्यं प्रपश्यतः ॥
विवेकिनः कुतः कोपः स्वदेहावयवेष्विव ॥ १ ॥

सुरेश्वराचार्य म्हणतातः—शत्रु, बंधु व आपला देह यांमध्यें सर्वत्र सम व एक आत्मा आहे, असें पाहणाऱ्या विवेकी पुरुषास कोप कोठून येणार ? आपल्याच दातांनीं जीभ चावल्यास दांतावर कोणी रागावत नाहीं. एका पायाचा धक्का दुसऱ्या पायास लागल्यास त्याला कोणी ताडण करीत नाहीं. कारण आपल्याच अवयवावर काय रागवावयाचें आहे ? असें म्हणून मनुष्य शांत होतो. त्याचप्रमाणें सर्वत्र एक आत्मा आहे असें समजून विवेकी कोणावर रागावत नाहीं. अर्थात् तत्त्वज्ञान याप्रमाणें क्रोधादि वासनाक्षयास कारण होतें. क्रोधादि वासनाक्षयरूप शमादि साधनांचें ज्ञानकारणत्व प्रसिद्ध आहे. वसिष्ठांनींही “ ज्ञानापासून शमादि गुणांची उत्पत्ति होते व शमादिकांपासून ज्ञान उद्भवतें. सारांश कमलें व सरोवर यांच्याप्रमाणें शमादि गुण व ज्ञान परस्परांस वाढवितात. ” असें म्हटलें आहे. असो; याप्रमाणें वासनाक्षय व तत्त्वज्ञान यांचें परस्पर कारणत्व अन्वयमुखानें सिद्ध झालें. पण हीं तीन साधनें कशीं संपादन करावीं, तें वसिष्ठांनीं रामास सांगितलें आहे.—

तस्माद्राघव यत्नेन पौरुषेण विवेकिना ॥
भोगेच्छां दूरतस्त्यक्त्वा त्रयमेतत्समाश्रयेत् ॥ १ ॥

पौरुष यत्न म्हणजे कोणत्याही उपायानें हें माझें इष्ट मी अवश्य संपादन करीन अशाप्रकारचा उत्साहरूप आग्रह. विवेक म्हणजे आत्मा व अनात्मा यांचा पृथक् निश्चय. अशा निश्चयानें युक्त असलेल्या पुरुषानें पौरुष प्रयत्न करून व भोगेच्छा दूर टाकून तत्त्वज्ञानादि तीन साधनांचा आश्रय करावा. तत्त्वज्ञानाचें श्रवणादि साधन आहे; मनोनाशाचें योग हें साधन आहे व विरुद्ध वासना उत्पन्न करणें हें वासनाक्षयाचें साधन आहे. भोगांच्या इच्छेस थोडासा आवकाश दिल्यास घृतादि हवीनें अग्नि जसा अधिकच वाढतो त्याप्रमाणें ती भोगेच्छाही अधिकच वाढण्याचा संभव आहे. यास्तव तिला “ दूरतः टाकून ” असें म्हटलें आहे. असो; येथें काणी अशी शंका घेईल कीं, तुम्हीं पूर्वीं–विविदिषासंन्यासाचें तत्त्वज्ञान हें फल आहे व विद्वत्संन्यासाचें जीवन्मुक्ति हें फल आहे–असें म्हटलें होतें. त्याप्रमाणें पाहूं लागल्यास प्रथम तत्त्वज्ञान संपादन करून, त्यानंतर विद्वत्संन्यास करावा. व त्या

अवस्थेंत पोंचल्यावर आपणास बंधरूप असलेल्या वासनेचा व मनोवृत्तीचा विनाश संपादन करावा; असें वाटतें. पण येथें तत्त्वज्ञानादि तिन्हीं साधनांचा एकाच काळीं अभ्यास करावा; मागें पुढें त्यांचा अभ्यास करूं नये, असा तुह्मीं आग्रहपूर्वक नियम करितां. हा दोष यावर पूर्वोत्तरविरोध नाहीं कां येत? असें कोणास वाटेल, पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण प्रधान व गौण भावानें त्याची व्यवस्था करितां येते. विविदिषासंन्याशास तत्त्वज्ञान प्रधान व मनोनाश आणि वासनाक्षय गौण आहेत. पण विद्वत्संन्याशास मनोनाश व वासनाक्षय प्रधान व तत्त्वज्ञान गौण आहे. त्यामुळें दोन्ही संन्यासांत एकाच कालीं त्या त्रिवर्गाचा अभ्यास होऊं शकतो. आतां— तत्त्वज्ञानानें कृतार्थ झालेल्या पुरुषास पुढच्या दोन साधनांच्या अभ्यासाचा प्रयास करून काय संपादन करावयाचें आहे, अशी शंका घेऊं नये. कारण जीवन्मुक्ति, हें त्यांच्या अभ्यासाचें फल, संपादन कर्तव्य आहे, असें सांगून आम्ही त्या शंकेचें निरसन करणार आहों. पण विद्वत्संन्याशास संन्यास करण्यापूर्वींच ज्ञान झालेलें असल्यामुळें संन्यासानंतर श्रवणादि ज्ञानसाधनांचें अनुष्ठान करणें व्यर्थ आहे. शिवाय ज्ञान हें कांहीं कर्माप्रमाणें अनुष्ठान करितां येण्यासारखें नाहीं. जें अनुष्ठान करितां येण्यासारखें असतें, त्याचें अनुष्ठान करणें, न करणें किंवा भलतेंच कांहीं करणें, हें मनुष्याच्या हातीं असतें. पण ज्ञानाची अवस्था तशी नाहीं. त्यास स्वरूपतः कोणालाही करितां येत नाहीं. साधनांच्या योगानें त्यास फार तर सिद्ध करितां येतें. साधनें ज्ञानानंतर व्यर्थ असतात, हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां कर्त्याच्या अधीन नसणाऱ्या ज्ञानाची, गौणरीत्या तरी विद्वत्संन्यास—अवस्थेंत अभ्यास कसा करितां येईल? असें कोणी विचारील ह्मणून आम्हीं सांगतों कीं, कोणत्या तरी द्वारानें ज्ञात तत्त्वाचें वारंवार स्मरण करणें, हाच तत्त्वज्ञानाचा अभ्यास होय. अशा प्रकारच्या अभ्यासाचें दिग्दर्शन श्रीवसिष्ठांनीं लीलोपाख्यानांत केलें आहे.

तच्चिन्तनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥
एतदेकपरत्वं च ज्ञानाभ्यासं विदुर्बुधाः ॥ १ ॥
सर्गादावेव नोत्पन्नं दृश्यं नास्त्येव तत्सदा ॥
इदं जगदहं चेति बोधाभ्यासं विदुः परम् ॥ २ ॥

त्या तत्त्वाचेंच चिंतन करणें, त्याचेंच कथन करणें, एकमेकांस त्याचाच बोध करणें, व तदेकपरायण होऊन रहाणें यास शानी ज्ञानाभ्यास म्हणतात. सृष्टीच्या आरंभींच हें दृश्य उत्पन्न झालें नाहीं. त्यामुळें तें ( दृश्य ) हें जग, व मी नाहींच असें सदां जाणणें यास श्रेष्ठ बोधाभ्यास समजतात. १, २. मनोनाश व वासनाक्षय यांचाही तेथेंच उल्लेख केला आहे. यास्तव क्रमानेंच ते श्लोक अर्थासह येथें देतों:—

अत्यन्ताभावसंपत्तौ ज्ञातुर्ज्ञेयस्य वस्तुनः ॥
युक्त्या शास्त्रैर्यतन्ते ये ते तत्राभ्यासिनः स्थिताः ॥१॥

ज्ञाता व ज्ञेय ( विषय ) हीं दोन्ही मिथ्या आहेत, अशी बुद्धि स्थिर होणें, यास अभावसंपत्ति म्हणतात. आणि ज्ञाता व ज्ञेय या रूपानेंही त्यांची प्रतीतिही न येणें यास अत्यंत-अभावसंपत्ति म्हणतात. अशा प्रकारच्या संपत्तीकरितां जे योग व शास्त्र यांच्या योगानें प्रयत्न करितात ते मनोनाशाचें अभ्यासी होत १. तसेंच

दृश्यासंभवबोधेन रागद्वेषादितानवे ॥
रतिर्नवोदिता याऽसौ ब्रह्माभ्यासः स उच्यते ॥ २ ॥

दृश्य वस्तूंचा असंभव आहे असा बोध झाल्यामुळें रागद्वेषादि क्षीण होतात. व त्यामुळें नूतन उत्पन्न होणारी जी रति त्यास ब्रह्माभ्यास म्हणतात. २ या श्लोकांत वासनाक्षयाचा अभ्यास बोधद्वारा करावा, असें सांगितलें आहे. असो; हे तिन्ही अभ्यास एकसारखेच प्रतीत होत असले तरी प्रयोजनानुसार त्यांतील मुख्य कोणता व गौण कोणते याचा विवेक करितां येतो. मुमुक्षु पुरुषास जीवन्मुक्ति व विदेहमुक्ति अशीं दोन प्रयोजनें इष्ट असतात. " विमुक्तश्च विमुच्यते " या श्रुतिवचनांत त्या दोन्हीं प्रयोजनांचा निर्देश केला आहे. त्यांतील जीवंत पुरुषास दैवीसंपत्तीनें मोक्ष मिळतो व आसुरसंपत्तीनें तो बद्ध होतो. श्रीगीतेच्या सोळाव्या अध्यायांत " दैवीसंपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता " या वचनानें ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. व त्याच अध्यायाच्या आरंभीं त्या दोन्ही संपत्तीही सांगितल्या आहेत, त्या अशा—अभय ( शास्त्रानें उपदेश केलेल्या धर्माचें निःशंकपणें अनुष्ठान करणें ), सत्त्वसंशुद्धि ( अंतःकरणाची उत्तम निर्मलता—भगवत्तत्त्वस्फूर्तियोग्यता अथवा कपटानें दुसऱ्यास वश करून घेणें, मनांत एक ठेवून बाहेर एक दाखविणें, इत्यादि मलराहित्य),

ज्ञान ( शास्त्रावरून आत्मतत्त्व जाणणें ) व योग ( तेंच आत्मतत्त्व चित्ताच्या एकाग्रतेनें अनुभवारूढ करणें ) यांमध्यें तत्पर होऊन रहाणें, यथाशक्ति दान, बाह्येंद्रियसंयम, अग्निहोत्र, दर्शपौर्णमास इत्यादि श्रौत, व देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, व मनुष्ययज्ञ हे चार स्मार्तयज्ञ, स्वाध्याय म्हणजे ब्रह्मयज्ञ, सतराव्या अध्यायांत सांगितलेले कायिक, वाचिक, मानसिक तप, मनाचा सरळपणा, अहिंसा ( प्राण्यांस पीडा न देणें अथवा त्यांच्या वृत्तीचा छेद न करणें ), सत्य ( अनर्थास कारण न होणारें व आपण जसें पाहिलें असेल तसेंच सांगणें ), दुसऱ्यांनीं शिव्या दिल्या किंवा ताडण केलें असतां आलेल्या क्रोधास शांत करणें, सर्वसंगपरित्याग करणें, अंतःकरणास शांत करणें, दुसऱ्याच्या मागें त्याचे दोष तिसऱ्यास न सांगणें, दुःखी प्राण्यावर दया करणें, विषय संनिध असले तरी इंद्रियांस त्यांत आसक्त न होऊं देणें, व्यर्थ त्रास देणाऱ्या लोकांविषयींही क्रूर न होणें, कुकर्मास आरंभ करतांना लोकांची लज्जा वाटणें, प्रयोजनावांचून हात, पाय इत्यादि अवयवांस चंचल न होऊं देणें, तेज ( स्त्रिया, बालक, मूढ इत्यादिकांकडून अपमान न पावणें ) अपराध्यास शासन करण्याचें सामर्थ्य असतांना त्याच्यावर क्रोध न करणें, धैर्य ( इंद्रियादि शिथिल झालीं तरी त्यांस काम करावयास लागणारा एक प्रकारचा प्रयत्न ), अंतर्बाह्य शुद्धि, दुसऱ्यास मारण्याच्या इच्छेनें शस्त्रादि न उठविणें, व " मी अति पूज्य " असा अभिमान न धरणें, हे गुण दैवीसंपत्तीस अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषांत असतात. या दैवीसंपत्तीसच शुद्ध सत्त्वमयी संपत्ति ह्मणतात. पूर्वजन्मीं मरतांना पुण्यपापानुरूप पुढच्या जन्मींच्या शरीराचा आरंभ होतो. त्यावेळीं पुण्यकर्मामुळें व्यक्त झालेली जी वासनासंतति तीच दैवीसंपत्ति होय. असो; दंभ, ( आपली धार्मिकता व्यक्त करणें ), दर्प ( धन–मान–विद्या इत्यादिकांमुळें प्राप्त झालेला मद ) अभिमान ( मी मोठा आहें असें समजणें ), क्रोध ( आपल्यास किंवा दुसऱ्यास अपकार करण्यास कारण होणारी संतापरूपी एक चित्तवृत्ति ) पारुष्य ( रूक्ष व कटु भाषण करणें ) व अज्ञान ( कार्याकार्य विवेकाभाव ), हे दोष आसुरसंपत्तीस अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषामध्यें असतात. या आसुर संपत्तीचा विस्तार भगवानांनीं त्याच अध्यायांत शेवटपर्यंत केला आहे. या दोन प्रकारच्या संपत्तींतील अशास्त्रीय, स्वभावतः सिद्ध व दुर्वासनारूप जी आसुरसंपत्ति तिचा शास्त्रीय, पुरुषप्रयत्नसाध्य,

व सद्वासनारूप दैवीसंपत्तीच्या योगानें क्षय झाला असतां जीवन्मुक्ति होते. या वासनाक्षयाप्रमाणें मनोनाशही जीवन्मुक्तीचा उपाय आहे, असें श्रुतींत सांगितलें आहे. त्या श्रुतिवचनांचा सारांश येथें देतों. "मनुष्याच्या बंधाचें व मोक्षाचें कारण मनच आहे. विषयासक्त मन बंधास व विषयरहित मन मोक्षास कारण होतें. ज्याअर्थी या निर्विषय मनाची मुक्ति मानलेली आहे. त्याअर्थी मुमुक्षूनें आपलें मन सदां विषयशून्य करावें. ज्यानें विषयासक्ति पूर्णपणें टाकिली आहे, असें मन हृदयामध्यें जेव्हां अत्यंत निरुद्ध होतें, व उन्मनी भावास प्राप्त होतें. तेव्हां तें परम पद होतें. मन हृदयामध्यें अगदीं क्षीण होई तों निरुद्ध करावें. ( त्यास हृदयामध्येंच अडकवून ठेवून क्षीण करून साडणें ) यासच ज्ञान व ध्यान ह्मणतात. बाकीचा सर्व अन्यायाचा विस्तार आहे."

तीव्र व मृदु असा बंध दोन प्रकारचा आहे. आसुरसंपत्ति साक्षात् बंधास कारण होणारी असल्यामुळें ताच तीव्र बंध होय व केवल द्वैताचा अनुभव येणें हा मृदु बंध आहे. कारण द्वैतानुभव जरी स्वतः क्लेशरूप नसला तरी तो आसुरसंपत्तीस उत्पन्न करितो. वासनाक्षयाच्या योगानें तीव्र बंधाचें मात्र निवारण होतें. मृदुबंधाचें निवारण होत नाहीं. पण मनोनाशाच्या योगानें दोन्हीं बंधांचें निवारण होतें. परंतु असें जरी असलें तरी, वासनाक्षयास निरर्थक समजून, केवल मनोनाशाकरितां प्रयत्न करून भागणार नाहीं. कारण सुखदुःख भोगास कारण होणाऱ्या प्रबल प्रारब्धानें मनास व्युत्थित केलें असतां तीव्र बंधाचें निवारण करण्याकरितां वासनाक्षयाची आवश्यकता असते. प्रारब्धप्राप्त सुखदुःखादि भोग द्वैतानुभवरूपी मृदुबंधाच्या योगानें-ही होणें शक्य आहे. यास्तव मनोनाशकालीं दोन्ही प्रकारच्या बंधांचें निवारण होत असल्यामुळें, वासनाक्षयाचा जरी उपयोग नसला तरी प्रारब्ध भोग भोगण्याकरितां मन जेव्हां चंचल होतें, तेव्हां आसुरसंपत्तिरूपी तीव्र बंधाची उत्पत्ति होऊं नये ह्मणून वासनाक्षयाची गरज असते. तामस वृत्तींस तीव्रबंध व सात्त्विक आणि राजस चित्तवृत्तींस मृदुबंध म्हटलें म्हणजे आम्ही काय म्हणतो तें चांगलें समजेल. "दुःखेष्वनुद्विग्नमनाः" या श्लोकाचें व्याख्यान करितांना वर हेंच तत्त्व स्पष्ट केलें आहे. तसेंच—प्रबलप्रारब्धप्राप्त—भोगांकरितां आम्हीं मृदुबंधाचा स्वीकार केल्यामुळें व तीव्रबंधाची निवृत्ति वासनाक्षयाच्या योगानें होत असल्यामुळें मनोनाशाकरितां प्रयत्न करण्याचें

कारण नाहीं.—असेंही समजणें उचित नव्हे. कारण दुर्बल प्रारब्धामुळें प्राप्त होणाऱ्या अवश्यभावी भोगांच्या प्रतीकारार्थ मनोनाशाची अपेक्षा असते. तसल्या भोगांची मनोनाशाच्या द्वारा निवृत्ति होते हा अभिप्राय मनांत धरूनच एका कवीनें " अवश्य होणाऱ्या गोष्टीस जर प्रतीकार करितां आला असता तर नल, राम व युधिष्ठिर दुःखानें लिप्त झाले नसते." असें म्हटलें आहे. तात्पर्य वासनाक्षय व मनोनाश हे जीवन्मुक्तीचे साक्षात् उपाय असल्यामुळें त्यांस प्राधान्य असतें. व तत्त्वज्ञान त्या दोन्ही उपायांस उत्पन्न करणारें असल्यामुळें त्याच्या पलीकडे रहात असतें म्हणून तें गौण आहे. अर्थात् अगोदर तत्त्वज्ञान नंतर मनोनाश व वासनाक्षय आणि शेवटीं जीवन्मुक्ति असा क्रम लागत असल्यामुळें तत्त्वज्ञान हें जीवन्मुक्तीचें साक्षात् साधन आहे असें म्हणतां येत नाहीं. तत्त्वज्ञानापासून वासनाक्षयाचा उद्भव होतो असें अनेक श्रुतींत सांगितलें आहे. त्यांतील कांहीं श्रुतिवचनांचा सारांश असा:—परमात्म्यास जाणलें असतां सर्व पाशांची हानि होते; अविद्या, अस्मिता, राग, द्वेष इत्यादि क्लेश क्षीण झाले असतां जन्म व मृत्यु यांचा क्षय होतो. प्रत्यगात्म्याच्या साक्षात्कारानें परमात्म्यास जाणून सुज्ञ हर्ष व शोक यांचा त्याग करितो. आत्मज्ञ शोकाचें उल्लंघन करितो. सर्वत्र एक तत्त्व आहे, असें पाहाणारास शोक व मोह कोठून होणार? स्वयंप्रकाश आत्म्यास जाणून पुरुष सर्व पाशांपासून मुक्त होतो, इत्यादि इत्यादि, तत्त्वज्ञान मनोनाशाचें कारण आहे, असेंही श्रुतींत सांगितलें आहे. " ज्यावेळीं या साधकास सर्व आत्मरूप भासतें व आत्म्याहून अन्य कांहीं अनुभवास येत नाहीं, तेव्हां तो कोणत्या साधनानें कोणत्या रूपवान् पदार्थास पहाणार? कोणत्या साधनानें कशाचा वास घेणार? इत्यादि. गौडपादाचार्यांनीही " आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झाल्यामुळें जेव्हां हा पुरुष कोणताही संकल्प करीत नाहीं, तेव्हां मन अमन होतें. व ग्राह्य वस्तूच नसल्यामुळें त्याचेंही ग्रहण होत नाहीं" असें मांडुक्योपनिषद्—कारिकांतील एका कारिकेंत म्हटलें आहे.

असो; मनोनाश व वासनाक्षय हीं जशीं जीवनमुक्तीचीं साक्षात्साधनें आहेत त्याप्रमाणें विदेहमुक्तीचें ज्ञान हें साक्षात्साधन आहे. व त्यामुळेंच तें विविदिषा संन्यास-कालीं प्रधान आहे "ज्ञानाच्या योगानेंच कैवल्य प्राप्त होतें व त्याच्या योगानें तो मानव सर्व बंधांपासून मुक्त होतो. असें एक स्मृतिवचन

आहे. केवल ह्मणजे आत्मा त्याचा भाव ह्मणजे कैवल्य. सारांश कैवल्य ह्मणजे देहराहित्य. तें ज्ञानाच्या योगानेंच प्राप्त होतें, कारण आत्म्यानें देहयुक्त होणें हें अज्ञानकार्य आहे. व त्यामुळें केवल ज्ञानानेंच त्याची निवृत्ति होणें शक्य आहे. केवल ज्ञानानेंच असें ह्मटल्यानें अग्निहोत्र संध्या-वंदनादि कर्मांच्या योगानें त्याची निवृत्ति होत नाहीं, असें ठरतें. "प्रजा, इत्यादिकांच्या योगानें अमृतत्वाची प्राप्ति होत नाहीं" असें श्रुतीनेंही ह्मटलें आहे, शिवाय आत्मज्ञान संपादन करून देणाऱ्या शास्त्राचा अभ्यास न करितां, संभव असेल त्याप्रमाणें वासनाक्षय व मनोनाश यांचाच अभ्यास करून सगुण ब्रह्माची जो उपासना करितो त्याला कैवल्य प्राप्त होत नाहीं. कारण आत्मज्ञान झालेलें नसल्यामुळें त्याच्या लिंग देहाचा नाश झालेला नसतो आणि त्याचा नाश झाल्यावांचून देहराहित्य हेंच आत्मकैवल्य मिळणें अशक्य आहे. यास्तव "केवलज्ञानानेंच कैवल्य मिळतें" या वरील वाक्यानें वासनाक्षय व मनोनाश यांचाही मोक्षास साक्षात् उपयोग नाहीं, असें सुचविलें आहे. वरील स्मृतिवचनांत "सर्व बंधापासून असें ह्मटलें आहे. त्यांतील सर्व शब्दानें अविद्याग्रंथी, अब्रह्मत्व, हृदयग्रंथी, संशय, कर्मे, सर्व काम, मृत्यु, पुनर्जन्म इत्यादि शब्दांनीं शास्त्रांत ज्यांचा उल्लेख केलेला आहे ते अनेक प्रकारचे बंध घ्यावे, कारण ते सर्व अज्ञानापासून उत्पन्न झालेले असून ज्ञानाच्या योगानें त्यांची निवृत्ति होते. वरील बंधबोधक शब्दांचा ज्या श्रुतिवचनांत उल्लेख केलेला आहे त्यांतील कित्येकांचा सारांश असाः—"अंतःकरणरूपी गुहेमध्यें असलेल्या या तत्त्वास जो जाणतो तो अविद्याग्रंथीस नाहींसें करितो," "जो ब्रह्मास जाणतो तो ब्रह्म होतो;" ह्मणजे त्याचें अब्रह्मत्व नष्ट होतें. "त्या सर्वोत्तम परमात्म्यास जाणलें असतां हृदयग्रंथी तुटते." सर्व संशय नाहींसे होतात, त्यांचीं सर्व कर्में क्षीण होतात, जो बुद्धिलक्षण गुहेंतील परम आकाशांत ( म्हणजे अज्ञानांत ) असलेल्या या ब्रह्मास जाणतो त्यास ब्रह्मरूपानें त्रिभुवनांतील सर्व काम ( विषय, विषयजन्य आनंद ) एकाच कालीं भोगावयास मिळतात. त्या आत्म्यासच जाणून प्राणी मृत्यूचें उल्लघन करून जातो. जो विज्ञानवान्, संकल्परहित व सदा शुचि असतो, तो ज्याच्यापासून पुनः संसारांत जन्म घेण्याकरितां परत यावें लागत नाहीं, त्या पदास पोंचतो. जो याप्रमाणें मी ब्रह्म आहें,असें जाणतो तो सर्व होतो." या अर्थाचीं अशींच दुसरींही असर्वज्ञत्वादि बंधनिवर्तक वाक्यें या प्रसंगीं उदाहरणार्थ घ्यावीं. ही विदेह मुक्ति ज्यावेळीं आत्मसाक्षात्कार होतो त्यावेळींच प्राप्त होते, असें समजावें।

कारण, ब्रह्माच्या ठिकाणीं अविद्येमुळें आरोपित केलेल्या या बंधाचा विद्येच्या योगानें विनाश झाला असतां, पुन: त्याची उत्पत्ति होणें अशक्य आहे. व त्याचा अनुभव येणेंही संभवनीय नाहीं. ज्यावेळीं आत्मज्ञान होतें त्याचवेळीं विदेहमुक्ति मिळते असें भाष्यकारांनीं " आत्मसाक्षात्कार झाला असतां पूर्वीच्या संचित पुण्यपापांचा त्यांच्याशीं संबंध रहात नाहीं. व ज्ञानानंतर घडणाऱ्या पुण्यपापांचा नाश होतो. कारण, श्रुतीनें तसें सांगितलें आहे " अशा अर्थाच्या व्याससूत्रांवरील भाष्यांत सविस्तर सांगितलें आहे. वर्तमान देहाचा पात ( नाश ) झाल्यावर विदेहमुक्ति मिळते, असें पुष्कळ वर्णन करितात. त्याविषयीं प्रमाणेंही आहेत, " आत्मसाक्षात्कार झाल्यावर देहपात होई तोंच अवकाश असतो, तो होतांच ज्ञानी ब्रह्मरूप बनतो. " असें श्रुतिवचन आहे. ' साधक जेव्हां जीवन्मुक्त होतो तेव्हां प्रारब्धकर्माच्या वेगानें कांहीं काल त्याच शरीरांत राहून, प्रारब्धकर्माचा क्षय झाला असतां, देह त्याग करून पुनरावृत्ति- ( पुनर्जन्म ) रहित व निरतिशय अनंदरूप अशा कैवल्यनामक विष्णूच्या परम पदास प्राप्त होतो,' असें आचार्यांनीं वाक्यवृत्तींत हाटलें आहे. " प्रारब्ध पुण्य व पाप यांचा भोगानें क्षय करून ज्ञानी ब्रह्मरूप होतो. " असें सूत्रकार व्यासांनींही सांगितलें आहे, " वायु जसा अस्पंदतस ( निश्चलतेस ) प्राप्त होतो त्याप्रमाणें आपला देह कालाच्या अधीन झाला असतां, ज्ञानी जीवन्मुक्त पदाचा त्याग करून विदेहमुक्त होतो, " असें श्रीवसिष्ठाचेंही वचन आहे. तेव्हां इतकीं प्रमाणें असतांना त्यांच्या विरुद्ध तुह्मी कसें सांगतां? असें कोणी आह्मांस विचारील, ह्मणून त्याचें उत्तर सांगतों. कांहीं विशेष विवक्षेमुळें दोन्हीं मतें योग्य आहेत. विदेहमुक्ति या शब्दांतील देहशब्दानें सर्व देह विवक्षित असल्यामुळें, पुष्कळ विद्वानांनीं वर सांगितल्याप्रमाणें वर्णन केलें आहे. व आह्मी केवळ पुढें होणाऱ्या एका देहास उद्देशून " ज्ञान होतांच विदेहमुक्ति होते " असें ह्मटलें आहे. कारण, त्याचा आरंभ न व्हावा ह्मणूनच ज्ञान संपादन करावयाचें असतें. हा देह तर पूर्वींच आरब्ध ( आरंभिलेला ) आहे. त्यामुळें ज्ञानाच्या योगानेंही त्याच्या आरंभाचें निवारण होणें शक्य नाहीं. तसेंच वर्तमान देहाची निवृत्ति होणें, हेंही ज्ञानाचें फल नव्हे. कारण आरब्ध कर्माचा क्षय झाला असतां अज्ञानी पुरुषांच्या शरीराचीही निवृत्ति होत असते. " तर मग वर्तमान लिंग-शरीराची निवृत्ति हेंच ज्ञानाचें फळ आहे; कारण ज्ञानावाचून त्याचीही

निवृत्ति होत नसते" असें ह्मणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण ज्ञान झालें तरी पुरुष जीवन्मुक्त अवस्थेंत रहातो असें अनुभवास येतें. आणि त्यावरूनच ज्ञानानें त्याची निवृत्ति होत नाहीं, असें उघड होतें. प्रारब्ध कर्मानें प्रतिबंध केल्यामुळें ज्ञान झाल्यावरही कांहीं काल जरी त्याची निवृत्ति न झाली तरी प्रतिबंधाचा ह्मणजे प्रारब्धाचा क्षय झाला असतां तें ( ज्ञान ) लिंगशरीरास क्षीण करूं शकेल, ह्मणून ह्मणावें तर आचार्यांच्या प्रत्यक्ष शिष्यांनीं ह्मणजे पद्मपादाचार्यांनीं पंचपादिकेंत "ज्ञान अज्ञानाचेंच निवर्तक आहे" असें स्पष्ट ह्मटलें आहे. व त्याच सिद्धांताचें उत्तम रीतीनें उपपादन केलें आहे, तर मग लिंगदेहाच्या निवृत्तीचें साधन कोणतें? ह्मणून विचाराल, तर, सामग्रीची निवृत्ति हेंच त्याच्या निवृत्तीचें साधन आहे, असें आमचें निश्चित मत आहे. कारण कोणत्याही कार्याची निवृत्ति १ विरोधी ( शत्रु ) चें अस्तित्व असल्यामुळें, २ किंवा सामग्रीची निवृत्ति झाल्यामुळें, अशी दोन प्रकारें होत असते. दीपज्योति ह्या कार्याची निवृत्ति एक तर वायूच्या अस्तित्वामुळें ह्मणजे वारा वाहूं लागल्यामुळें होते, किंवा तेल व वात इत्यादि त्याची सामग्री संपल्यामुळें होते. पण लिंगदेहाचा साक्षात् विरोधी कोणी आढळत नाहीं. ह्मणून सामग्रीचा नाश झाल्यामुळें त्याचा नाश होतो, हा दुसरा प्रकारच येथें घेतला पाहिजे. लिंगदेहाची सामुग्री प्रारब्ध व अनारब्ध अशी दोन प्रकारची असते. त्या दोन्ही प्रकारच्या सामुग्रीमुळें अज्ञानी पुरुषाचा लिंगदेह यालोकीं व परलोकीं रहातो. पण ज्ञानी पुरुषाच्या अनारब्ध संचित कर्माची ज्ञानानें निवृत्ति होत असल्यामुळें, व प्रारब्धाची भोगानें निवृत्ति होत असल्यामुळें, तेल व वात हीं दोन्हीं संपलीं असतां ज्याप्रमाणें दीप जातो, त्याप्रमाणें त्याच्या लिंगशरीराची निवृत्ति होते. तस्मात् लिंगशरीराची निवृत्ति होणें, हें ज्ञानाचें फल नव्हे. आता—याच न्यायानें उत्तर जन्माचा आरंभ न होणें हेंही ज्ञानाचें फल नव्हे. कारण, उत्तर देहाचा आरंभ न होणें हेंच ज्ञानाचें फल मानल्यास तो आनारंभ प्रागभावरूप ( ह्मणजे कार्यानें उत्पत्तीच्या पूर्वी नसणें या रूपाचा ) असल्यामुळें तो अनादि आहे. अनादि ह्मणजे कधीं उत्पन्न न झालेला. अर्थात् तो फार फार जुना आहे. त्यामुळें तें ज्ञानफल आहे, असें ह्मणतां येत नाहीं. तसेंच उत्तर देहांच्या आरंभाच्या प्रागभावाचें प्रतिपालन करणें हें ज्ञानाचें फल आहे, असेंही ह्मणतां येत नाहीं. कारण अनारब्ध ( संचित ) कर्माची निवृत्ति झाल्यानेंच त्याचें रक्षण होणें शक्य आहे. शिवाय अविद्यानिवृत्ति हेंच विद्येचें फल

असल्यामुळें, उत्तर जन्मनिवृत्ति हें ज्ञानफल होऊं शकत नाहीं, असें कोणी ह्मणेल, पण तें बरोबर नाहीं. कारण उत्तरजन्माचा अनारंभ इत्यादि ज्ञानाचेंच फल आहे. हें प्रमाणतः सिद्ध आहे. "जेथून परत येऊन पुनः जन्म घेत नाहीं," इत्यादि श्रुती याविषयीं प्रमाण आहेत. पण असें ह्मटल्यास "ज्ञान अज्ञानाचाच शत्रु आहे" या न्यायाशीं विरोध येतो, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण पद्मपादाचार्यांच्या त्या वाक्यांतील अज्ञानशब्दानें, अज्ञान व त्याच्या बरोबर नियमानें रहाणारीं अब्रह्मत्वादि अज्ञान कार्यें, यांचें ग्रहण करावें लागतें. व त्या आचार्यांचीहि तशीच इच्छा होती, असें न मानल्यास अनुभवाशीं विरोध येतो. कारण ज्ञानाच्या योगानें अज्ञानाप्रमाणें त्याच्याबरोबर नियमानें राहणाऱ्या त्याच्या अब्रह्मत्वादि कार्यांचीही निवृत्ति होते, असा प्रत्यक्ष अनुभव येतो. तस्मात् उत्तर देह राहित्यरूप विदेहमुक्ति ज्ञान होतांच मिळते. "हे जनका तूं अभयास प्राप्त झाला आहेस." व "अरे बाबा, हेंच तें प्रसिद्ध अमृत होय," असें याज्ञवल्क्यानींही सांगितलें आहे. "त्या आत्म्यास अशा-प्रकारें जाणणारा पुरुष जिवंत असतांनाच अमृत होतो" असें दुसऱ्या एका श्रुतींतही ह्मटलें आहे. शिवाय तत्त्वज्ञान उत्पन्न झाल्याबरोबर जर त्याचें विदेहमुक्ति हें फल न मिळालें तर तें दुसऱ्या केव्हां तरी मिळेल, असें ह्मणावें लागणार. पण तसें ह्मटल्यास ज्योतिष्टोमादि यज्ञाप्रमाणें ज्ञानापासूनही कांहीं अपूर्व उत्पन्न होतें, अशी कल्पना करावी लागेल. व त्यामुळें कर्मशास्त्रांतच ज्ञानशास्त्राचा अंतर्भाव होतो, असें मुकाट्यानें मान्य करावें लागेल. आतां कोणी यावर अशी युक्ति सुचवितील कीं, मंत्रादि उपायांच्या योगानें प्रतिबद्ध झालेलें ज्ञान त्यावेळीं मुक्ति न देतां प्रारब्धकर्माचा भोगानें क्षय झाल्यावर ह्मणजे कालांतरीं विदेहमुक्ति देते, असें मानावें. पण तिचा कांहीं उपयोग होणार नाहीं. कारण, मंत्र व अग्नि यांच्याप्रमाणें प्रारब्ध व मुक्ति यांच्या मध्येंही विरोध नाहीं. व त्यावांचून त्यांतील एक दुसऱ्यास प्रतिबंध करूं शकत नाहीं. भाविदेहाचा अत्यंत अभाव ( कारणासह नाश ) ह्मणजे विदेहमुक्ति, असा आमचा अभिप्राय आहे. यास्तव, अशा प्रकारची विदेहमुक्ति व केवल वर्तमान शरीराचें रक्षण करणारें प्रारब्ध, यांच्यामध्यें विरोध कसा असणार ? व तो जर नाहीं तर प्रारब्ध ज्ञानफलास प्रतिबंध कसें करणार ? शिवाय वृत्ति-ज्ञान क्षणिक असतें. तेव्हां कालांतरीं स्वतःच विद्यमान नसणारें तें मुक्ति कशी देणार ? चरम साक्षात्कार या नांवाचें दुसरेंच एक ज्ञान मरणसमयीं

उत्पन्न होतें व तें मुक्ति देतें ह्मणून ह्मणावें तर त्यावेळीं ज्ञानोत्पत्तीचें साधन रहात नसल्यामुळें त्याची उत्पत्ति होणें दुर्घट आहे. कारण, ज्ञानास प्रतिबंध करणारें प्रारब्ध निवृत्त झालें असतां त्याच्याचबरोबर गुरु, शास्त्र, देह, इंद्रियें इत्यादि सर्व जगद्रूपी भ्रम निवृत्त होत असल्यामुळें त्यावेळीं ज्ञानसाधनच रहात नाहीं. तर मग " भूयश्चान्ते विश्वमायानिवृत्तिः " या श्रुतिवचनाचें तात्पर्य काय? असें कोणी विचारील तर सांगतों. प्रारब्धाचा अंत झाला असतां ह्मणजे निमित्ताचा अभाव झाला असतां, देह, इंद्रियें इत्यादि सर्व नैमित्तिकांचा अभाव होतो, असा त्या वाक्याचा अर्थ आहे. यास्तव वर्तमान देहानें रहित होणें, ही विदेहमुक्ति आहे, असें जें कित्येकांचें ह्मणणें आहे, तें देहपातानंतर टीक आहे. व मरणानंतर प्राप्त होणाऱ्या तिचें तेंच तात्पर्य असूं दे. पण आह्मांस मान्य असलेली मुक्ति ज्ञानसमकालीन आहे, ह्मणजे ज्ञान होतांक्षणीं ती मिळते. व हाच अभिप्राय मनांत ठेवून भगवान् शेषानें ह्मटलें आहे. कीः—

तीर्थे श्वपचगृहे वा नष्टस्मृतिरपि त्यजन्देहम् ।
ज्ञानसमकालमुक्तः कैवल्यं याति हतशोकः ॥ १ ॥

अर्थः—ज्ञानसमयींच मुक्त झालेला पुरुष मरणकालीं तीर्थाचे ठायीं शरीराचा त्याग करो, कीं चांडालाच्या घरीं मरो, त्या वेळीं तो सावध असो, कीं मोहित झालेला असो, पण तो शोकरहित होऊन कैवल्यास प्राप्त होतो, तस्मात् विदेहमुक्तीमध्यें तिच्या तत्त्वज्ञानसंज्ञक साक्षात्साधनाचें प्राधान्य असणें युक्तच आहे. पण वासनाक्षय व मनोनाश हीं ज्ञानाचीं साधनें असल्यामुळें व ती मुक्ति आणि हीं दोन साधनें यांमध्यें ज्ञानाचा पडदा असल्यामुळें तीं विदेहमुक्तीचीं गौण साधनें आहेत. आसुरवासनेचा क्षय करणाऱ्या दैववासनेस ज्ञानाचें साधनत्व आहे. म्हणजे ती त्याचें साधन आहे, असें श्रुति व स्मृति यांवरून ठरतें. " शांत, दांत, उपरत, तितिक्षु व समाहित होऊन आपल्यामध्येंच आत्म्यास पहावें. " अशी श्रुति आहे. व " अमानित्वमदंभित्व० " इत्यादि स्मृतिवचनें आहेत. त्यांचा सारांश असाः— अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षमा, आर्जव, गुरुसेवा, शौच, चित्ताचें स्थैर्य, शरीराचा निग्रह, इंद्रियांच्या विषयांविषयीं वैराग्य, अहंकाररहित्य, जन्म—मृत्यु—जरा—व्याधि इत्यादि प्रसंगीं होणाऱ्या दुःखामध्यें दोष पहाणें, जगांतील कोणत्याही पदार्थामध्यें प्रेम न ठेवणें, पुत्र, स्त्री, गृह इत्यादिकांचे

ठायीं „ हीं माझी" असा ममभाव न ठेवणें, इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां त्या दोघांच्याही ठिकाणीं समभाव ठेवणें, ईश्वराच्याठायीं अनन्ययोगानें अव्यभिचारिणी भक्ति ठेवणें, एकांत देशाचें सेवन करणें, जनसमूहात मिळण्याचें प्रेम न बाळगणें, आत्मज्ञानामध्यें नित्य रत होणें व तत्त्वज्ञानाचा विषय जो आत्मा त्याचें दर्शन करणें, हीं वीस ज्ञानाचीं साधनें आहेत, मनोनाश ज्ञानाचें साधन आहे, असेंही श्रुति व स्मृति यांमध्यें सांगितलें आहे. " त्यानंतर ध्यान करणारा त्या कलारहित आत्म्यास पहातो." व " प्रत्यगात्म्यामध्यें चित्त स्थिर केलें असतां स्वयंप्रकाश आत्म्यास जाणून तो ज्ञानी हर्ष व शोक यांस टाकितो. " अशा अर्थाच्या श्रुति व " जे निद्रारहित आहेत. ज्यांनीं श्वासास जिंकलें आहे, जे प्राप्त स्थितींत संतुष्ट असतात व ज्यांनीं इंद्रियांस जिंकलें आहे, असे योगी ज्या ज्योतिःस्वरूप परमात्म्यास पहातात त्या विद्यारूपी ईश्वरास नमस्कार असो. " अशा अर्थाची स्मृति आहे. तस्मात् याप्रमाणें तत्त्वज्ञानादि तीन साधनांतील तत्त्वज्ञानास विदेहमुक्तिप्रसंगीं प्राधान्य असतें व दुसरीं दोन गौण असतात आणि जीवन्मुक्तीप्रसंगीं मनोनाश व वासनाक्षय यांस प्राधान्य असतें व तत्त्वज्ञान गौण असतें ही व्यवस्था सिद्ध झाली. ह्मणूनच विविदिषा संन्याशानें या तिघांचेंही संपादन केलेलें असतें. विद्वत्संन्यासानंतर तत्त्वज्ञानांची नुस्ती अनुवृत्ति झाली कीं, पुरे होते. पण मनोनाश आणि वासनाक्षय यांच्याकरितां प्रयत्नच करावा लागतो. कारण, विद्येचा अधिकारी कृतोपास्ति व अकृतोपास्ति असा दोन प्रकारचा असतो. उपास्य देवतेचा साक्षात्कार होईपर्यंत उपासना करून जर साधक ज्ञानामध्यें प्रवृत्त झाला तर त्याचा मनोनाश व वासनाक्षय अति दृढ झालेला असल्यामुळें ज्ञानानंतर त्याचा विद्वत्संन्यास व जीवन्मुक्ति आपोआप सिद्ध होतात. ह्मणजे त्यांच्याकरितां त्यास निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं. शास्त्रास मान्य असलेला असला साधकच मुख्य विद्याधिकारी होय. अशा पुरुषास उद्देशून शास्त्रांत दोन्ही संन्यास एकच कालीं सांगितलेले असतात. ह्मणजे अशा मुख्य अधिकाऱ्यास प्रथम विविदिषा संन्यास व मागून विद्वत्संन्यास असा क्रम ठेवावा लागत नाहीं. आणि त्यामुळेंच त्या संन्यासांचें स्वरूप जरी निरनिराळें असलें तरी ते त्यांच्याठायीं संकीर्ण झाल्यासारिखे रहातात. परंतु आधुनिक साधक प्रायः उपास्याची साक्षात्कारापर्यंत उपासना न करितांच केवल उत्सुकतेमुळें एकाएकीं विद्येमध्यें प्रवृत्त होतात. ते तेवढ्या वेळे पुरतें मनोनाश व

वासनाक्षय यांचें संपादन करितात. व श्रवण, मनन आणि निदिध्यासन यांचें अनुष्ठान करितात. त्यांचा दृढ अभ्यास झाला असतां अज्ञान, संशय व ' देहच मी आहें ' हा विपरीत भाव यांचें निरसन होऊन तत्त्वज्ञान उत्पन्न होतें. त्यानंतर त्यास बाध करणारें कांहीं नसल्यामुळें व एकदां निवृत्त झालेल्या अविद्येची पुनरपि उत्पत्ति होण्याचें कारण रहात नसल्यामुळें तें ज्ञान शिथिल होत नाहीं. पण भोग देणारें प्रारब्ध मनोनाश व वासनाक्षय यांस वारंवार बाधित करितें. कारण, त्यांच्याकरितां यानें दृढ अभ्यास केलेला नसतो. यास्तव, अशा गौण विद्याधिकाऱ्यांचें ज्ञान जरी बाधित न झालें तरी वारा वहात असलेल्या प्रदेशांतील दीपाप्रमाणें मनोनाश व वासनाक्षय निवृत्त होतात. ह्मणूनच " वासनात्याग इतर सर्व साधनांहून विलक्षण आहे. मेरूपर्वतास उचलून टाकण्यापेक्षांही हा दुःसाध्य आहे, असें विद्वान् समजतात, " असें वसिष्ठांनीं ह्मटलें आहे. अर्जुनानेंही कृष्णा, हें मन चंचल, व्याकुल करून सोडणारें, बळकट व दृढ आहे. वायूप्रमाणें त्याचा निग्रह मला अति दुष्कर वाटतो, असें ह्मटलें आहे. यास्तव, आधुनिक विद्वत्संन्याशाचे ठायीं ज्ञानाची अनुवृत्ति होते पण मनोनाश व वासनाक्षय यांस त्यांनाहीं प्रयत्नानें सिद्ध करावें लागतें, असें सिद्ध झालें.

आतां ज्या वासनेचा क्षय करण्याविषयीं दीर्घ प्रयत्न करावा लागतो तिचें स्वरूप वसिष्ठांनीं कसें सांगितलें आहे तें पहा:—

प्राण्याला ज्या ज्या गोष्टींचा दीर्घ परिचय घडतो त्या त्याविषयीं त्याची भावना दृढ होते. अशा दृढ भावनेमुळें, प्रसंग आला असतां, मागचा पुढचा विचार न रहातां परिचित कार्य घडणें ही वासना होय. प्राण्यानें तीव्र वेगानें ज्याची भावना केलेली असते तोच विकार त्याच्या चित्तांत, निमित्त होतांच, उभा रहातो. क्रोध, दया, अभिमान, मृदुता इत्यादि बऱ्या वाईट भावांचा पूर्ण दृढ अभ्यासामुळें त्याचें त्याचें निमित्त होतांच—सहज उद्भव होतो. उदाहरणार्थ—क्रोधाची दृढ भावना झालेली असल्यास " क्षमा करावी, कोणावर रागावूं नये " असा एकाद्यानें जरी निश्चय केलेला असला तरी तो प्रसंगीं टिकत नाहीं. तर निमित्त होतांच क्रोध येतो, क्षमेचा दृढ परिचय झालेला असल्यास तिच्यापुढें इतर भावही असेच निर्बल होतात. अशा वासनेच्या योगानें पुरुष परतंत्र झालेला असतो. त्यास त्याच्या वासनेप्रमाणेंच सर्व जग अनुकूल किंवा प्रतिकूल दिसतें. व वासनेप्रमाणेंच त्याचीं सर्व कार्यें घडत असतात.

प्राण्यांच्याठायीं आढळणारा आपापल्या देशाचाराचा, कुलधर्माचा, भाषेचा व त्यांतील बऱ्या वाईट शब्दांचा अभिमान, हें या वासनेचेंच सामान्य उदाहरण आहे. तिचे भेद सांगितल्यावर आणखी विशेष उदाहरण देऊं. या वर सांगितलेल्या वासनेस उद्देशून " त्या पुरुषास जशी इच्छा होते त्याप्रमाणें तो संकल्प करितो; जसा संकल्प करितो तसेंच कर्म करितो व कर्माप्रमाणेंच त्यास फळ मिळतें. " असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे. योगवासिष्ठाच्या आरंभींच श्रीवाल्मीकिमुनींनीं—वासनेचे शुद्ध व मलिन असे दोन प्रकार सांगितले आहेत. त्यांतील मलिन वासना जन्मास कारण होते व शुद्ध वासना जन्माचा विनाश करिते. अति घन अज्ञान व भयंकर अहंकार यांनीं भरलेली मलिन वासना पुनर्जन्म देते—असें सांगितलें आहे. पण पुनर्जन्माचा अंकुर टाकून भाजलेल्या बीजाप्रमाणें देहधारणाच्या उपयोगीं असणारी व जिनें ज्ञेय जाणलें आहे अशा वासनेस शुद्ध वासना म्हणतात. देहादि पांच कोश व त्यांचा साक्षी चिदात्मा यांच्या भेदास झांकून टाकणारें जें अज्ञान त्याच्या योगानें मलिन वासनेचा आकार अति घन झालेला असतो. दुधांत ताक घातलें असतां तें घन ( घट्ट ) होतें. पण पातळ तूप अति थंड प्रदेशीं ठेवलें असतां अति घन ( फार घण ) होतें. त्याप्रमाणेंच या वासनेचा अति घनपणा जाणावा. अनेक भ्रांत्यांची परंपरा लागणें, यासच येथें घन म्हटलें आहे. कारण अमूर्त वासनेच्या ठायीं लौकिक घनपणा येणें अशक्य आहे. अशा प्रकारच्या या वासनेचें वर्णन श्रीमद्भगवद्गीतेंत आसुरसंपत्तीच्या विवरण-प्रसंगीं भगवानांनीं केलें आहे, तें असें—आसुर जन प्रवृत्ति कोठें करावी, व कोणत्या कर्मापासून निवृत्त व्हावें, हें जाणत नाहींत. त्याच्यामध्यें शौच नसतें, आचार नसतो, व सत्यही नसतें. हें जग, असत्य, प्रतिष्ठारहित व ईश्वरावांचूनच आहे, स्त्री व पुरुष यांच्या संयोगापासून उद्भवणाऱ्या याचें कामावांचून दुसरें कांहीं कारण नाहीं.' या मताचा आश्रय करून ते नष्टबुद्धि व अविवेकी पुरुष उग्र कर्में करणारे होतात. ते जगाचे शत्रु जगाच्या नाशाकरितांच उत्पन्न होतात. ज्याची तृप्ति होणें कधींही शक्य नाहीं, अशा कामाचा आश्रय करून दंभ, मान व मद यांनीं युक्त झालेले व ज्यांचीं व्रतें अशुद्ध आहेत असे ते मोहानें दुराग्रह धरून घोर कृत्यांत प्रवृत्त होतात. पण त्यामुळें मेल्यावरच जिचा अंत होणें शक्य आहे, अशी भयंकर चिंता त्यांस लागते. विषयानंदाचा उपभोग घेण्यांत तत्पर राहून हाच

श्रेष्ठ पुरुषार्थ आहे, असें ते समजतात. शेंकडों आशापाशांनीं ते बद्ध झालेले असतात. काम व क्रोध यांच्या परायण होऊन जातात व विषयोपभोग घेण्यास मिळावा ह्मणून अन्यायानें द्रव्यसंचय करण्याचा प्रयत्न करितात. त्या आसुरी लोकांच्या अहंकाराचेंही भगवानांनीं असें वर्णन केलें आहे:—

मला आज हें इतकें धन मिळालें; आतां आणखी हाही माझा मनोरथ पूर्ण होईल. हें धन मजजवळ आहे व आणखी इतकें मला लवकरच मिळेल. या एका शत्रूला तर मी आज मारून टाकिलें आहे, दुसऱ्यांनाही लवकरच मारीन. मी ईश्वर आहें, भोगी, सिद्ध, बलवान्, सुखी, धनधान्यसंपन्न व कुलीन आहें. माझ्यासारखा आणखी दुसरा कोण आहे? कीर्तीकरितां मी यज्ञ करीन; नाचणारे, गाणारे इत्यादिकांस पुष्कळ धन देईन; व पुष्कळ आनंद भोगीन, इत्यादि अनेक प्रलाप अज्ञानामुळें मोहित झालेले ते तोंडांतून काढीत असतात. अनेक अस्थिर चित्तवृत्तीमुळें ते अतिशय भ्रांत झालेले असतात. मोहाच्या जाळ्यामध्यें अडकून पडलेले असतात; आणि विषयोपभोगांत अतिशय आसक्त झालेले असतात. त्यामुळें ते आसुरसंपत्तीनें युक्त असलेले मानव अशुचि नरकांत पडतात. येथें त्यांच्या अनेक पुनर्जन्माचें कारण सांगितलें आहे. व पुनरपि त्याच्याच अहंकाराचा असा विस्तार केला आहे.—ते आपली संभावना आपणच करितात; गर्वानें स्तब्ध होऊन रहातात; धनाचा गर्व व मद यांनीं ते युक्त होतात. अंत:करणांत धर्माविषयीं थोडासाही आदर नसतांना बाहेरून आह्मी मोठे धार्मिक आहों, असा डौल आणून शास्त्रीय विधीवांचून नांवाचे यज्ञ करितात. अहंकार, अधार्मिक बल, दर्प, काम, व क्रोध यांचा आश्रय करितात. दुसऱ्याच्या गुणांमध्यें दोषदृष्टि ठेवणारे ते मूर्ख आपल्या व दुसऱ्यांच्या शरिरांत असणाऱ्या माझा अतिशय द्वेष करितात. यास्तव द्वेष करणाऱ्या त्या क्रूर व अशुभ नराधमांस मी या संसारांतील आसुर योनीमध्येंच सतत टाकितों. याप्रमाणें आसुरी योनीस प्राप्त झालेले ते मूढ मला न पोंचतांच जन्मोजन्मीं अधिकाधिक अधम योनींत जातात. असो; येथवर मलिन वासनेचें वर्णन केलें. व तिचा परिणाम काय होतो तेंही सांगिलें. आतां शुद्ध वासना ह्मणजे काय तें सांगतों. जिला ज्ञेयाचें ज्ञान झालें आहे ती शुद्ध वासना होय. ज्ञेयाचें स्वरूप भगवानानीं श्रीगीतेच्या तेराव्या अध्यायांत सांगितलें आहे; तें असें— ज्याचें ज्ञान झालें असतां अमृत प्राप्त होतें तें ज्ञेय मी आतां सांगतों. अनादि

परब्रह्म ज्ञेय आहे. तें प्रत्यक्ष दिसत नसल्यामुळें त्यास 'सत्' ह्मणतां येत नाहीं व सर्व व्यवहारास कारण होत असल्यामुळें " असत् " असेंही ह्मणतां येत नाहीं. त्याला सर्वत: हातपाय आहेत; सर्वतः नेत्र, मस्तकें, व मुखें आहेत; सर्वतः कान आहेत व याप्रमाणें तें सर्व शरीरास व्यापून राहिलें आहे. सारांश सर्व प्राण्यांच्या इंद्रियांवरून क्षेत्रज्ञाचें अस्तित्व ठरवितां येतें. हात, पाय, मुख इत्यादि सर्व क्षेत्राचें विभाग आहेत, पण ते उपाधिभूत मिथ्या अवयवही ज्ञेयाचे धर्म आहेत, अशी कल्पना करून येथें वर्णन केलें आहे. तसेंच सर्व इंद्रियगुणांच्या योगानें तें भासतें, ह्मणजे तें ज्ञेय सर्व इंद्रियांच्या व्यापारांनीं स्वतः व्यापारयुक्त आहे, असें भासतें, पण वस्तुतः तें व्यापार करीत नाहीं. कारण तें सर्व इंद्रियांनीं रहित आहे. तें कोठेंही संबद्ध होत नाहीं. तथापि तें या जगत् भ्रमाचें अधिष्ठान आहे. तें सत्त्व, रज व तम या गुणांनीं रहित आहे. तथापि शब्दादिकांच्या द्वारा सुख, दुःख व मोह या आकारानें परिणत झालेल्या गुणांचें भोग घेणारें ह्मणजे त्या सुखादिकांस जाणणारें आहे. तें शरीराच्या बाहेर व आंत असतें. चर व अचर तेंच आहे. आकाशाप्रमाणें अतिसूक्ष्म असल्यामुळें तें ज्ञेय, अविद्वानांस विशेषतः ज्ञात होत नाहीं. त्यामुळें तें कोठें दूर आहे, असें त्यांस वाटतें; आणि विवेकावांचून त्यांचें ज्ञान शेंकडों वर्षांनींही होणें शक्य नसल्यामुळें तें त्यांच्यापासून दूरच असतें. पण विवेकी ज्ञान्यास तें ज्ञेय आपला आत्माच आहे, असें निश्चयपूर्वक वाटत असल्यामुळें त्याच्या अगदीं जवळ असतें. तें वस्तुतः एकच असतांना या अनेक प्राण्यांच्या शरीरांत निरनिराळें असल्यासारिखें वाटतें. जगाच्या स्थितिकालीं तें भूतांस धारण करितें; प्रलयकालीं त्याचा ग्रास करण्याचें त्याचें शील आहे; आणि उत्पत्तिकालीं तें भूतांस निर्माण करितें. आदित्यादि ज्योतींनाहीं तें प्रकाशित करितें आणि अज्ञानाचा त्यास स्पर्शही झालेला नसतो; इत्यादि. अशा प्रकारचें ज्ञेय जिला समजलें आहे ती शुद्ध वासना होय. या ज्ञेयाचें वर्णन करितांना सोपाधिक व निरुपाधिक असें दोन प्रकारचें त्याचें रूप सांगितलें आहे. कारण त्यावाचून तटस्थलक्षण व स्वरूपलक्षण अशा दोन्हीं लक्षणांवरून त्याचें ज्ञान होणार नाहीं. कांहीं काल वस्तूशीं संबंध ठेवून तिला लक्षित करणाऱ्या लक्षणास तटस्थ लक्षण व त्रिकालीं संबंध ठेवून लक्षित करणाऱ्या लक्षणास स्वरूप लक्षण ह्मणतात. " ज्याच्यावर कावळा बसला आहे,तें देवदत्ताचें गृह" हें देवदत्ताच्या गृहाचें तटस्थ लक्षण आहे. कारण

कावळा त्याच्यावर नेहमीं बसलेला नसतो. पण दुसऱ्या कोणास तें दुरून दाखवावयाचें होतें, तेव्हां त्याच्यावर तो बसलेला होता, आणि त्यामुळें त्या परक्या मनुष्यास देवदत्ताच्या गृहाचें ज्ञान झालें. ह्मणून कावळा हें त्या गृहाचें तटस्थ लक्षण होय. पौर्णिमेस रात्रौ—आल्हाद कारक प्रकाशानें युक्त असणारा चंद्र होय. हें चंद्राचें स्वरूपलक्षण आहे. कारण तें त्याच्या ठायीं नित्य रहातें. हात, पाय, नेत्र इत्यादिकांचा निर्देश करून वरील वर्णनांत ज्ञेयाचें तटस्थ लक्षण सांगितलें आहे. व सर्व इंद्रियरहित, निर्गुण इत्यादि शब्दांनीं त्याचें स्वरूपलक्षण सांगितलें आहे.

असो; पूर्वापर विचाराचा त्याग करणें हें वासनेचें सामान्य लक्षण आहे. पण ज्ञेयाचें ज्ञान विचारामुळें होत असतें, असें पाहून, वरील वासनेचें लक्षण या शुद्ध वासनेंत नाहीं, असें कोणास वाटण्याचा संभव आहे. पण—दृढ भावनेंमुळें पूर्वापर विचार सोडणें—असें वर तात्पर्यतः दिलेल्या वसिष्ठ वचनांत स्पष्ट ह्मटलेलें असल्यामुळें, तसें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. अनेक जन्मांतील दृढ अभ्यासानें भावना दृढ झाल्यामुळें या जन्मीं कोणाच्या उपदेशावांचूनच " हा मी; हें माझें;" व काम, क्रोध, इत्यादि मलिन वासना उद्भवतात, हें सर्वांस ठाउक आहे. त्याचप्रमाणें ज्ञेयाचें अगदीं प्रथम होणारें ज्ञान जरी विचाराच्या योगानेंच होत असलें, तरी पुढें त्याचें दीर्घ काल व मोठ्या सत्कारानें सतत सेवन केल्यामुळें तत्त्वाची भावना दृढ होते. नंतर महावाक्यें, युक्त्या, इत्यादिकांस मनांत आणल्यावाचून, पुढें असलेल्या एकाद्या वस्तूप्रमाणें, एकाएकीं तत्त्वाचें स्फुरण होतें. अशा प्रकारच्या बोधानुवृत्तीसह इंद्रियांचा व्यवहार हीच शुद्ध वासना होय. ही केवल देहाच्या जीवनाच्या उपयोगीं पडते. ह्मणजे हिच्या योगानें केवल देह जिवंत रहातो. दंभ, दर्प इत्यादि वर सांगितलेल्या आसुर संपत्तीच्या उत्पत्तीस हिचा कांहीं उपयोग होत नाहीं. किंबहुना ही शुद्ध वासना दुसऱ्या जन्मास कारण होणाऱ्या धर्मास व अधर्मासही उत्पन्न करूं शकत नाहीं. भाजलेलीं—व्रीहि, गहूं—इत्यादि बीजें, मापें भरण्याच्या मात्र उपयोगीं पडतात. तीं मधुर अन्न तयार करण्याच्या किंवा पेरण्याच्या उपयोगीं नसतात. तसाच या शुद्ध वासनेचा प्रकार समजावा.

ही मलिन वासना तीन प्रकारची आहे. लोकवासना, शास्त्रवासना व देहवासना असे ते तीन प्रकार होत. कोणीही माझी निंदा करणार नाहींत.

तर सर्व माझी मोठी स्तुति करतील व कीर्ति गातील, असेंच मी सर्वदां आचरण करीन. अशी महत्वाकांक्षा ठेवणें ही लोकवासना होय. लोकांनीं आपला सत्कार करावा, आपली कीर्ति व्हावी, इत्यादि इच्छा बहुतेक सर्व मनुष्यामध्यें असतात. पण ही लोकवासना पूर्ण होणें अशक्य आहे. आणि ह्मणूनच तिला मलिन वासना असें ह्मटलें आहे. आतां ती वासना पूर्ण होणें अशक्य कसें ? ह्मणून ह्मणाल तर सांगतों—सांप्रतकालीं या लोकीं गुणवान् व वीर्यवान् कोण बरें आहे ? असा वाल्मीकि मुनींनीं नारदास प्रश्न केला असतां, त्या देवर्षींनीं ज्याचें वर्णन केलें त्या रामाचीही जगांत निंदा झाली; सर्व पतिव्रतास्त्रियांच्या अग्रभागीं बसण्यास योग्य असलेल्या सीतादेवीचीही न ऐकण्यासारिखी अपकीर्ति झाली. मग इतरांविषयीं काय बोलावें ? ह्मणजे अशा पवित्र स्त्रीपुरुषांसही जर लोकरंजन करितां आलें नाहीं, तर आमच्या सारख्या पामरांची कथा काय ? एका देशांतील, धर्मांतील व पक्षांतील लोक दुसऱ्या धर्मादिकांतील लोकांची व ते त्यांची निंदा करीत असतात; हें तर सर्वांस ठाऊक आहेच. दाक्षिणात्य ब्राह्मण उत्तरेकडेचे वेदवेत्ते ब्राह्मण मांस खातात ह्मणून त्यांची निंदा करितात व ते मातुलकन्येशीं विवाह करणाऱ्या व यात्रेंत मातीची भांडीं नेणाऱ्या दाक्षिणात्यांची निंदा करितात. ऋग्वेदी आपली आश्वलायन शाखा कण्वशाखेहून प्रशस्त आहे, असें समजतात. व वाजसनेयी कण्वशाखा प्रशस्त आहे, असें ह्मणतात. तात्पर्य याप्रमाणें आपलें कुल, गोत्र, बंधुवर्ग, इष्टदेव इत्यादिकांची प्रशंसा करावी व दुसऱ्यांच्या कुलादिकांची निंदा करावी, हें कोणास शिकवावें लागत नाहीं, तर विद्वान्, स्त्रिया, मुलें, अडाणी लोक, इत्यादि सर्वांची स्वभावतःच तशी प्रवृत्ति होत असते. त्यामुळें जगांत चांगलेपणा मिळणें फार कठिण आहे. आपल्या पवित्रतेनें, उन्मत्ताप्रमाणें आचरणानें, चंचल स्वभावानें, शहाणपणानें, सामर्थ्यानें, अशक्तपणानें, चुकवाचुकवीनें, सौभाग्याच्या योगानें अथवा कामसंपन्न असल्यानेंही कोणी सर्व लोकांचें समाधान करण्यास —समर्थ होत नाहीं. सारांश जगांतील प्राणी विलक्षण स्वभावाचे असल्यामुळें कांहीं लोकांस पवित्रता आवडते तर कित्येकांस उन्मत्तपणा आवडतो. आणि त्यामुळें एका प्राण्यास सर्वांचें चित्तरंजन करितां येत नाहीं. एवढ्याकरितांच सर्वथा स्वहित करावें. लोक उगीच बडबड कां करीत आहेत ? सर्व लोकांस संतुष्ट करील असा एकही उपाय नाहीं—असें भर्तृहरींनीं म्हटलें आहे.

तात्पर्य, येणेंप्रमाणें ही लोकवासना मलिन आहे असा अभिप्राय मनांत धरूनच योगीश्वरानें तुल्यनिंदास्तुति व्हावें, असें मोक्षशास्त्रांत सांगितलें आहे.

शास्त्रवासना तीन प्रकारची आहे. पाठव्यसन, शास्त्रव्यसन व अनुष्ठानव्यसन असे ते तीन प्रकार होत. पाठव्यसन भारद्वाजाचे ठायीं होतें. त्यानें पंचाहत्तर वर्षे वेदाध्ययन केलें. तेव्हां अगदीं वृद्ध झालेल्या त्याच्या जवळ इंद्र आला व त्यास म्हणाला, " मी तुला अणखी पंचवीस वर्षे आयुष्य देतों. पण तूं त्याचा उपयोग कसा करशील ? " तेव्हां तो मुनि " त्या पंचवीस वर्षांतही मी राहिलेल्या वेदाचें अध्ययन करीन " असें म्हणून तसें करण्यास तयार झाला. तें पाहून इंद्रास आश्चर्य वाटलें. व पंचवीस वर्षांत राहिलेल्या समुद्रतुल्य वेदभागाचें अध्ययन होणें शक्य नाहीं, यास्तव, ती त्याची मलिन वासना आहे, असें जाणून इंद्रानें त्याची वेदाध्ययनावरील आसक्ति कमी केली व त्याहून अधिक पुरुषार्थ त्यास प्राप्त व्हावा म्हणून सगुण ब्रह्मविद्येचा उपदेश केला, असें तैत्तिरीय ब्राम्हणांत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें पुष्कळ शास्त्रांचें अवलोकन केलें असतां परम पुरुषार्थ प्राप्त होईल असें समजून अनेक शास्त्रांचा अभ्यास करणें ही सुद्धां एक मलिन वासनाच आहे. " दुर्वासा या नांवाचा कोणी एक मुनि अनेक प्रकारच्या शास्त्रांच्या पुस्तकांसह महादेवास नमस्कार करावयाकरितां आला. तेव्हां त्या सभेंत नारदानें भार वाहणाऱ्या गर्दभाशीं त्याची तुलना केली. त्यामुळें मुनीस राग आला व त्यानें सर्व पुस्तकें समुद्रांत फेंकून दिलीं. तें पाहून महादेवानें त्यास आत्मज्ञान सांगितलें. " अशी काषेयगीतेंत आख्यायिका आहे. चित्ताच्या स्वाभाविक बहिर्मुख वृत्तीस हटवून ज्यानें त्यास अंतर्मुख केलें नाहीं, अशा गुरुकृपाशून्य पुरुषास केवल वेदशास्त्रांच्या अभ्यासानें आत्मविद्या प्राप्त होत नाहीं. " हा आत्मा वेदांचें व्याख्यान केल्यानें, पुष्कळ शास्त्राभ्यासानें व अलौकिक बुद्धीच्या योगानें प्राप्त होत नाहीं. " असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. " अनेक शास्त्रीय कथांचा व्यर्थ खल करीत बसल्यानें काय होणार आहे ? तत्त्वज्ञांनीं मोठ्या प्रयत्नानें आंतरज्योतीस ओळखावें " असें व " चार वेद आणि अनेक शास्त्रें शिकूनही कित्येक षड्रसयुक्त पदार्थांतील पळीप्रमाणें ब्रह्मतत्त्वास जाणत नाहींत. म्हणजे पदार्थांत, त्यास ढवळण्याकरितां घातलेल्या पळीला जशी त्याची रुचि समजत नाहीं, त्याप्रमाणें या अनेक शास्त्रें शिकणाऱ्या पुरुषांची अवस्था असते. कारण,

पदार्थांच्या रसाप्रमाणें त्या सर्व शास्त्राची प्रतिपाद्य वस्तु त्यांस कळत नाहीं" असेंही एके ठिकाणीं म्हटलें आहे. "चवदा विद्या व चवसष्ट कला यांमध्यें निपुण असलेला नारदमुनि आत्मज्ञान नसल्यामुळें संतप्त होऊन सनत्कुमारां-पाशीं आत्मज्ञानार्थ शिष्यभावानें गेला" असें छांदोग्य उपनिषदांत सांगितलें आहे. यास्तव, शास्त्रव्यसन सोडून आत्माभिमुख होणें उचित होय.

अनुष्ठानाचें व्यसन विष्णुपुराणांत सांगितल्याप्रमाणें निदाघाच्या ठायीं होतें. "ऋभूनें वारंवार समजाविलें तरी दाशूराच्या निदाघ पुत्रानें कर्मश्रद्धेमुळें प्राप्त झालेलें जाड्य सोडिलें नाहीं. कर्मश्रद्धेनें अत्यंत विवेकशून्य झालेल्या त्यास अनुष्ठानास योग्य व शुद्ध प्रदेश भूलोकीं कोठेंच मिळाला नाहीं." असें वासिष्ठ रामायणांत वर्णन आहे. ही कर्मवासना पुनर्जन्मास कारण होत अस-ल्यामुळें मलिन होय. "क्षणभंगुर फल देणारें यज्ञकर्मच आपल्या कल्याणाचें साधन आहे, असें समजून जे मूढ कर्मामध्येंच आनंद मानितात ते पुनरपि जरा व मृत्यु यांस प्राप्त होतात. वस्तुतः अविद्येमध्येंच असणारे पण आपणांस बुद्धिमान् व ज्ञानी मानणारे हे कर्मठ, आंधळा ज्यास धरून नेत आहे अशा आंधळ्याप्रमाणें अनर्थांचा अनुभव घेतात." इत्यादिप्रकारें मुंडकोपनिषदांत कर्मठांची निंदा केली आहे. व शेवटीं "ते आपल्या कर्मांचें फल भोगून स्वर्गां-तून भ्रष्ट होतात व या किंवा याच्याहूनही हीन योनींत जन्म घेतात." असें स्पष्ट सांगितलें आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतही "यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्ति मनीषिणः" इत्यादि श्लोकांत कर्मठांच्या कर्मासक्तीचें वर्णन करून त्यामुळेंच ते आत्मज्ञानास कसे अयोग्य असतात हें सांगितलें आहे. सारांश, कर्मानुष्ठानाचें व्यसनही आत्मज्ञानास विघ्न करितें. यास्तव, तें त्याज्य होय.

शास्त्रवासना दर्पास कारण होत असते. त्यामुळेंही ती मलिन होय. यावि-षयीं उपनिषदांतील कांहीं उदाहरणें सांगतों. छान्दोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत–उद्दालकानें आपल्या पुत्रास वेदाध्ययनावांचून आमच्या कुलांतील पुरुषांचा जन्म व्यर्थ आहे असें टोंचून म्हटलें असतां बारा वर्षांचा श्वेतकेतु गुरुगृहीं गेला व बारा वर्षांत वेदाध्ययन संपवून परत आला. पण त्यास आपल्या विद्येचा मोठा गर्व झाला होता. त्यामुळें आपल्या पित्यापुढेंही अनम्रता व्यक्त करण्यास त्यानें कमी केलें नाहीं,–असें म्हटलें आहे. कौषीतकी व बृहदारण्यक उपनिषदांमध्यें बालाकीच्या गर्वाचेंही असेंच वर्णन केलें आहे.

बालाकीस कांहीं उपासनांचें ज्ञान झालें होतें. पण तेवढ्यानेंच त्यास मोठा गर्व झाला व उशीनरादि अनेक देशांतील ब्राह्मणांस जिंकून व त्यांचा अपमान करून तो अजातशत्रु नामक काशीराजाकडे आला. तो राजा ब्रह्मवेत्त्यांचा शिरोमणि होता. परंतु तें कांहीं मनांत न आणतां बालाकीनें त्यास उपदेश करण्याचें धाष्टर्य केलें. पुढें त्याच्या अज्ञानाचें माप त्याच्या पदरांत घालून राजानेंच त्यास उपदेश केला. तात्पर्य, अशा या शास्त्रवासनेचा सर्वथा त्याग करणेंच उचित आहे.

आतां देहवासनेचें वर्णन करितों. देहच आत्मा आहे असें समजणें, त्याच्याठायीं गुणाधान करणें व त्याच्याठिकाणीं असलेल्या दोषांचें अपनयन करणें या त्रिविध भ्रांतीमुळें ही तिसरी मलिन वासना तीन प्रकारची होते. त्यांतील पहिल्या प्रकारच्या देहवासनेचा उल्लेख भाष्यकारांनीं शारीरिक भाष्यांत "केवल चैतन्यविशिष्ट देहच आत्मा, असें प्राकृत पुरुष व चार्वाकाचे अनुयायी ( लोकायतिक ) समजले आहेत," अशा अर्थाच्या वाक्यानें केला आहे. तैत्तिरीयांच्या उपनिषदांत अन्नमयकोशाचें वर्णन करितांना याच प्राकृत पुरुषांच्या समजुतीचें स्पष्टीकरण केलेलें आहे. छांदोग्य उपनिषदाच्या आठव्या अध्यायांत "प्रजापतीनें इंद्राबरोबर राक्षसराज विरोचनासही आत्म्याचा उपदेश केला, पण स्वतःच्याच चित्तदोषामुळें 'देह हाच आत्मा आहे' असा सिद्धांत ठरवून त्यानें इतर राक्षसांसही तसाच उपदेश केला;" असें सांगितलें आहे. त्यावरून देहाचे ठायीं आत्मत्वाचा आरोप कसा, कां व कोण करितात तें समजेल.

आतां, गुणाधान व दोषापनयन या देहवासनेंतील गुणाधानाचें वर्णन अगोदर करितों. देहाचे ठायीं नसलेले गुण उपायानें देहांत आणणें यास गुणाधान म्हणतात. तें लौकिक व शास्त्रीय असें दोन प्रकारचें असतें. चांगला शब्द, स्पर्श इत्यादिकांचा लाभ व्हावा म्हणून यत्न करणें, हें लौकिक गुणाधान होय, त्याचप्रमाणें कोमल ध्वनीनें गातां किंवा अध्ययन करितां यावें म्हणून तेल पिणें, मिऱ्यें खाणें इत्यादि उपाय लोक योजितात; आपल्या अंगाचा स्पर्श मृदु व्हावा म्हणून पुष्टिकर औषध व आहार यांचा उपयोग करितात; अंगास तेल, उटणें इत्यादि लावितात; अंगास सुगंध यावा म्हणून अत्तरें, उट्या लावितात आणि माळा घालितात; हें प्रसिद्ध आहे. देहाचे ठायीं शास्त्रीय गुणांचें आधान करण्याकरितां गंगास्नान, शालिग्रामपूजा,

तीर्थाटन इत्यादि करितात. देहाचे ठायीं असलेल्या दोषांस घालविणें यास दोषापनयन म्हणतात. तेंही लौकिक व शास्त्रीय असें दोन प्रकारचें आहे. वैद्यशास्त्रांत सांगितलेल्या औषधोपचारांनीं व मुखप्रक्षालनादिकांच्या योगानें देहगत दोष घालविणें हें लौकिक, व शौच, आचमन इत्यादि शास्त्रोक्त उपायांनीं त्यांस घालविणें हें शास्त्रीय दोषापनयन होय. परंतु ह्या तिन्हीं भ्रांत्या आहेत, आणि त्यामुळेंच ही देहवासना मलिन आहे, असें आम्हीं आतां सिद्ध करून दाखवितों. देहच आत्मा आहे असें समजण्यास कांहीं प्रमाण नाहीं. शिवाय तसें भ्रमानें समजणें, हेंच पुरुषाच्या सर्व दुःखांचें कारण आहे. यास्तव ही वासना मलिन आहे. पूर्वी होऊन गेलेल्या आचार्यांनीं याविषयीं पुष्कळ लिहिलें आहे, यास्तव आम्हीं येथें अधिक विस्तार करीत नाहीं. देहाचे ठायीं गुणांचें आधान करितां येतें हें म्हणणेंच आह्मांस खरें वाटत नाहीं. कारण पुष्कळ गायक व अध्यापक अशा प्रकारचे प्रयत्न करीत असतात; पण त्यांचा ध्वनि चांगला होत नाहीं. देहाची पुष्टि व मृदुस्पर्श यांचाही कांहीं कार्यकारणभाव दिसत नाहीं, लावण्य व सौगंध्य हीं तर उघड उघड वस्त्रालंकारादि व अत्तरादि देहभिन्न पदार्थांचे ठायीं असतात. म्हणूनच विष्णुपुराणांत " मांस, रक्त, पू , विष्ठा, मूत्र, शिरा, मज्जा, हाडें, इत्यादि अशुद्ध पदार्थांचा समुदाय जो देह त्याच्या ठायीं प्रीति ठेवणारा मूढ नरकावरही प्रेम ठेवील यांत संशय नाहीं. आपल्या शरीरांतील अशुद्ध गधानें ज्यास देहाविषयीं वैराग्य होत नाहीं त्यास वैराग्याकरितां आणखी दुसऱ्या कोणत्या अमंगल पदार्थाचा उपदेश करितां येणार ? " असें म्हटलें आहे. आतां गंगास्नानादि शास्त्रीय अनुष्ठानाच्या योगानें प्राप्त होणारें जें शास्त्रीय गुणाधान, त्यांचें दुसरें प्रबल शास्त्र निरसन करीत असतें. कोणत्याही प्राण्याची हिंसा करूं नये, असें एक शास्त्र आहे, व अग्निष्टोम-संबंधीं पशूचें हनन करावें, असें दुसरें शास्त्र आहे; पण त्यांतील पहिलें सामान्य शास्त्र असून दुसरें विशेष शास्त्र असल्यामुळें पहिल्यापेक्षां दुसरें अपवादात्मक शास्त्र प्रबल आहे, असें मीमांसक ठरवितात. व प्रबल शास्त्रानें दुर्बल शास्त्राचा बाध करितात. त्याचप्रमाणें वरील शास्त्रीय गुणाधानांचा बाध दुसऱ्या शास्त्रीय वचनानें कसा होतो तें पहा—कफ, वात व पित्त या तीन दोषांनीं व रस, रक्त, मांस इत्यादि सप्त धातु यांच्या योगानें बनलेल्या या यवासारिख्या देहास जो आत्मा समजतो; स्त्री, पुत्र इत्यादिकांचे

ठायीं जो आत्मबुद्धि ठेवतो; दगड, माती, इत्यादिकांच्या मूर्तीस जो पूज्य समजतो आणि पाण्याचे ठायीं जो तीर्थाची भावना करितो, अर्थात् ज्ञानी पुरुषाचे ठायीं कधींही तीर्थबुद्धि ठेवीत नाहीं तोच बैल किंवा गाढव आहे. देह अत्यंत मलिन आहे व देही अत्यंत निर्मल आहे. या उभयतांचें अंतर जाणलें असतां शौच कोणाचें करणार ?—इत्यादि अर्थाचीं युक्तियुक्त व प्रबल शास्त्रीय वचनें पाहिलीं म्हणजे वरील शास्त्रीय गुणाधानाची बुद्धि शिथिल होते. या वचनांत दोषापनयनाचा निषेध केला आहे, गुणाधानाचा निषेध केलेला नाहीं हें खरें, पण अनेक प्रबल विरुद्ध दोषांनीं युक्त असलेल्या शरीराचे ठायीं गुणाचें आधान करितां येणें शक्य नाहीं, असा तीं वाक्यें ऐकणाऱ्याच्या मनांत निश्चय होत असल्यामुळें गुणाधानाचा निषेध सहज होतो. शरीर अत्यंत मलिन आहे, हें मैत्रायणी शाखेच्या उपनिषदांत स्पष्टपणें सांगितलें आहे. तें असें:—भगवन् अस्थि, चर्म, स्नायु, मज्जा, मांस, शुक्र, शोणित, कफ, अश्रु, व नेत्रांतील पू यांच्यायोगानें दूषित झालेल्या, विष्ठा, मूत्र, वात, पित्त यांनीं भरलेल्या, आणि दुर्गंधयुक्त अशा या निःसार शरीरांत विषयोपभोगांनीं काय होणार ?—असल्या शरीरांतील भोग व्यर्थ आहेत, असा याचा भावार्थ. हें शरीर स्त्रीपुरुषांच्या मैथुनापासून उत्पन्न झालें. त्याच्यामध्यें ज्ञानाचा लेशही नाहीं. नरकाप्रमाणें मूत्रद्वारांतून बाहेर पडलें. हाडांच्यायोगानें हें उभारिलें आहे. मांसानें त्यास लिंपिलें आहे. वरून चामड्यानें मढविलें आहे. विष्ठा, मूत्र, कफ, पित्त, मज्जा, मेद, व वसा यांनीं आणि अनेक रोगबीजांनीं हें भरलेलें आहे. यांतील रोगांची शांति औषधोपचारांनीं नियमानें होतेच असें नाहीं. औषधाच्या योगानें एकादे वेळीं शांत झालेला रोग पुनः उद्भवतो. शरीरांतील नऊ प्रसिद्ध छिद्रें तर मलाचा त्याग करीत असतातच. पण असंख्य रोमरंध्रांतूनही मल वहात असतो. त्यालाच आपण घाम म्हणतों. तर असल्या या मलानें भरलेल्या व ज्यांतून मलांचा स्राव अहर्निश चाललेला आहे त्या शरीरास जलानें धुवून निर्मल करण्यास कोण समर्थ होणार आहे ? पूर्वींच्या आचार्यांनींही,

**नवच्छिद्रकृता देहाः स्रवन्ति घटिका इव ॥**
**बाह्यशौचैर्न शुद्ध्यन्ति नान्तःशौचं तु विद्यते ॥ १ ॥**

असें म्हटलें आहे, व नऊ छिद्रांनीं युक्त असलेले हे देह छिद्रयुक्त

मडक्यांप्रमाणें मलस्राव करीत असतात. त्यामुळें ते स्नानादि बाह्य शौचानें शुद्ध होत नाहींत. अंतःशौच तर मुळीं नाहींच. कारण, त्यांत शिरून किंवा हात घालून त्यास आंतून धुतां येत नाहीं—असा त्या वचनाचा भावार्थ आहे. यास्तव देहवासना मलिन आहे. या देहाच्या मालिन्यास उद्देशूनच श्रीवसिष्ठांनीं रामास असें म्हटलें आहे.—" पायांपासून मस्तकापर्यंत मला आईबापांनीं निर्माण केलें आहे, " हा निश्चय बंधनास कारण होतो. कारण तो ( निश्चय ) खोटा असतो, रामा, देहच मी आहें असें समजणें हा कालसूत्र नरकाचा मार्ग आहे. महावीचि नरकाचा पाश आहे व असिपत्र-वनांतील शिडी आहे, यास्तव सर्वस्व नाश होण्याचा प्रसंग आला तरी " मी देह आहें " ही भावना मनांत धरूं नये. दीर्घ प्रयत्न करून तिचा त्याग करावा, कुत्र्याचें मांस हातांत घेतलेल्या चांडाळणीप्रमाणें ती भावना अस्पृश्य आहे असें समजावें, इत्यादि.

असो; या तीन वासना अविवेक्यास ग्राह्य वाटत असल्या तरी विविदिषु व विद्वान् या दोन्ही प्रकारच्या विवेक्यांनीं त्यांस हेय समजावें. कारण त्या विविदिषूच्या ज्ञानोत्पत्तीस प्रतिबंध करितात व विद्वानाचें ज्ञान दृढ होऊं देत नाहींत. म्हणूनच लोक-शास्त्र व देहवासनांमुळें मनुष्यास यथार्थ आत्मज्ञान होत नाहीं, असें स्मृतींत म्हटलें आहे. असो; दंभदर्पादि आसुर संपद्रूप मानसवासनाही मलिन आहे, हें निराळें सांगावयास नको. कारण ती नरकास कारण होते हें भगवद्गीतेंत स्पष्टपणें सांगितलें आहे. यास्तव भगीरथ प्रयत्न करून या चारी वासनांचा क्षय करावा.

वासनाक्षयाप्रमाणें मनोनाशही संपादन करणें अति अवश्य आहे. आम्ही वैदिक ब्राह्मण तार्किकांप्रमाणें मन हें नित्य द्रव्य आहे व त्याचें परिमाण अणु ( अतिसूक्ष्म ) आहे, असें मानीत नाहीं. त्यामुळें आम्हांस मनोनाश दुर्घट वाटत नाहीं. आम्ही मन हें एक सावयव, अनित्य, लाख, सुवर्ण इत्यादिकांप्रमाणें अनेक प्रकारच्या परिणामास योग्य असणारें द्रव्य आहे, असें मानतों. " काम, संकल्प, संशय, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधैर्य, लज्जा, बुद्धि, भीति इत्यादि सर्व मनच आहे. " अशा अर्थाचें बृहदारण्यकोपनिषद्वाक्य आहे. हें वाक्य मनाचें लक्षण सांगतें. क्रमानें उत्पन्न होणाऱ्या कामादि वृत्ती, नेत्रांच्या द्वारां स्पष्ट दिसणाऱ्या घटादिकांप्रमाणें साक्षीस स्पष्ट भासतात. त्या वृत्तींचें उपादान कारण मन आहे, असें त्याचें

लक्षण समजावें. त्याचें उपनिषदांत " माझें मन दुसरीकडे गेलें होतें. त्यामुळें मला दिसलें नाहीं; माझें मन दुसऱ्याच विचारांत गुंतलें होतें, त्यामुळें मी ऐकिलें नाहीं. " व "मनानेंच हा पहातो; मनानेंच ऐकतो;" अशा अर्थाचीं वाक्यें आहेत. तीं मनाच्या अस्तित्वाविषयीं प्रमाणें होत. डोळ्यांपुढें भर उजेडांत असलेली वस्तु व कानावर येऊन आदळणारा स्पष्ट व मोठा वेदाध्ययनाचा शब्द ज्याचें अवधान नसल्यास अनुभवास येत नाहीं व ज्याचें अवधान ( सांनिध्य ) असल्यासच त्याचें ज्ञान होतें, तें अन्वयव्यतिरेकसिद्ध सर्व विषयज्ञानाचें साधारण कारण मन होय, असा वरील वाक्यांचा भावार्थ समजावा. " तस्मादपि पृष्ठत उपस्पृष्टो मनसा विजानातीत्येतदुदाहरणम् " असें त्याच उपनिषदांत पुढें म्हटलें आहे. त्याचा भावार्थ असा:—ज्याअर्थी मन लक्षण व प्रमाण यांच्यायोगानें सिद्ध झालें आहे, त्याअर्थी त्याचें असें उदाहरण द्यावें. एखाद्या पुरुषास दुसऱ्या कोणीं मागून स्पर्श केला असतां, हा हाताचा स्पर्श आहे, कीं बोटाचा आहे, कीं पायांचा आहे, कीं डोक्याचा आहे, हें तेथें नेत्र पोंचत नसूनही, तो जाणतो; त्वगिंद्रियांच्यायोगानें त्यास त्या स्पर्शाचें विशेष ज्ञान होतें, म्हणून म्हणावें, तर मृदुत्वादि गुणांचेंच केवल ज्ञान त्याच्याद्वारा होणें शक्य आहे. यास्तव, हा कोणत्या विशेष अवयवाचा स्पर्श आहे, हें जाणण्यास याप्रसंगीं मनावांचून दुसरें कांहीं रहात नाहीं. असो; याप्रमाणें सर्व विषयज्ञानाचें साधारण कारण, या स्वरूपानें सिद्ध झालेलें द्रव्य मननक्रियेमुळें मन व चिंतनक्रियेमुळें चित्त होतें. म्हणजे मन व चित्त या शब्दांनीं त्याचा उल्लेख करितात. तें चित्त सत्व, रज व तमोगुणरूप आहे. कारण प्रकाश, प्रवृत्ति व मोह या तीन सत्त्वादि कार्यांचा त्यांत अनुभव येतो. ह्मणजे चित्तामध्यें हीं तिन्हीं गुणकार्यें आहेत, हें अनुभवावरून सिद्ध होतें. प्रकाश, प्रवृत्ति व मोह हीं तिन्हीं क्रमानें सत्त्व, रज, व तम यांचीं कार्यें आहेत, हें श्रीगीतेच्या चवदाव्या अध्ययांत व सांख्यशास्त्रांतही सांगितलें आहे. येथें प्रकाश या शब्दाचा अर्थ सूर्य, चंद्र, अग्नि इत्यादिकांचा प्रकाश असा समजूं नये. तर प्रकाश ह्मणजे ज्ञान असें समजावें. कारण " सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होतें; रजोगुणापासून लोभ उत्पन्न होतो आणि तमोगुणापासून प्रमाद, मोह व अज्ञान हीं उद्भवतात " असें ह्मटलें आहे. ज्ञान व लोभ यांप्रमाणेंच सत्त्व व रज या गुणांचीं क्रमानें सुख व कर्म हीं दुसरीं कार्यें आहेत. कारण " सत्त्व सुखांत आसक्त करितें

व रज कर्मामध्यें आसक्त करितें " असेंही ह्मटलें आहे. समुद्राच्या तरंगांप्रमाणें निरंतर परिणाम पावणाऱ्या गुणांपैकीं एकादा गुण वाढला असतां दुसरे दोन गुण त्याच्यापेक्षां निर्बल होतात. " रज व तम यांचा पराभव करून सत्त्व गुण वाढतो; सत्त्व व रज यांस तुच्छ करून तमोगुण बलाढ्य होतो आणि सत्त्व व तम यांस निर्बल करून रजोगुण प्रबल होतो " असें भगवानांनीं व " समुद्रांतील तरंगांप्रमाणें हे तिन्ही गुण परस्पर बाध्यबाधक होतात, " असें वसिष्ठांनीं, याविषयीं म्हटलें आहे. त्यांतील तमोगुण वाढला असतां असुरसंपत्ति उद्भवते, रजोगुणाचें प्राबल्य झालें असतां लोकादि तीन वासना उद्भवतात व सत्त्वगुणाची वृद्धि झाली असतां दैवी संपत्ति प्राप्त होते. असो; पण हें अंतःकरण त्रिगुणात्मक आहे, असें जरी भासलें तरी त्याचें मुख्य उपादान कारण सत्त्वच आहे. रज व तम हे दोन गुण त्याचे उपष्टंभक आहेत. [ उपादानाच्या सहकारि ( साह्य करणाऱ्या ) अवयवांस उपष्टंभक म्हणतात. ] म्हणूनच योगाभ्यासानें रज व तम यांचा क्षय झाला असतां सत्त्व हेंच ज्ञानी पुरुषाचें स्वरूप अवशिष्ट रहातें, आणि हाच अभिप्राय मनामध्यें धरून—

ज्ञस्य चित्तमचित्तं स्याज्ज्ञचित्तं सत्त्वमुच्यते ।

असें एका ज्ञानी आचार्यांनीं म्हटलें आहे.—ज्ञानी पुरुषाचें चित्त अचित्त होतें; त्यामुळें त्याच्या चित्तास सत्त्व म्हणतात,—असा याचा भावार्थ आहे. असो; तें सत्त्व एकाग्र असतें. कारण चित्तांत चांचल्य आणणारा रजोगुण त्यांत नसतो. त्यामुळें तें विक्षिप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें त्यांत तमोगुण नसल्यामुळे तें सूक्ष्म होतें. तमोगुण चित्तास भ्रांतीनें कल्पिलेल्या अनात्मरूप स्थूल पदार्थांच्या आकाराचें बनवितो. त्यामुळें त्याचा नाश झाल्यावर चित्तानें स्थूल पदार्थाकार न होतां सूक्ष्मच रहाणें अगदीं योग्य आहे. याप्रमाणें रजोरहित व तमोरहित झाल्यामुळें क्रमानें एकाग्र व सूक्ष्म झालेलें चित्त आत्मसाक्षात्कारास योग्य होतें. म्हणूनच " सूक्ष्मदर्शी साधक सूक्ष्म व एकाग्र मनानें त्या तत्त्वास पहातात " असें श्रुतींत म्हटलें आहे. वारा लागून फडफडणाऱ्या दिव्यापुढें रत्नें, मोत्यें यांची परीक्षा होणें शक्य नाहीं. अथवा सुईप्रमाणें मोठ्या कुदळीनें वस्त्र शिवतां येत नाहीं. असो; अशाप्रकारचें हें सत्त्वच तमोगुण व रजोगुण यांच्या सहायानें नानाप्रकारच्या द्वैताचा संकल्प करूं लागलें असतां चित्त होतें व तेंच तमोगुणाचें आधिक्य झालें असतां आसुरी

संपत्तीस वाढवीत पुष्ट होतें. श्रीवसिष्ठांनीं याविषयीं असें म्हटलें आहेः— " अनात्मवस्तूचें ठायीं आत्मभावना केल्यानें, देहच मी आहें असें समजल्यानें व पुत्र, स्त्री इत्यादि कुटुंबांतील माणसांवर आसक्ति ठेविल्यानें चित्त पुष्ट होतें. अहंकार—विकारानें व ममतारूपी मलाच्या लीलेनें प्राणी, हें माझें, अशी भावना करूं लागला कीं त्याचें चित्त स्थूल होतें. शारीरिक व मानसिक पीडा, संसारांतील समाधान व ग्राह्य आणि त्याज्य हे विभाग, यांच्यायोगानें, आणि त्याचप्रमाणें स्नेह, धनलाभ, रत्नें व स्त्रिया यांचा लाभ, विचार करी पर्यंतच रमणीय वाटणारे पदार्थ, दुष्ट, आशा, भोग व प्रपंच सत्य आहे असें मानणें यांच्यायोगानें चित्त पुष्ट होतें. "

असो; येथवर ज्यांचा विनाश करावयाचा आहे त्या वासनांचें व मनाचें स्वरूप सविस्तर सांगितलें. आतां वासनाक्षय व मनोनाश यांचे क्रमानें निरूपण करावयाचें आहे. पण त्यांतूनही अगोदर वासनाक्षयाचा प्रकार वसिष्ठाच्या वचनांनींच स्पष्टपणें सांगतोंः—

बन्धो हि वासनाबन्धो मोक्षः स्याद्वासनाक्षयः ॥
वासनास्त्वं परित्यज्य मोक्षार्थित्वमपि त्यज ॥ १ ॥
मानसीर्वासनाः पूर्वं त्यक्त्वा विषयवासनाः ॥
मैत्र्यादिभावनानाम्नीर्गृहाणामलवासनाः ॥ २ ॥
ता अप्यन्तः परित्यज्य ताभिर्व्यवहरन्नपि ॥
अन्तःशान्ततमस्नेहो भव चिन्मात्रवासनः ॥ ३ ॥
ता अप्यन्तः परित्यज्य मनोबुद्धिसमन्विताम् ॥
शेषे स्थिरसमाधानो येन त्यजसि तं त्यज ॥ ४ ॥

यांचा शब्दार्थ असाः——रामा, वासना ठेवणें हाच बंध व वासनांचा क्षय करणें हाच मोक्ष होय. यास्तव तू इतर सर्व वासनांचा त्याग करून मोक्षाची कामनाही सोड. १ प्रथम मानसी वासना व विषयवासना सोडून मैत्र्यादि-भावना नामक शुद्ध वासना धर. २ पुढें त्यांनाही चित्तांत थारा न देतां बाहेरून मात्र त्या शुद्ध वासनांप्रमाणें व्यवहार करीत राहून मनांत अत्यंत स्नेहशून्य व केवल चैतन्याच्या वासनेनें युक्त होऊन रहावें. ३ शेवटीं मन, बुद्धि, यांसह चैतन्यवासनेसही चित्तांत राहूं न देतां समाधान स्थिर करून

ज्यां अहंकाराच्यां योगानें या सर्वांचा त्याग करतां येतो त्या अहंकारासही सोडावें. ४ या श्लोकांतील मानसवासना या शब्दानें वर सांगितलेल्या लोक-शास्त्र–देहवासना घ्याव्या. व विषयवासना या शब्दानें दंभदर्प इत्यादि आसुर संपत्ति घ्यावी. त्यांतील पहिल्या मृदु वासना व शेवटची तीव्र वासना आहे. व त्या दोन्ही प्रकारच्या वासना त्याज्य आहेत; हें सांगण्याकरितां येथें त्यांचा पृथक् निर्देश केला आहे. अथवा शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे विषय. ते इच्छेच्या दशेंत असतांना होणारा जो संस्कार ती मानसवासना व भोग–दशेंत असतांना होणारा जो संस्कार ती विषयवासना असें समजावें. पण या पक्षीं वर सांगितलेल्या वासनांचा या द्विविध वासनांत अंतर्भाव होतो, असें समजावें. कारण या मानस व विषय वासनेपलीकडे ( ह्मणजेच अंतर्बाह्य वासनेवांचून ) अणखी वासना रहातच नाहीं. पण वासनापरित्याग कसा करितां येणार? कारण त्यांस कांहीं आकार नसतो. त्यांना आकार जर असता तर केरसुनीनें गोळा केलेल्या केराप्रमाणें त्यांचा त्याग करितां आला असता, असें कोणी केवल परित्याग या शब्दाच्या अर्थाकडे पाहून ह्मणेल. पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण उपवास, जागरण, इत्यादिकांप्रमाणें वासनात्याग करितां येतो. म्हणजे स्वभावत: ( अर्थात् कोणाच्या उपदेशावांचून व प्रयत्नावांचून) प्राप्त होणाऱ्या भोजन व निद्रा या क्रिया जरी आकाररहित असल्या तरी यांच्या परित्यागरूप उपवास व जागरण हीं सर्वांस करितां येतात. त्याप्रमाणें या वासनांचाही परित्याग करितां येतो, "अद्य स्थित्वा निराहार:" ( म्हणजे आज निराहार राहून ) इत्यादि मंत्रानें उपासाचा संकल्प करून सावधान मनानें आहारावाचून रहाणें हा भोजनपरित्यागांतील परित्याग-शब्दाचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें "संन्यस्तं मया ( ह्मणजे मी सर्वस्वाचा त्याग केला )" या प्रैषमंत्रानेंच संकल्प करून सावधानपणें तसें राहतां येणें शक्य आहे. ज्यांना वैदिक मंत्राचा अधिकार नसतो त्यांनीं हा वासनात्यागाचा संकल्प प्राकृत भाषेनें केला तरी चालतें. अथवा उपवासामध्यें भाजी, वरण इत्यादि पदार्थांचें सांनिध्य सोडणें, हा परित्याग समजल्यास वासना-त्यागांतही माळा, चंदन, स्त्री इत्यादिकांचें सांनिध्य सोडणें हा परित्याग असें जाणावें. किंवा उपवासादिकांमध्यें भोजनाची इच्छा ( भूक ), निद्रा, आळस इत्यादिकांचा विसर पाडणाऱ्या–पुराणश्रवण, देवपूजा, नृत्य, गायन, वाद्यें इत्यादि–उपायांच्या योगानें चित्ताचे रंजन करितात, त्याप्रमाणें या वास-

नात्यागांत मैत्री, करुणा इत्यादिकांच्या योगानें चित्तरंजन करावें. मैत्री इत्यादिकांचें वर्णन पतंजलींनीं–

" मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्तप्रसादनम् " पाद १. सू ३३.

या योगसूत्रांत केलें आहे. सूत्रार्थ असाः–सुखी, दुःखी, पुण्यवान् व पापी प्राण्यांचे ठायीं क्रमानें मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा करावी. अर्थात् जे सुखी असतील त्यांस पाहून " हे सुखी आहेत, हें फार चांगलें आहे " असें ह्मणून त्यांविषयींचें मित्रत्व व्यक्त करावें; मत्सर करूं नये. जे दुःखी असतील त्यांचें दुःख पाहून " अरेरे यांच्या या दुःखाची निवृत्ति कशी बरें होईल ?" असें ह्मणून त्यांच्यावर कृपा करावी. तटस्थ होऊन राहूं नये. पुण्यवान् पुरुषांस पाहून " वाः, तुम्ही पुण्य करितां हें फार चांगलें आहे. असेंच पुण्य करा. आह्मांस त्यामुळें मोठा आनंद होतो " असें ह्मणून आनंदित व्हावें; त्याच्याशीं द्वेष करूं नये, व जे पापी असतील त्यांच्याविषयीं उदासीन रहावें. ह्मणजे त्यांच्या त्या पापाचरणाविषयीं आपलें अनुमोदनही देऊं नये व त्यांचा द्वेषही करूं नये. अशारीतीनें मैत्र्यादिभावना केल्यानें चित्त प्रसन्न होतें, व त्यामुळें समाधीचा आविर्भाव सहज होतो. राग व द्वेष हेच मुख्यतः चित्तास विक्षिप्त करीत असतात. यास्तव त्यांचा समूल उच्छेद केल्यावर तें प्रसन्न होण्यास फार उशीर लागत नाहीं, व प्रसन्न चित्त तात्काल एकाग्र होतें. राग व द्वेष यांचीं लक्षणें भगवान् पतंजलींनीं अशीं सांगितलीं आहेत.

सुखानुशयी रागः । दुःखानुशयी द्वेषः । पाद. २ सू. ८, ९.

या सूत्रांचा अर्थ असाः—ज्याला सुखाचा अनुभव आला आहे, त्याला त्याचें अगोदर स्मरण होऊन नंतर तसल्या सुखाविषयीं किंवा त्या सुखाच्या द्रव्यादि साधनांविषयीं इच्छा होणें हा राग होय, व ज्याला दुःखाचा अनुभव आला आहे त्यास अगोदर त्याचें स्मरण होऊन नंतर तसल्या दुःखाविषयीं किंवा त्याच्या सर्पादि साधनांविषयीं क्रोध येणें हा द्वेष होय. असो; मला सर्व सुख व्हावें अशा प्रकारची एक वृत्ति प्रायः सर्व प्राण्यांच्या चित्तांत अनुभव घेतलेल्या सुखावरील स्नेहामुळें उद्भवते. पण प्रत्येकाजवळ सर्व सुखाची सामग्री नसल्यामुळें सर्व दृष्ट व अदृष्ट सुख त्यास संपादन करितां येत नाहीं. त्यामुळें वर सांगितलेला राग चित्तास कलुषित करितो.

परंतु साधक पुरुष जेव्हां सुखी प्राण्याच्या ठायीं हे सर्व सुखी प्राणी माझेच आहेत, अशी मैत्रीची भावना करूं लागतो, तेव्हां तें त्यांचें सुख आपलेंच आहे अशी भावना करणाऱ्या त्याचा सुखाविषयीं राग निवृत्त होतो. म्हणजे आपणां स्वतःला राज्य नसलें तरी पुत्राचें राज्य माझेंच आहे, असें समजून पिता जसा समाधान करून घेतो, त्यांतलाच हा एक प्रकार आहे. पावसाळा निघून गेल्यावर दिवाळीकडे नद्यांचें पाणी जसें निर्मल होतें, त्याप्रमाणें राग निघून गेल्यावर चित्त प्रसन्न होतें. दुःख झालें असतां त्याच्याविषयींही असलें दुःख पुनः होऊं नये अशी एक वृत्ति उद्भवते पण शत्रु, व्याघ्र इत्यादि त्याचीं साधनें असतांना त्याचें निवारण करितां येणें शक्य नाहीं. तसेंच त्या सर्व दुःखसाधनांचा नाशही करितां येत नाहीं, त्यामुळें वर सांगितलेला वृत्तिरूप द्वेष हृदयास सदा जाळीत रहातो. पण साधक उदार चित्तानें जेव्हां आपल्याप्रमाणें दुसऱ्याही सर्वांस हें प्रतिकूल दुःख न व्हावें अशी दुःखी प्राण्याविषयीं करुणेची भावना करितो; तेव्हां शत्रु, व्याघ्र इत्यादि दुःखसाधनांच्या ठिकाणचा द्वेष निवृत्त होऊन चित्त प्रसन्न होतें. म्हणूनच एका स्मृतीमध्यें—

प्राणा यथात्मनोऽभीष्टा भूतानामपि ते तथा ।
आत्मौपम्येन भूतानां दयां कुर्वन्ति साधवः ॥ १ ॥

असें म्हटलें आहे. याचा भावार्थ—आपले प्राण जसे आपणास अत्यंत प्रिय असतात तसेच ते इतर प्राण्यांसही प्रिय असतात. यास्तव साधु पुरुष आपल्या उपमेनें सर्व प्राण्यांवर दया करितात. १ त्या दयेचा प्रकारही माहात्म्यांनीं सांगितला आहे, तो असा:——

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ १ ॥

या जगातील सर्व प्राणी सुखी असोत; निरोगी असोत; सर्व आपापलें कल्याण पाहोत; व कोणीही दुःखाचा अनुभव न घेवो १. पण या जगांत प्रायः असें आढळतें कीं, प्राणी स्वभावतःच पुण्याचरण करीत नाहींत. तर त्याची स्वाभाविक प्रवृत्ति पापाकडे असते, म्हणूनच—

पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति मानवाः ।
न पापफलमिच्छन्ति पापं कुर्वन्ति यत्नतः ॥ १ ॥

असें ह्मटलें आहे. ह्मणजे–मानव पुण्याच्या फलाची इच्छा करितात पण पुण्याचरण करण्याची इच्छा करीत नाहींत. आणि ते पापाच्या फलाची मुळींच इच्छा करीत नाहींत. पण पापाचरण मात्र मोठ्या प्रयत्नानें करीत असतात. असो; परंतु अशा रीतीनें न केलेलें पुण्य व केलेलें पाप हीं दोन्हीं अंतीं प्राण्याच्या पश्चात्तापास कारण होतात. त्या पश्चात्तापाचें वर्णन, तैत्तिरीय श्रुतीनें "मी पुण्य कां केलें नाहीं, व पाप कां केलें ? ही चिंता प्राण्यास अंतकाळीं जाळूं लागते" असें ह्मणून केलें आहे. पण जेव्हां हा पुरुष पुण्यवानाच्या ठायीं वर सांगितलेल्या मुदितेची भावना करूं लागतो तेव्हां प्रयत्नावांचूनच त्याची प्रवृत्ति पुण्यामध्यें होऊं लागते, आणि पापी पुरुषाविषयीं उपेक्षा करूं लागला असतां तो स्वतःही पापापासून निवृत्त होतो; त्यामुळें त्यास पश्चात्ताप होण्याचें कारणच रहात नाहीं व पश्चात्तापाच्या अभावीं चित्त प्रसन्न होतें. सुखी पुरुषांच्या ठायीं मैत्रीची भावना करणाऱ्या साधकाच्या रागाचीच केवळ निवृत्ति होते असें नाहीं, तर त्याच्या ठिकाणचे असूया, ईर्ष्या, इत्यादि इतर दोषही निवृत्त होतात. दुसऱ्याच्या गुणांमध्यें दोषदृष्टि ठेवणें ही असूया व दुसऱ्याचे गुण सहन न होणें ही ईर्ष्या होय. पण इतरांचें जें सुख तेंच माझें, अशी भावना दृढ झाल्यावर असूयादि होणें शक्य नसतें. याच न्यायानें मैत्रीची भावना करणाऱ्या पुरुषांच्या ठायीं इतर दोषांचाही अभाव असतो, असें जाणावें. त्याचप्रमाणें दुःखी प्राण्यांच्या ठायीं करुणेची भावना करणाऱ्या पुरुषापासून शत्रुवधादि पापें करविणारा द्वेष जसा निवृत्त होतो, तसाच "मी सुखी आहें" इत्यादि प्रकारचा दर्पही त्याच्या ठायीं राहूं शकत नाहीं. "ईश्वरोहमहं भोगी" इत्यादि आसुरसंपत्तीच्या वर्णनांतील श्लोकांचें व्याख्यान करून आम्ही त्याचा वर (पृष्ठ ५७) निर्देश केलाच आहे. पुण्यवानांच्या ठायीं मुदितेची भावना करणाऱ्या साधकाची प्रवृत्ति साहजिकपणें पुण्यामध्येंच होते, असें आम्ही येथें ह्मटलें आहे. पण–ती पुण्यप्रवृत्ति वासनाक्षय करणाऱ्या योग्याच्या उपयोगी नाहीं. कारण पूर्वीं तुम्ही मलिन शास्त्रवासनेंत पुण्याचा अंतर्भाव केला आहे,–असें कोणी ह्मणेल; यास्तव त्यांचें उत्तर दिलें पाहिजे. आम्ही पुनर्जन्मास कारण होणाऱ्या काम्य इष्टापूर्तादिकांसच वर मलिन वासनत

ओढिलें आहे. व येथें योगाभ्यासामुळें उत्पन्न झालेलें व अशुक्लकृष्ण असल्यामुळें पुनर्जन्मास कारण न होणारें पुण्यकर्म विवक्षित आहे. या अशुक्लकृष्ण पुण्यकर्माचें वर्णन योगसूत्रांत पतंजलींनीः—

" कर्माशुक्लकृष्णं योगिनस्त्रिविधमितरेषां " पा. ४ सू. ७.

असें केलें आहे. याचा शब्दार्थ असाः—योग्याचें कर्म अशुक्लकृष्ण असतें व इतरांचें शुक्ल, कृष्ण आणि मिश्र असें त्रिविध असतें. काम्य कर्म शास्त्रविहित असल्यामुळें शुक्ल होय. शास्त्रनिषिद्ध कर्मास कृष्ण म्हणावें, आणि मिश्र कर्मास शुक्लकृष्ण म्हणतात. हें त्रिविध कर्म जे योगी नसतात त्यांच्या हातून घडतें, व त्यामुळें त्यांस तीन प्रकारचे जन्म प्राप्त होतात, याविषयीं विश्वरूपाचार्यांनी-

शुभैराप्नोति देवत्वं निषिद्धैर्नारकीं गतिम् ॥
उभाभ्यां पुण्यपापाभ्यां मानुष्यं लभते नरः ॥ १ ॥

असें म्हटलें आहे. म्हणजे शुभ कर्माच्या योगानें मानव देवत्वास प्राप्त होतो; निषिद्ध कर्माच्या योगानें नरकांतील योनींत जातो; आणि पुण्य व पाप या दोन्हीं कर्माच्या योगानें तो कर्मपरवश होत्साता मानवच होतो. १

यावर कोणी म्हणतील कीं योगी सुद्धां शुक्ल कर्म करितात, कारण स्वतः योगाभ्यासच शास्त्रविहित असल्यामुळें शुक्ल कर्म होय. याचें समाधान असेंः— काम्य कर्मास येथें शुक्ल कर्म म्हटलें आहे, हें ध्यानांत धरिलें म्हणजे हा प्रश्न उद्भवणार नाहीं. तात्पर्य, शुक्ल ( शास्त्रीय काम्य ) व कृष्ण ( शास्त्रनिषिद्ध ) कर्मामध्यें योग्यानें प्रवृत्ति करूं नये, असें ठरलें. पण यावरही कोणी म्हणेल कीं, या न्यायानें कांहीं अयोगीही पुण्यवानाचे ठायीं मुदिता—भावना करून पुण्याचरणांतच प्रवृत्त होतील ! तर ते पुण्यचरणांत प्रवृत्त होईनात. त्यांत आमची काय हानि आहे ? मैत्र्यादि भावनांच्या योगानें जे चित्तास प्रसन्न करितात ते योगीच होत. पण येथें मैत्र्यादि चार साधनांबरोबर अभय, सत्त्वसंशुद्धि इत्यादि दैवीसंपत्ति; अमानित्व, अदंभित्व इत्यादि ज्ञानाचीं साधनें आणि पहिल्या प्रकरणांत सांगितलेले जीवन्मुक्त, स्थितप्रज्ञ इत्यादिकांचे धर्म यांचेंही ग्रहण करावें. ह्मणजे या सर्व मैत्र्यादि साधनांचा अभ्यास करणारा योगीच होय. केवल प्राणायाम करण्यांत गुंतलेला योगी आहे, असें आम्ही समजत नाहीं. आतां—शुभ वासना अनंत आहेत. एका पुरुषास त्या सर्वांचें अनुष्ठान करितां येणें शक्य नाहीं. यास्तव त्यांच्या अभ्यासाविषयीं प्रयास करणें निरर्थक

आहे, असें कोणास वाटेल; पण तें बरोबर नाहीं. कारण अनंत शुभ वासनांच्या अनुष्ठानानें निवृत्त होणाऱ्या अनंत अशुभ वासना एकाच पुरुषाचे ठायीं एकाच कालीं संभवत नाहींत. आयुर्वेदांत सांगितलेलीं सर्वच औषधें एका पुरुषास घेतां येत नाहींत, व सर्व औषधांनीं निवृत्त होणारे सर्व रोगही एका पुरुषाचे ठायीं संभवत नाहींत. यास्तव औषध देण्यापूर्वीं रोगाचें जसें निदान करावें लागतें, त्याप्रमाणें प्रथम आपल्या चित्ताचें परीक्षण करून त्यांत ज्यावेळीं जेवढी मलिन वासना असेल, त्यावेळीं तिच्याच विरोधी शुद्ध वासनेचा अभ्यास करावा. पुत्र, मित्र, स्त्री यांच्याकडून ज्यास पीडा होते तो त्यांच्याविषयीं विरक्त होऊन त्या पीडेस निवृत्त करणारा संन्यास–आश्रम घेतो, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें विद्यामद, धनमद, कुलाचाराचा मद इत्यादि मलिन वासनांच्या योगानें पीडलेल्या पुरुषानें त्याच्या विरोधी विवेकाचा अभ्यास करावा. विवेकाची दिशा जनकानें दाखविली आहे, ती अशी——

" आज जे मोठ्या लोकांच्या शिरोभागीं बसलेले असतात तेच कांहीं दिवसांनीं खालीं येतात, म्हणजेच एकाकालीं जे मान्य असतात तेच पुढें तुच्छ होतात, तेव्हां मोठेपणावर विश्वास कसा ठेवावा ? आजपर्यंत अनेक राजांनीं संपादन केलेली लक्ष्मी कोठें आहे ? ब्रह्मदेवानें निर्मिलेलीं कोट्यवधि विश्वें कोठें गेलीं ? सारांश जगांतील एकाही वस्तूवर विश्वास नाहीं. कोट्यनुकोटी ब्रह्मदेव गेले; अनेक सृष्टिपरंपरा लीन झाल्या व धुळीच्या कणांप्रमाणें राजे उडून गेले. मग मीं माझ्या जीवितावर तरी विश्वास कसा ठेवूं ? जगाचे उदय व प्रलय हे ज्यांच्या नेत्रांची उघडझांपच होती म्हणजे ज्यांनीं आपले नेत्र उघडले असतां जगाची उत्पत्ति व ते मिटले असतां प्रलय होत असें, असले पुरुषही नाहींसे झाले. मग त्यांच्यापुढें माझी काय गणना ? " इत्यादि.

आतां-नित्यानित्यवस्तुविवेकादि साधनांवांचून ब्रह्मज्ञान होणें शक्य नसल्यामुळें हा वर सांगितलेला विवेक तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीपूर्वींच झालेला असतो. पण येथें तर तुम्हीं, ज्यास ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे, अशा पुरुषास जीवन्मुक्ति मिळावी म्हणून वासनाक्षयादि साधनें सांगण्यास आरंभ केला आहे. तेव्हां याप्रसंगीं विवेकाचें वर्णन करणें अयोग्य नव्हे का ?–असें कोणी विचारील, यास्तव त्याचें समाधान केलें पाहिजे. प्रथम विवेकादि चार साधनांनीं संपन्न असलेल्या पुरुषास मागाहून ब्रह्मसाक्षात्कार होणें हा सर्व पुरुषांस लागू होणारा सामान्य मार्ग झाला. पण जनकासारिख्या विशेष पुरुषास हाच

नियम लागू करणें अयोग्य आहे. कारण त्या माहात्म्यास मोठ्या पुण्याच्य परिपाकामुळें केवल सिद्ध गीता ऐकल्यानेंच अकस्मात् तत्त्वज्ञान झालें, व त्यानतर त्यानें चित्तविश्रांतीकरितां हा वरील विवेक केला. तस्मात् त्याला अप्रासंगिक ह्मणतां येत नाहीं. कारण जनकाप्रमाणें एकाद्या अतिपुण्यवान् आधुनिकांसही पूर्व पुण्यसंचयामुळें विवेकादिकांच्या अभ्यासावांचूनच अकस्मात् ब्रह्मसाक्षात्कार होणें शक्य आहे. पण असें असलें तरी–हा विवेक ज्ञानाच्या अगदीं मागोमाग होणारा असल्यामुळें ज्यास ज्ञान झालें आहे त्याच्या चित्तांत मलिन वासनेस थारा मिळणें शक्य नाहीं. यास्तव ज्ञानानंतर शुद्ध वासनेचा अभ्यास करण्याची कांहीं गरज नाहीं.–असें कोणी समजेल; पण तें बरोबर नाहीं. कारण जनकाच्या चित्तांत मलिन वासना जरी उद्भवल्या नाहींत तरी याज्ञवल्क्य, भगीरथ इत्यादि ज्ञान्यांच्या चित्तांत त्या वासनांची अनुवृत्ति होत होती; असा उल्लेख आढळतो. याज्ञवल्क्य, व त्याचे प्रतिपक्षी उषस्त, कहोल इत्यादिकांमध्यें फार विद्यामद होता, असें उपनिषदांवरूनही सिद्ध होतें. कारण ते सर्व वादविवाद करूं लागले व त्यांचा फार मोठा वाद झाला, असें बृहदारण्यकांत ह्मटलें आहे. वादप्रसंगीं त्यांचीं जीं प्रश्नोत्तरें झालीं आहेत, त्यांवरून ब्रह्माविषयींच त्यांचा वाद झाला हें निर्विवाद ठरतें. तेव्हां ते ब्रह्मवेत्ते नव्हते, केवल वेदवेत्ते होते, असें ह्मणूनही समाधान करून घेतां येत नाहीं. त्यांस ब्रह्माचें यथार्थ ज्ञान नव्हतें ह्मणून ह्मणावें, तर त्यांच्या वाक्यावरून आह्मांस होणारें ज्ञानही अयथार्थ होणार. बरें तें यथार्थ असलें तरी परोक्ष ज्ञान होतें, असें ह्मणावें तर " जें साक्षात् अपरोक्ष ब्रह्म " असा उल्लेख करून मुख्य अपरोक्ष ब्रह्माविषयीं प्रश्नोत्तरें झालीं आहेत. तेव्हां त्यांच्या ज्ञानाला परोक्ष ज्ञान कसें ह्मणतां येईल ? पण–आत्मज्ञान्याच्या ठायीं विद्यामद असावा, हें आचार्यांस मान्य नाहीं. कारण उपदेशसहस्रींत त्यांनीं तसें स्पष्ट ह्मटलें आहे. श्रीसुरेश्वराचार्यांनीं नैष्कर्म्यसिद्धींत सुद्धां—

न चाध्यात्माभिमानोऽपि विदुषोऽस्त्यासुरत्वतः ॥
विदुषोऽप्यासुरश्चेत्स्यान्निष्फलं ब्रह्मदर्शनम् ॥ १ ॥

ब्रह्मज्ञास " मी आत्मज्ञानी आहें " असा अभिमानही होत नाहीं. कारण तो आसुरभाव आहे. आणि विद्वानालाही जर आसुरभाव झाला तर ब्रह्मदर्शन निष्फळ आहे, असेंच ह्मणावें लागणार १, असें ह्मटलें आहे.

—असें कोणी ह्मणेल; पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण जीवन्मुक्तीपर्यंत तात्वज्ञान ज्यास झालें आहे, त्याच्याविषयीं तें आचार्यांचें ह्मणणें आहे. जीवन्मुक्तांच्या ठायीं विद्यामद असावा हें आह्मांसही मान्य नाहीं. आतां यावर कोणी ह्मणेल कीं, वादविवादादि करून दुसऱ्यास जो जिंकण्याची इच्छा करितो, त्यास आत्म्याचा साक्षात्कारच झालेला नसतो. कारण——

रागो लिङ्गमबोधस्य चित्तव्यायामभूमिषु ॥
कुतः शाद्वलता तस्य यस्याग्निः कोटरे तरोः ॥ १ ॥

म्हणजे चित्ताच्या प्रचाराच्या भूमिमध्यें ह्मणजे विषयांविषयीं आसक्ति असणें हेंच अबोधाचें चिन्ह आहे. ज्या वृक्षाच्या ढोलींत अग्नि असतो त्याच्यावर हिरवेपणा कोठून असणार ? असें श्रीसुरेश्वराचार्यांनीं ह्मटलें आहे. तर या आक्षेपावर आह्मी असें ह्मणतों कीं——

रागादयः सन्तु कामं न तद्भावोऽपराध्यति ॥
उत्खातदंष्ट्रोरगवदविद्या किं करिष्यति ॥ १ ॥

असें त्याच आचार्यांचें सांगणें आहे. ह्या पद्याचा अर्थ असाः—रागद्वेषादि भाव ज्ञानी पुरुषाचे ठायीं खुशाल असोत. त्यांचें अस्तित्व त्यास कांहीं बाध करूं शकत नाहीं. कारण दांत उपटलेल्या सर्पाप्रमाणें निबल झालेली अविद्या काय करणार ? तर मग या दोन वचनांत परस्पर विरोध आहे, असें ह्मणाल, तर तेंही युक्त नव्हे. कारण वरील पहिलें वचन स्थित प्रज्ञ-विषयीं आहे व दुसरें केवल ज्ञान्याविषयीं आहे, अशी त्यांची व्यवस्था लाविता येते. पण—केवल ज्ञानी पुरुषाचे ठायीं रागद्वेषादि दोष असले तरी चालतील, असें ह्मटल्यास धर्म, अधर्म इत्यादिकांच्याद्वारां त्यास दुसरा जन्म घेण्याचाही प्रसंग येईल, असें ह्मणाल तर तेंही प्रशस्त नव्हे. कारण दग्ध न झालेल्या बीजापासूनच अंकुर येतो; हें प्रसिद्ध आहे. त्याच-प्रमाणें अविद्या असतांनाच उद्भवणारे जे रागादि दोष तेच मुख्य रागादि असल्यामुळें तेच पुनर्जन्मास कारण होतात. आत्मज्ञानानें अविद्येचा नाश झाल्यावर दग्ध बीजाप्रमाणें केवल आकारानें भासणारे रागादि पुनर्जन्मास कारण होत नाहींत. म्हणूनच—

उत्पद्यमाना रागाद्या विवेकज्ञानवह्निना ।
तदा तदैव दह्यन्ते कुतस्तेषां प्ररोहणम् ॥ १ ॥

उत्पन्न होणारे रागादिक द्वेष विवेकज्ञानाग्नीनें तेव्हांच्या तेव्हांच जळून जात असतात, तेव्हां त्यास अंकुर कसा येणार ? असो; स्थितप्रज्ञ पुरुषांच्या ठायींही रागादि दोष असतात, असें त्याच्याकडे पहाणारास वाटण्याचा संभव आहे. पण त्याच्या दृष्टीनें ते आभासरूप असल्यामुळें त्यास बाध करूं शकत नाहींत. ते आभास आहेत, सत्य नव्हेत, असें समजणें हेंच जीवन्मुक्ताचें लक्षण होय. पण जनकाच्या यज्ञमंडपांतील वादाच्या प्रसंगीं याज्ञवल्क्यांची स्थितप्रज्ञ-अवस्था नव्हती; म्हणूनच चित्ताच्या विश्रांतीकरितां त्यांनीं पुढें विद्वत्संन्यास केला. जनकाच्या यज्ञप्रसंगीं त्यास केवल जयाचीच इच्छा होती, असें नाहीं; तर मोठ्या धनाचीही इच्छा होती; म्हणूनच त्यांनीं पुष्कळ ब्रह्मवेत्त्यांसमोर उभ्या केलेल्या सालंकृत सहस्र गायींस आपल्या आश्रमीं घेऊन जाण्याविषयीं आपल्या शिष्यास आज्ञा करून इतर ब्रह्मज्ञांनीं " कायहो याज्ञवल्क्य, तुम्हींच एकटे ब्रह्मज्ञ आहां कीं काय ? " असें रागानें विचारलें असतां " ब्रह्मनिष्ठांस नमस्कार असो; आम्ही केवल गायींची इच्छा करणारे आहों " असें स्वतः आपल्या तोंडानें सांगितलें. आतां इतर ब्रम्हज्ञांचा अवमान करण्याकरितां त्यांनीं असें युक्तीचें भाषण केलें म्हणून म्हणावें, तर मनांत एक अभिप्राय धरून बाह्यतः निराळेंच दाखविणें हा त्यांच्यावर दोष येतो. असलें अनृजुत्व सज्जनांचे ठायीं शोभत नाहीं. तसेंच तेथें जमलेले दुसरे ब्रह्मवेत्ते—यानें आपलें धन नेलें—असें पाहून कोपाविष्ट झाले; क्रोधयुक्त झालेल्या याज्ञवल्क्यांनींही शाकल्यास शाप देऊन मारिलें; इत्यादि सर्व गोष्टींचा विचार केला असतां केवल ब्रह्मज्ञांच्या ठायीं काम, क्रोध इत्यादि असतात असेंच म्हणावें लागतें. पण ते अविद्यारहित असल्यामुळें उत्तर जन्मास कारण होत नाहींत. हाच पामरांच्या व त्यांच्या रागादिकांतील विशेष आहे. याज्ञवल्क्यांनीं ब्राह्मणास मारिलें, तेव्हां त्या ब्रह्मघ्नास मोक्ष कसा मिळेल ? अशी शंका घेणें बरोबर नाहीं. कारण " मातृवध, पितृवध, सुवर्णाची चोरी, भ्रूणहत्या इत्यादि कोणत्याही कर्मानें ज्ञानी पुरुषाच्या मोक्षास बाध येत नाहीं " असें कौषीतकी-उपनिषदांत सांगितलें आहे. शेषानेंही आपल्या आर्यापंचाशितिमध्यें—

हयमेधसहस्राण्यथ कुरुते ब्रह्मघातलक्षाणि ।
परमार्थविन्न पुण्यैर्न च पापैःस्पृश्यते विमलः ॥ १ ॥

असें म्हटलें आहे. या आर्येचा सारांश असा:-परमार्थवेत्ता अतिशय शुद्ध

( निर्लेप ) असतो. त्यामुळें त्यानें जरी सहस्र अश्वमेध केले तरी त्यास पुण्य लागत नाहीं, व त्यानें जरी सहस्र ब्रह्महत्या केल्या तरी पाप लागत नाहीं. तात्पर्य उगीच अधिक विस्तार करण्यांत काय अर्थ आहे? याज्ञवल्क्यादि ब्रह्म-वेत्त्यांच्या चित्तांत मलिन वासनेची अनुवृत्ति होत होती, यांत कांहीं संशय नाहीं. भगीरथाचीही अशीच अवस्था झाली, असें श्रीवसिष्ठांनीं सांगितलें आहे. म्हणजे त्या प्रयत्नशील राजास तत्त्वाचा साक्षात्कार झाला होता. पण राज्याचें परिपालन करीत असल्यामुळें त्याच्या चित्तास मलिन वासना व्याकुळ करीत असत. तेव्हां आपल्या चित्तास विश्रांति मिळत नाहीं असें पाहून त्यानें सर्वांचा त्याग केला, आणि त्यामुळें त्याच्या चित्तास विश्रांति मिळाली. यास्तव साधकानें आपल्यामध्यें जी मलिन वासना असेल तिला दुसऱ्याच्या दोषाप्रमाणें ओळखून तिच्या प्रतीकाराचा अभ्यास करावा. कारण याच अभिप्रायानें हें वाक्य प्रवृत्त झालें आहे.—

> यथा सुनिपुणः सम्यक्परदोषेक्षणे रतः ।
> तथा चेन्निपुणः स्वेषु को न मुच्येत बन्धनात् ॥ १ ॥

म्हणजे—जसा एकादा मनुष्य दुसऱ्याचे दोष पाहण्यांत अति निपुण असतो व त्या कृत्यांत अगदीं गढून जातो, त्याप्रमाणेंच जर तो आपले दोष पहाण्यांत निपुण झाला तर बंधांतून कोण मुक्त होणार नाहीं?

असो; आतां अगोदर विद्यामदास प्रतिकार कसा होईल त्याचा विचार करूं या. विद्यामद दोन प्रकारचा असतो. एक दुसऱ्याविषयीं आपल्या ठायीं असणारा व दुसरा आपणाविषयीं दुसऱ्याचे ठायीं असणारा. आपल्या प्रकारचा मद आपल्या ठायीं असल्यास साधकानें आपल्या या मदाचा भंग अवश्य केव्हां तरी होईल असें निरंतर मनांत वागवावें. कारण अशा प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. त्यांतील कांहीं येथें देतों. उद्दालकाचा पुत्र श्वेतकेतु विद्येच्या योगानें मत्त झाला होता. तो एकदां प्रवाहण राजाच्या सभेंत गेला. तेव्हां त्या राजानें त्यास पंचाग्निविद्येविषयीं प्रश्न केला. पण त्याला ती विद्या अवगत नव्हती. त्यामुळें तो निरुत्तर झाला. तेव्हां राजानें त्याची पुष्कळ निर्भर्त्सना केली असतां तो खिन्न मनानें आपल्या पित्याकडे आला व त्यानें आपलें दुःख त्यास कळविलें. त्याचा पिता निर्मद होता. म्हणजे मी सर्व कांहीं जाणतों, असा अभिमान त्यास नव्हता. त्यामुळें तो त्याच राजाजवळ जाऊन

ती विद्या शिकला. असाच दृप्तबालाकि ह्मणून आणखीं एक गर्विष्ठ ब्राह्मण होता. अजातशत्रु नामक राजानें त्याची पुष्कळ निर्भर्त्सना केली, तेव्हां त्याचाही दर्प शांत झाला. उषस्त, कहोल इत्यादिकही विद्यामदामुळेंच याज्ञवल्क्याशीं वाद करण्यास सज्ज झाले, पण त्यांचाच शेवटीं पराभव झाला. असो; आतां जेव्हां आपल्याविषयीं दुसऱ्याचे ठायीं असलेला मद प्रवृत्त होईल, तेव्हां–तो मत्त मनुष्य माझी पाहिजे तर निंदा करूं दे, कीं माझा अपमान करूं दे. त्यानें कांहीं केलें तरी माझी त्यांत हानि नाहीं.– असा विचार करावा, एवढ्याकरितांच एके ठिकाणीं—

आत्मानं यदि निन्दन्ति स्वात्मानं स्वयमेव हि ॥
शरीरं यदि निन्दन्ति सहायास्ते जना मम ॥ १ ॥
निन्दापमानावत्यन्तं भूषणं यस्य योगिनः ॥
धीविक्षेपः कथं तस्य वाचाटैः क्रियतामिह ॥ २ ॥

असें ह्मटलें आहे, यांचा भावार्थः–माझे निंदक जर माझ्या आत्म्याची निंदा करीत असले तर माझा व त्यांचा आत्मा एकच असल्यामुळें ते स्वतः आपलीच निंदा करितात असें होतें, त्यामुळें त्यांत माझें कांहीं जात नाहीं. बरें माझ्या शरीराची निंदा करीत असले तर ते बिचारे मला सहायच करितात असें मी समजतों. कारण स्वभावतःच निंद्य शरीराची निंदा मलाही इष्टच आहे. १ ज्या योगी पुरुषास दुसऱ्यांनीं केलेली आपली निंदा व अपमान हीं अत्यंत भूषणावह वाटतात, त्याच्या चित्तांत वाचाळ लोक विक्षेप कसा उत्पन्न करणार? २ श्रीसुरेश्वराचार्यांनीं नैष्कर्म्यसिद्धींतही—

वर्चस्के संपरित्यक्ते दोषतश्चावधारिते ॥
यदि दोषं वदेत्तस्मै किं तत्रोत्चरितुर्भवेत् ॥ १ ॥
तद्वत्सूक्ष्मे तथा स्थूले देहे त्यक्ते विवेकतः ॥
यदि दोषं वदेत्ताभ्यां किं तत्र विदुषो भवेत् ॥ २ ॥

असें ह्मटलें आहे, या दोन्ही श्लोकांचा अर्थः—विष्ठेचा त्याग केल्यावर व तो दोषयुक्त आहे, असें निश्चयानें जाणल्यावर जर तिच्या दोषाचें कोणीं वर्णन केलें तर त्यांत विष्ठात्याग करणारास काय वाटणार आहे? कांहीं नाहीं. त्याचप्रमाणें सूक्ष्म किंवा स्थूल शरीराचा विवेकपूर्वक त्याग केला

असतां ह्मणजे त्यांच्यावरील अभिमान सोडला असतां जर कोणी त्यांस दोष दिला तर त्यांत या विद्वानाची कोणती हानि होणार आहे ? २. कारण,—

शोकहर्षभयक्रोधलोभमोहस्पृहादयः ॥
अहङ्कारस्य दृश्यन्ते जन्ममृत्युश्च नात्मनः ॥ १ ॥

शोक, हर्ष, भय, क्रोध, लोभ, मोह, स्पृहा, जन्म, व मृत्यु हीं सर्व अहंकारास होतात; आत्म्यास यांतील एकही विकार होत नाहीं, असा त्याचा निश्चय असतो. १. विद्वानास निंदा हें भूषणच वाटत असतें, असें ज्ञानांकुशांत वर्णन केलें आहे; तें असें–

मन्निन्दया यदि जनः परितोषमेति
नन्वप्रयत्नजनितोऽयमनुग्रहो मे ।
श्रेयोर्थिनो हि पुरुषाः परितुष्टिहेतो-
र्दुःखार्जितान्यपि धनानि परित्यजन्ति ॥ १ ॥

अर्थः–माझ्या निंदेनें जर एकादा पुरुष संतुष्ट होत असला तर प्रयत्नावांचून त्याच्यावर माझा हा अनुग्रह झाला, असें म्हटलें पाहिजे. कारण या संतोषाकरितांच कल्याणेच्छु पुरुष मोठ्या कष्टानें संपादन केलेलें द्रव्यही खर्च करीत असतात. १ तसेंच—

सततसुलभदैन्ये निःसुखे जीवलोके
यदि मम परिवादात्प्रीतिमाप्नोति कश्चित् ।
परिवदतु यथेष्टं मत्समक्षं तिरो वा
जगति हि बहुदुःखे दुर्लभः प्रीतियोगः ॥ २ ॥

अर्थः–ज्यामध्यें दैन्य अति सुलभ आहे व सुख मुळींच नाहीं, अशा या जीवलोकामध्यें जर माझ्या निंदेनें कोणास आनंद होत असेल तर तो बिचारा माझ्या समक्ष किंवा माझ्या मागें माझी निंदा खुशाल करो. कारण अनेक दुःखांनीं भरलेल्या या जगांत प्रीतीचा योग फार दुर्लभ आहे २

अपमान हेंही ज्ञान्याचें भूषणच आहे, असें स्मृतींत सांगितलें आहे.–

तथा चरेत वै योगी सतां धर्ममदूषयन् ।
जना यथावमन्येरन्गच्छयुर्नैव संगतिम् ॥ १ ॥

सज्जनांच्या धर्मास दूषित न करितां योग्यानें, लोक आपला सदा अवमान करतील व संगतीस लागणार नाहींत, असाच व्यवहार करावा. १ असो; येथवर आपल्या ठिकाणच्या व दुसऱ्याच्या ठिकाणच्या विद्यामदाचा प्रतीकार कसा करावा तें सांगितलें. आतां धनाभिलाष व क्रोध यांचा प्रतीकार कसा करावा तें सांगतात. विवेक हेंच या सर्वांच्या प्रतीकाराचें साधन आहे. द्रव्याचें अर्जन करितांना किती क्लेश होतात; त्याचें रक्षण करितांना किती कष्ट सोसावे लागतात; त्यास चोरादिकांनीं हरण केलें असतां कसें असह्य दुःख होतें व व्यय करितांनाही कसें जीवावर येतें, या गोष्टींचा विचार करून धनाभिलाष सोडावा. क्रोधही दोनप्रकारचा आहे. एक दुसऱ्याविषयीं आपल्या ठिकाणीं असलेला व दुसरा आपल्या विषयीं दुसऱ्याचे ठायीं असलेला. त्यांतील आपल्या ठायीं असलेल्या कोपाविषयीं असें म्हटलें आहे—

अपकारिणि कोपश्चेत्कोपे कोपः कथं न ते ।
धर्मार्थकाममोक्षाणां प्रसह्य परिपन्थिनि ॥ १ ॥

अरे मानवा, दुःख देणारा जो असेल त्याच्यावरच जर तुला कोप करावयाचा असेल तर धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांस बलात्कारानें विघ्न करणाऱ्या कोपावर तूं कोप कां करीत नाहींस ? १. तसेंच आणखीं एका ठिकाणीं " धर्म, अर्थ व यश यांचा नाश करणारा, आपल्याच शरीरास संतप्त करणारा, आणि यालोकीं व परलोकींही हितकर न होणारा कोप संतांच्या मनाचा आश्रय कसा करील ?—" असें म्हटलें आहे. असो; तर याप्रमाणें विवेक करून धनाभिलाष व कोप यांचा प्रतीकार करावा. स्त्री व पुत्र यांच्याविषयीं असलेला अभिलाषही विवेकानेंच हटवितां येतो. स्त्रीविषयीं विवेक कसा करावा तें श्रीवसिष्ठांनीं योगवासिष्ठांत सांगितलें आहे. त्याचा सारांश असा:—

"स्नायु, अस्थि व ग्रंथी यांनीं सजविलेल्या या स्त्रीसंज्ञक मांसाच्या पुतळींत चांगलें तें काय आहे ? त्वचा, मांस, रक्त व मूत्रादि जल यांस निराळें करून त्यानंतर स्त्रीशरीरांत रम्य काय आहे तें पहा. व्यर्थ कां मोहित होतोस ? अहो, स्त्रियांच्या ज्या अवयवांची कवी मोठी स्तुति करितात व लोकही ज्यांच्यावर मोहित होतात त्याच स्तनादिकांस हिंस्रप्राणी सामान्य मांसपिंडाप्रमाणें लेखितात. केंस व काजळ यांस धारण करणाऱ्या; दुःस्पर्श व नेत्रांस

प्रिय वाटणाऱ्या या स्त्रिया दुष्कृत्यरूपी अग्निज्वालेनें युक्त असतात. त्यामुळें त्या पुरुषास गवताच्या काडीप्रमाणें जाळून टाकितात. अग्नि स्पर्श करणारासच जाळतो. पण या दुरूनही जाळूं शकतात. त्या जरी सरस आहेत तरी विवेक्यास अगदीं नीरस वाटतात. स्त्रियः हें नरकाग्नीचें सुंदर पण भयंकर जळण आहे. यास्तव स्त्रीविषयींची आसक्ति कमी करावी. ज्याला स्त्री असते त्याला भोगेच्छा होते. पण स्त्रीच नसल्यावर भोगेच्छा तरी कोठून होणार? एका स्त्रीचा त्याग केला असतां जगाचा त्याग होतो. यास्तव क्रमानें जगाचा त्याग करून सुखी व्हावें. " इत्यादि.

पुत्राविषयीं विवेक कसा करावा तें पंचदशीच्या ब्रह्मानंदांत सांगितलें आहे. " पुत्र न झाला तरी तो स्त्रीपुरुषांस दुःख देतो; गर्भाशयांत आला तर गर्भपाताच्या योगानें किंवा प्रसूती वेदनांनीं आईबापांस क्लेश देतो; जन्मास आलाच तर आंकडी, रोग इत्यादिकांच्या द्वारा त्यांस रडवितो; मोठा होऊन तो मूर्ख होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं कीं, त्याच्या आई-बापाचें चित्त चिंतेनें होरपळून जातें. उपनयनानंतर अध्ययन करीत नाहीं, असें पाहून आईबापांस नको जीवसें होतें. बरें विद्वान् झाला तरी त्यास कोणी मुलगी देत नाहीं म्हणून त्यांची ओरड चालते. तरुणपणीं तो परस्त्रीसमागम करितो म्हणून त्यांस वाईट वाटतें; पुढें कुटुंबवत्सल होऊन तो दरिद्रि असला तरी त्यांस अवघड वाटतें व सुदैवानें धन, धान्य, विद्या इत्यादिकांनीं तो संपन्न झाला तर लवकर मरतो म्हणून तीं हाय हाय करितात. " साराश कांहीं झालें तरी दुःख. असा विचार करून सर्व मलिन वासनांचा प्रतीकार करावा. विवेक हेंच त्यांस हटविण्याचें उत्तम साधन आहे. कारण त्यावांचून मलिनवासनांतील दोषांचें ज्ञान होत नाहीं. व दोषज्ञानावाचून त्यांस सोड-ण्याचें धैर्य होत नाहीं. याप्रमाणें मलिनवासनांचा त्याग केला असतां जीवन्मुक्तिरूप परम पद प्राप्त होतें. याविषयीं श्रीवसिष्ठांनीं रामास उद्देशून असें म्हटलें आहे. " रामा, वासनात्यागाकरितां जर तूं दीर्घ प्रयत्न केलास तर त्या वासना शिथिल होतील; व सर्व शारीरिक आणि मानसिक व्यथा तात्काल क्षीण होतील; दीर्घ प्रयत्नानें व बलात्कारानें जर तूं वासनांचा त्याग करून चित्ताची स्थिर स्थिति संपादन केलीस तर तें सुखरूप पद तुला प्राप्त होईल. " या वसिष्ठांच्या उपदेशांतील दीर्घ प्रयत्न म्हणजे वर सांगितलेला विषयदोषविवेचक

होय. परंतु ता वारंवार करीत असलें तरी प्रबल इंद्रियांचा व्यापार त्यास तुच्छ करीत असतो. एवढ्याकरितांच " हे कुंतिपुत्रा, प्रयत्न करणाऱ्या विद्वान् पुरुषाच्याही मनाला, व्याकुल करून सोडणारीं इंद्रियें बलात्कारानें हरण करितात. कारण, इंद्रियें विषयांकडे जाऊं लागलीं असतां जें मन त्यांच्या मागून जाऊं लागतें तें पुरुषाच्या विवेकशक्तीस हरण करितें. म्हणजे वायु जसा पाण्यांतील नौकेस अमार्गानें नेऊन खडकावर हापटून फोडून टाकितो, त्याप्रमाणें इंद्रियें मनाची दुर्दशा करितात. " असें श्रीकृष्णानीं अर्जुनास सांगितलें आहे. यास्तव उत्पन्न झालेल्या विवेकाच्या रक्षणार्थ इंद्रियांचा निरोध करावा. भगवानांनीं अर्जुनास " तानि सर्वाणि संयम्य " इत्यादि दोन श्लोकांतही असेंच सांगितलें आहे. दुसऱ्या स्मृतींतही—

न पाणिपादचपलो न नेत्रचपलो यतिः ।
न च वाक्चपलश्चैवमिति शिष्टस्य लक्षणम् ॥ १ ॥

असें म्हटलें आहे. या वचनाचा—यतीनें हातापायांचें चापल्य, नेत्रांचें चापल्य व वाणीचें चापल्य सोडावें. कारण अचापल्य हें शिष्टांचें लक्षण आहे—असा भावार्थ आहे. हीच यतीची रीति दुसऱ्या एका ठिकाणीं अधिक स्पष्ट केली आहे, ती अशी—यतीनें अजिह्व, षण्ढ, पंगु, अंध, बधिर, व मुग्ध होऊन रहावें. कारण, भिक्षु या सहा गुणांच्या योगानें मुक्त होतो. जो भोजन करीत असतांनाहीं हें मला आवडतें किंवा हें आवडत नाहीं, असें म्हणून भोज्यामध्यें आसक्त होत नाहीं व हितकर, सत्य व मित भाषण करितो त्यास अजिह्व, असें म्हणतात. आज उत्पन्न झालेल्या लहान मुलीस, त्याचप्रमाणें सोळावर्षांच्या तरुणीस आणि शंभरवर्षांच्या म्हातारीस पाहून जो एकसारिखाच निर्विकार असतो, तो षंढ होय. जो भिक्षेकरितां व मूत्रपुरीषोत्सर्गाकरितां मात्र चालतो आणि कांहीं झालें तरी योजनापेक्षां अधिक चालत नाहीं, तो पंगु होय. बसलेला असतांना किंवा चालतांना ज्याची दृष्टि पुढील चार हातांच्या पलीकडे जात नाहीं तो संन्यासी अंधच होय. हित, मित, मनोहर व शोक घालविणारें वचन ऐकूनही जो न ऐकल्याप्रमाणें असतो तो यति बधिर होय. विषय समीप असतांना व त्यांचें सेवन करण्याचें सामर्थ्य असतांना ज्याचीं इंद्रियें व्याकुल होत नाहींत व तीं निजलेल्या पुरुषाच्या इंद्रियांप्रमाणें निर्विकार असतात त्या भिक्षूस मुग्ध म्हणतात. कोणाची निंदा करूं नये

व स्तुतिही करूं नये. मर्मभेदक वाणी उच्चारूं नये, अतिवादी होऊं नये, सर्वत्र समभाव ठेवावा, कोणत्याही स्त्रीशीं संभाषण करूं नये, पूर्वी पाहिलेल्या स्त्रीचें स्मरण करूं नये, स्त्रियांच्या गोष्टी वर्ज कराव्यात, व त्यांचीं चित्रेंही पाहूं नयेत, इत्यादि. सारांश, ज्याप्रमाणें एकादा व्रती नक्त, एकभुक्त, उपवास, मौन इत्यादि व्रतांचा संकल्प करून सावधान चित्तानें त्यांचा भ्रंश न होऊं देतां तीं उत्तमप्रकारें पाळितो—त्याप्रमाणें यतीनेंही अजिह्वत्वादि व्रतांमध्यें स्थित होऊन सावधानपणें विवेकाचें पालन करावें. कारण, अशा रीतीनें दीर्घकाल, निरंतर व सत्कारपूर्वक सेवन केलेल्या—विवेक व इंद्रियनिग्रह—यांच्या योगानें मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा या पूर्वोक्त भावना स्थिर झाल्या असतां आसुरसंपत्तिरूप मलिनवासना निवृत्त होतात. त्यानंतर श्वासोच्छ्वासाप्रमाणें किंवा डोळ्यांच्या उघड झांपीप्रमाणें पुरुषाच्या प्रयत्नावांचूनच प्रवृत्त होणाऱ्या मैत्र्यादि वासनांच्या योगानें तो जरी व्यवहार करीत असला तरी व्यवहारांतील गुणागुणांकडे लक्ष्य न देतां; मनांत त्याचें चिंतन न करितां व निद्रा, तंद्रा, मनोराज्य इत्यादि सर्व चेष्टा प्रयत्नानें शांत करून केवल चिन्मात्रवासनेचा अभ्यास करावा. हें जग तर स्वतः चित् व जड या दोन्ही रूपाचें भासतें. शब्द—स्पर्शादि जड वस्तूंस प्रकाशित करण्या-करितांच जरी इंद्रियें उत्पन्न केलेलीं असलीं, तरी चैतन्य सर्वांचें उपादान असल्यामुळें त्यास वर्ज करितां येत नाहीं. वास्तव चैतन्यपूर्वकच जड भासत असतें. "अगोदर चैतन्याचा भास होतो व त्याच्या मागून इतर सर्वांचा भास होतो." असें श्रुतींतही म्हटलें आहे. तस्मात् मागून भासणाऱ्या वस्तूचें प्रथम भासणारें चैतन्यच खरें स्वरूप आहे, असा निश्चय करून जडाची उपेक्षा करून केवल चैतन्याची चित्तांत भावना करावी. योगवासिष्ठांतील बलीचा प्रश्न व शुक्राचें उत्तर यावरून हीच गोष्ट स्पष्टपणें समजते. "या जगांत काय आहे ? जग कशाचें बनलें आहे; व तें स्वतः काय आहे ? मी कोण आहें ? तूं कोण आहेस ? व हे लोक कोण आहेत ? तें मला सांग" असा बलीनें प्रश्न केला असतां शुक्र म्हणाला—"या जगांत चैतन्य आहे. तें चैतन्याचेंच बनलें आहे. तें स्वतः चैतन्यमय आहे. तूं चैतन्य, मी चैतन्य व हे सर्व लोकही चैतन्यच आहेत."

जसा एकादा सोनार सोन्याचें कडें विकत घेतांना त्याचा घाट, त्याच्या-वरील नक्षी इत्यादिकांकडे लक्ष्य न देतां त्याचें वजन व कस यांच्याकडेच

सर्व लक्ष्य देतो, त्याप्रमाणें ब्रह्मचिंतकानें जगाचें नाम व रूप यांच्याकडे लक्ष्य न देतां केवल चैतन्याकडे तें लावावें. जडाचें भान सर्वथैव नाहींसें होऊन मनाची प्रवृत्ति केवल चैतन्याचे ठायीं श्वासोच्छ्वासादिकांप्रमाणें स्वाभाविकपणेंच होऊं लागेपर्यंत या चिन्मात्र-वासनेचा अभ्यास करावा. पण अगोदर मैत्र्यादिभावनांस दृढ न करितां याच चिन्मात्रवासनेचा कोणी अभ्यास करूं लागल्यास ही वासना दृढ होत नाहीं. कारण पाया खचून भरल्यावांचून त्यावर उभारलेली इमारत जशी दृढ होत नाहीं, तसाच येथील प्रकार समजावा. अथवा शरीरांत वाढलेले पित्तादि दोष जुलाब, उलटी इत्यादि उपायांच्या योगानें अगोदर बाहेर घालवून मग औषध घेतलें असतां जसा गुण येतो त्याप्रमाणेंच मैत्र्यादि भावनांच्या योगानें मलिन वासनांस घालवून चिन्मात्र-वासनेचा अभ्यास केल्यास ती स्थिर होते. पुढें या चिन्मात्रवासनेचा त्याग करावा, असेंही ह्मटलें आहे. कारण, एक–मन, बुद्धि यांसह असलेली व दुसरी–त्यांवाचून असलेली अशी ही चिन्मात्रवासना दोन प्रकारची आहे. मन हें करण ( साधन ) आहे व बुद्धि कर्तृत्वाची उपाधि आहे. यास्तव मी सावधानपणें एकाग्र मनानें चिन्मात्राची भावना करीन अशा प्रकारची कर्ता व करण याच्या अनुसंधानासह होणारी जी पहिली ध्यानसंज्ञक चिन्मात्र-वासना तिचा त्याग करावा. पण अभ्यास दृढ झाल्यामुळें कर्ता व करण यांच्या अनुसंधानावांचून असणारी जी समाधिनामक वासना तिचा त्याग करूं नये. ध्यान व समाधि यांचीं लक्षणें योगदर्शनांत “ तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ” व “ तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ” अशीं सांगितलीं आहेत. या दोन्हीं सूत्रांचा अर्थ असाः—जेथें चित्त स्थिर केलें असेल तेथें ज्ञानाची एकाग्रता होणें यास ध्यान ह्मणतात. ह्मणजे जेथें चित्त स्थिर केलें असेल त्यांच्याहून अन्य पदार्थांच्या आकाराचें चित्त होऊं लागल्यास त्यास प्रतिबंध करून त्या ध्येय पदार्थांच्या आकारानेंच त्यास निरंतर ठेवणें हें ध्यान होय. तेंच ध्यान ध्येयरूप झाल्यामुळें प्रत्ययरूप स्वरूपानें शून्य ह्मणजे ध्येय–अनुभवरहित असल्या सारखें जेव्हां होतें तेव्हां तिला समाधि ह्मणतात. ध्यानसमयीं ध्यानरूपी प्रत्यय येत होता तसा समाधिकालीं येत नाहीं. तर चित्त ध्येयरूप होऊन जातें. त्यामुळें चित्तही शून्य ह्मणजे विषयरहित असल्यासारिखें होतें. योगदर्शनाच्या तिसऱ्या पादाच्या पहिल्या सूत्रांत धारणेचें लक्षण सांगितलें आहे; तें असें— “ देश बन्धश्चित्तस्य धारणा ” याचा अर्थ—नाभिप्रदेश, हृदयकमल, नासि-

काम इत्यादि स्थळीं चित्तास स्थिर करण्याचा प्रयत्न करणें यास धारणा ह्मणतात. ही धारणा दृढ झाली असतां त्यासच ध्यान ह्मणतात व ध्यान अगदीं परिपक्व झालें असतां त्यासच समाधि हें नांव देतात. असो; तर अशा या समाधीचें दीर्घकाल, निरंतर व सत्कारानें सेवन केलें असतां ती स्थिर होते. त्यानंतर कर्ता, करण, इत्यादिकांच्या अनुसंधानाचा त्याग करण्याकरितां जो प्रयत्न करावा लागत तो त्याचाही त्याग करावा. निवळीचें बीं गढूळ पाण्यांत टाकिलें असतां तें जसें पाण्यांतील मळास घेऊन तळीं जाऊन बसतें त्याप्रमाणें कर्तृकरणादिकांच्या अनुसंधानाचा त्याग करण्याकरितां केलेला प्रयत्न त्या अनुसंधानाबरोबरच नाहींसा होतो. ह्मणजे त्या प्रयत्नाच्या त्यागाकरितां निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं. येणेंप्रमाणें कर्तृकरणानुसंधानादिकांची निवृत्ति झाली असतां मलिनवासनांप्रमाणें शुद्धवासनाही क्षीण झाल्यामुळें वासनारहित मन अवशिष्ट रहातें. ह्मणून वसिष्ठांनीं " रामा, वासनेनेंच मन बद्ध होतें व तें वासनारहित झालें असतां मुक्त होतें. यास्तव तूं विवेकानें सत्वर निर्वासनीभाव संपादन कर. चांगला विचार व सत्य यांच्या योगानें वासना लीन होतात, व वासना लीन झाल्या असतां तेल संपलेल्या दिव्याप्रमाणें चित्त शांत होतें. ज्याचा बोध वासनारहित असतो त्यास जीवन्मुक्त ह्मणतात. " असें ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें " ज्याचें चित्त जाग्रत्–अवस्थेंत निद्रावस्थेप्रमाणें शांत व वृत्तिशून्य होऊन रहातें, तोच मुक्त होय. पूर्णचंद्राप्रमाणें तो ज्ञान्यांस आल्हाद देतो, मनांतील सर्व व्यग्रता सोडून जो शांत होऊन रहातो तो मुक्त परमेश्वरच होय. ज्याच्या मनांतील सर्व आशा नाहींशा झाल्या आहेत, तो समाधि लावो कीं न लावो, कर्मे करो कीं न करो; त्यानें कांहीं केलें तरी तो मुक्तच आहे. ज्याचें मन वासनारहित आहे त्याला नैष्कर्म्याची गरज नाहीं; कर्मांची आवश्यकता नाहीं; व ध्यान, धारणा, जप इत्यादिकांचीही अपेक्षा नाहीं, त्यानें शास्त्रांचा जितका विचार केला असेल तितका पुरे आहे. घोकंपट्टी करून त्यानें जीवास त्रास दिला असेल तितकाच बस आहे, व त्यानें आपसांत जितका वादविवाद केला असेल तितकाच पुरे झाला. वासनारहित मौनावांचून दुसरें उत्तम साधन नाहीं. " असेंही त्यांनीं म्हटलें आहे. पण वासनारहित मन झाल्यावर जीवंत रहाण्यास अति अवश्य असलेला व्यवहारही लुप्त होईल, असें कोणास भय पडेल. पण त्याचें कांहीं कारण नाहीं. कारण " मन वासनारहित झालें तरी नेत्रादि इंद्रियांचा व्यवहार बंद पडत

नाहीं, तर तीं स्वाभाविकपणेंच आपापल्या बाह्य विषयांमध्यें प्रवृत्त होतात. त्यांच्या प्रवृत्तीस वासनेची अपेक्षा नसते, " असें उद्दालकानीं म्हटलें आहे. व " पुरुषाच्या विशेष प्रयत्नावाचूनच जसे नेत्र पुढील पदार्थास पहातात त्याप्रमाणें वासनारहित मनही स्वाभाविकपणेंच आपलें कार्य करितें " असें वसिष्ठांनी सांगितलें आहे. वासनारहित मनानें प्रारब्ध भोग कसा घेतां येतो त्याचें त्याच मुनींनीं असें वर्णन केलें आहे. " हा चोर आहे, असें ओळखून चोराचा संगत धरली असतां तो कांहीं हानि करूं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच प्रारब्धप्राप्त विषय मिथ्या आहेत, असें समजून त्याचा भोग घेतल्यास थोड्या भोगानें फार तृप्ति होते व त्याच्याठायीं आसक्ति रहात नाहीं. अर्थात् ते हानि करीत नाहींत. ज्या मार्गस्थांस पुढचा गांव किती दूर आहे हें ठाऊक असते ते व्याकुळ न होतां सपाट्यानें पुढें जातात व गावीं पोंचतात. पण ज्यांना मार्गाचें ज्ञान नसतें ते पुढचा गांव अगदीं जवळ असला तरी आपल्या अज्ञानामुळेंच थकतात. आतां येथेंच थोडें बसूं या, असें म्हणून रेंगाळूं लागतात व त्यामुळें ते अगदीं जवळ असलेल्या गांवींही उशीरानें पोंचतात. या दृष्टांताप्रमाणेंच ज्ञानी व अज्ञानी; वासनायुक्त पुरुष व वासनारहित पुरुष यांची अवस्था होते. भोगसमयींही वासनारहित पुरुषांचे ठायीं कोणता विशेष गुण असतो तो वसिष्ठांनीं सांगितला आहे. " तो आपत्ति आली असतां व्याकुळ होत नाहीं; आपल्या कर्तव्यापलीकडे दुसरें कांहीं करीत नाहीं; शिष्टांनीं घालून दिलेल्या मार्गानें जातो; चित्तामध्यें नित्य संतुष्ट असतो; कष्टसमयींही शांति सोडीत नाहीं, वासनारहित पुरुष समुद्राप्रमाणें मर्यादेचें परिपालन करितात; व ते माहात्मे सूर्याप्रमाणें आपला नियम सोडीत नाहींत." इत्यादि. समाधि सोडून उठलेल्या जनकाचेंही असेंच आचरण होत होतें, असें योगवासिष्ठांत सांगितलें आहे. त्याचा सारांश असा:—दीर्घ काल शांतचित्तानें राहिलेला जनक व्युत्थित झाला असतां असा सूक्ष्म विचार करूं लागला—या सृष्टींत मला उपादेय ह्मणजे ग्राह्य ( स्वीकार करण्यास योग्य ) काय आहे ? मोठ्या यत्नानें मी काय साध्य करून घेऊं ? मी स्वतःसिद्ध चैतन्य आहें; तेव्हां मला कल्पना कशाची करावयाची आहे ? जें मला स्वभावतःच अप्राप्त आहे त्याची मी इच्छा करीत नाहीं व जें मला सहज प्राप्त आहे, तें मी टाकीत नाहीं. मी आपल्या स्वरूपांत स्वस्थ रहातों. जें माझें असेल तें मजजवळ असूं दे—असा विचार करून सूर्य जसा दिवस करावयास उदय पावतो त्याप्रमाणें आसक्त-

न होतां प्राप्त क्रिया करावयास तो उठला. पुढें होणाऱ्या गोष्टींचा त्यानें विचार केला नाहीं; मागें झालेल्या गोष्टींचें स्मरण केलें नाहीं, व वर्तमान क्षण त्यानें हंसत घालविला.

असो; तर याप्रमाणें वासनाक्षय संपादन केला असतां पूर्वोक्त जीवन्मुक्ति प्राप्त होते, हें सिद्ध झालें.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत जीवन्मुक्तिविवेकसाराचें वासनाक्षयनिरूपण नामक द्वितीय प्रकरण समाप्त झालें.

---

## अथ तृतीयं मनोनाशप्रकरणम् ।

श्रीगणेशायनमः । श्रीशंकराचार्यचरणारविंदाभ्यां नमः । मनोनाश हें जीवन्मुक्तीचें साधन आहे; असें मागच्या प्रकरणाच्या आरंभींच सांगितलें आहे. यास्तव आतां त्याचें निरूपण करूं या. सर्व वासनांचा क्षय झाला असतां मनोनाश आपोआप होतो हें खरें, पण मनोनाशाचा अभ्यास स्वतंत्रपणें केला असतां वासनाक्षयाचें रक्षण होतें. वर सांगितलेल्या अजिह्वत्वादिकांचा अभ्यास केला म्हणजे वासनाक्षयाचें रक्षण होईल असें कोणास वाटेल; पण तें बरोबर नाहीं. कारण मनोनाश झाला असतां अजिह्वत्वादि गुण आपोआप प्राप्त होतात. मग त्यांच्याकरितां निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं. शिवाय केवळ अजिह्वत्वादिकाचा कितीही जरी अभ्यास केला तरी ते मनोनाशावाचून स्थिर होत नाहींत. यास्तव मनोनाशाचाच अगोदर अभ्यास केला पाहिजे. याविषयीं जनकानें असें म्हटलें आहे.—" सहस्रावधि अंकुर, शाखा, पल्लव, पुष्पें इत्यादिकांनीं अति विस्तृत झालेल्या या संसाररूपी वृक्षाचें मूळ मन आहे, व मनाचें मूळ संकल्प आहे; यास्तव संकल्पास नाहींसें करून मी त्या मनाचाही नाश करितों. म्हणजे हा संसार वृक्ष आपणच सुकून जाईल. मी आतां मात्र चांगला सावध झालों; माझी अज्ञाननिद्रा गेली. मी या मनोनामक आत्म्याच्या चोरास पाहिलें. मी आतां त्याला जीवंत सोडणार नाहीं. या दुष्टानें मला फार दिवसांपासून पीडिलें आहे " इत्यादि. श्रीवसिष्ठांनींही असेंच सांगितलें आहे.—सर्वांस उपद्रव देणाऱ्या या संसारवृक्षास नाहींसें करून टाकण्यास, आपल्या मनाचा निग्रह करणें—हा एकच उपाय आहे.

मनाचा नाश होणें हा मोठा अभ्युदय आहे; ज्ञान्याच्या मनाचा नाश होतो. पण अज्ञानी पुरुषाचें मन ही त्याची शृंखलाच आहे. एकाच तत्त्वाचा अभ्यास दृढ होऊन मन जोंपर्यंत आपल्या अधीन झालेलें नसतें, तोंपर्यंत वेताळासारिख्या या वासना मनांत कल्होळ करून सोडितात. ज्याचा चित्त-दर्प नाहींसा झाला आहे व ज्यानें इंद्रियरूपी शत्रूंचा निग्रह केला आहे, त्याच्या भोगवासना थंडीच्या दिवसांत कमलिनी जशा सुकून जातात त्याप्रमाणें क्षीण होतात. यास्तव मोठ्या निग्रहानें अगोदर मन जिंकावें. जे आपल्या चित्ताकडून जिंकिले जात नाहींत तेच पुरुष या भूलोकीं श्रेष्ठ, सज्जन व पुरुषामध्यें गणण्यास योग्य होत, इत्यादि. श्रीगौडपादाचार्यांनींही "सर्व योग्यांचें अभय, दुःखक्षय, ज्ञान व अक्षयशांति हीं मनोनिग्रहाच्या अधीन असतात." असें ह्मटलें आहे. अर्जुनानें–कृष्णा, हें मन अति चंचल आहे. तें प्राण्यास व्याकुळ करून सोडणारें, बलाढ्य व दृढ आहे. वायूच्या निग्रहाप्रमाणें त्याचा निग्रह अति दुष्कर आहे, असें मी समजतों, असें ह्मणून मनोनिग्रह अति कठिण आहे असें ह्मटलें आहे. पण तें त्यांचें ह्मणणें हठयोगास उद्देशून आहे. कारण वसिष्ठांनीं–आसनावर नुस्तें बसून कितीही वेळ जरी वारंवार अभ्यास केला तरी एकाद्या युक्तीवाचून मनास जिंकतां येत नाहीं. अंकुशावाचून मत्त हत्ती जसा वठणीस येत नाहीं त्याप्रमाणें युक्तीवांचून मन अधीन होत नाहीं. हठनिग्रह व क्रमनिग्रह, असा मनोनिग्रह दोन प्रकारचा आहे. क्रमनिग्रहालाच युक्तितः निग्रह ह्मणतात. नेत्रादि ज्ञानेंद्रियें व हस्तपादादि कर्मेंद्रियें यांचा त्या त्या गोलकांस प्रतिबंध करून निग्रह करितां येतो. ह्मणजे डोळे मिटले असतां नेत्रेंद्रियांचा निग्रह होतो. हात जुळून बसलें असतां हस्तेंद्रियाचें कार्य बंद पडतें; यासच हठनिग्रह ह्मणतात. नेत्रादि इंद्रियांप्रमाणें मी मनाचाही हठानें निग्रह करीन असें अविचारी पुरुषांस वाटतें, पण तो त्याचा भ्रम असतो. कारण नेत्रादिकांच्या गोलकांप्रमाणें मनाच्या हृदय–कमल–संज्ञक गोलकास निरोध करितां येत नाहीं. करितां मनोनिग्रह क्रमनिग्रहाच्या योगानेंच संपादन करावा. अध्यात्मविद्या संपादन करणें, साधुसमागम करणें, वासनांचा त्याग करणें, व प्राणांच्या स्पंदाचा निरोध करणें हे क्रमनिग्रहाचे उपाय आहेत. हे उपाय ह्मणजे चित्तजयाच्या उत्तम युक्तिच होत. पण असल्या सर्वमान्य युक्ति असतांना त्यास जे हठानें जिंकण्याचा प्रयत्न करितात ते दीपाचा

त्याग करून काजळानें अंधःकारास हटविण्याचा प्रयत्न करितात, असेंच ह्मटलें पाहिजे. जे मूर्ख बलात्कारानें मनास जिंकण्यास उद्युक्त होतात ते कमलाच्या देठांतील बारिक तूंतूंनींच मत्त गजास बांधण्यास उद्युक्त होतात, असें मी समजतों, असें ह्मटलें आहे. त्यावरून वरील युक्तिवाचून मनोनिग्रह होणें अर्जुनाच्या ह्मणण्याप्रमाणें खरोखरच दुष्कर आहे असें ठरतें.

असो; वर ज्या चार युक्त्या सांगितल्या आहेत त्यांतील पहिली विद्या दृश्य मिथ्या आहे व दृक् (पाहणारी शक्ति) स्वप्रकाश आहे असें ज्ञान करून देते. त्यामुळें मन आपल्या विषयांमध्यें ह्मणजे दृश्यांमध्यें कांहीं अर्थ नाहीं, कारण सर्व दृश्य मिथ्या आहे व दृग्वस्तु तर आपला विषय नव्हे, कारण ती स्वप्रकाश व वाङ्मनसातीत आहे, असें पाहून, काष्ठरहित अग्नीप्रमाणें, आपोआप शांत होतें. ( ज्याप्रमाणें काष्ठरहित अग्नि जाळावयास कांहीं नाहींसें झाल्यामुळें आपल्या स्वरूपांत शांत होतो त्याप्रमाणें वृत्तिक्षय झाला असतां चित्त आपल्या स्वरूपांत लीन होतें, ज्यास कितीही बोध केला तरी तत्त्व कळत नाहीं; किंवा जो वारंवार विसरतो त्या दोषांकरितां साधुसमागम हा उपाय सांगितला आहे. कारण साधु पुरुष पुनः पुनः बोध करितात व तत्त्वाचें स्मरण करवितात. पण विद्यामदादि दुर्वासनेनें पीडिलेला जो कोणी साधुसमागम करण्यास तयार नसेल त्यानें पूर्वोक्त विवेकानें वासनात्याग करावा. त्याच्या मनोनाशास हाच चांगला उपाय आहे. पण वासना फार प्रबळ असल्यामुळें त्यांचा त्याग करणें अशक्य वाटल्यास प्राणांचा निरोध करावा, कारण प्राणांचें स्पंदन व वासना हीं दोघें चित्तास प्रेरणा करीत असतात, त्यामुळें त्या दोघांचाही निरोध केला असतां चित्ताची शांति होते, वसिष्ठांनींही " वृत्ति याच शाखा धारण करणाऱ्या चित्तवृक्षाचीं दोन बीजें आहेत. एक प्राणांचें चलन व दुसरें— दृढवासना. प्राणांच्या चलनामुळें इंद्रियें आपापल्या विषयांचें ग्रहण करण्यास समर्थ होतात. म्हणजे अनेक वृत्ति उद्भवतात, व त्या वृत्तिज्ञानामुळेंच अनंत दुःखें भोगावीं लागतात, " असें ह्मटलें आहे. यांतील दुसऱ्या वाक्याचा भावार्थ असा—ज्याप्रमाणें लोहार राखेंत आच्छादित होऊन राहिलेल्या अग्नीस भात्यानें वारा घालून प्रज्वलित करितो, त्याप्रमाणें चित्ताच्या उपादानकारणभूत अज्ञानांत आच्छादित होऊन राहिलेली संवित् प्राणाच्या स्पंदामुळें जाग्रत् होऊन चित्तवृत्तिरूपानें प्रज्वलित होते आणि त्या चित्तवृत्तिनामक संवित्च्या ज्वाळेमुळें दुःखें उद्भवतात. सर्वच चित्तवृत्ति दुःखरूप नसतात हें व्यावहारिक

दृष्ट्या जरी खरें आहे तरी विवेकी पुरुषास चित्तवृत्तिशून्य अवस्थेचा अनुभव आलेला असल्यामुळें त्यास सर्व वृत्ति दुःखरूप भासतात. ह्मणूनच " सर्वं दुःखं विवेकिनां " असें ह्मटलें आहे. असो; याप्रमाणें प्राणस्पंदामुळें चित्तवृत्ति उद्भवते. वासनेमुळेंही चित्तवृत्ति कशी उद्भवते तें सांगतों. ज्याचा दृढ परिचय झाला आहे, अशा एकाद्या पदार्थाची भावना केल्यामुळें चित्त अतिशय चंचल होतें. हाच वासनाजन्य परिणाम होय. तो जन्ममरणादिकांस कारण होतो. प्राणस्पंद व वासना हीं केवल चित्तासच प्रेरित करितात असें नाहीं तर एकमेकांसही प्रेरणा करितात. ह्मणजे प्राणस्पंदन वासनेस प्रेरणा करितें व वासना प्राण्यांच्या स्पंदनास प्रेरणा करिते. यास्तव यांतील एकाचा नाश झाला असतां दोघांचाही होतो. वसिष्ठ ह्मणतातः—

द्वे बीजे चित्तवृक्षस्य प्राणस्पन्दनवासने ।
एकस्मिंश्च तयोः क्षीणे क्षिप्रं द्वे अपि नश्यतः ।। १ ।।

ह्मणजे या चित्तवृक्षाचीं दोन बीजें आहेत. एक प्राणस्पंदन व दुसरें वासना. पण त्यांतील एक क्षीण झालें असतां लागलेंच दुसरही नष्ट होतें. त्यांच्या नाशाचा उपाय व नाशाचें फलही येणेंप्रमाणें सांगितलें आहे. " प्राणायामाचा दृढ अभ्यास, गुरूनें दिलेली युक्ति, स्थिर आसन व सात्विक आणि मित भोजन यांच्या योगानें प्राणांचा निरोध करितां येतो. आसक्ति सोडून व्यवहार करूं लागलें असतां, संसाराची भावना सोडून दिली असतां व शरीर क्षणभंगुर आहे हा निश्चय दृढ केला असतां वासना निवृत्त होते. वासनेचा त्याग केल्यानें व प्राणायाम केल्यानें चित्त आपलें मननादि कार्य करण्यास असमर्थ होतें. एकादा पदार्थ सत्य आहे, असें मोठ्या आवडीनें चिंतन करणें यासच चित्ताचा उदय ह्मणतातः पण हें ग्राह्य आहे, हें त्याज्य आहे, इत्यादि प्रकारें विचार न करितां जेव्हां तें स्थिर होतें, तेव्हां तें चित्त या अवस्थेंतच रहात नाहीं. सारांश, सतत वासनाशून्य झाल्यामुळें मन मनन करीनासें झालें कीं, परम शांति देणारी अमनस्ता उदय पावते. पण ज्याचें चित्त शांत नसतें; ह्मणजे ज्याच्या चित्तास क्षणोक्षणीं उत्पन्न होणाऱ्या नाना प्रकारच्या वासना व्याकूळ करून सोडीत असतात, त्याचे मित्र, बांधव, गुरु व असेच दुसरेही कोणी मानव दुःखापासून रक्षण करूं शकत नाहींत " इत्यादि. आसन व भोजन

यांचा येथें निर्देश केला आहे, त्यांतील आसनाचें लक्षण व फल पतंजलींनीं योगदर्शनांत " स्थिरसुखमासनं "; " प्रयत्नशैथिल्यानन्तसमापत्तिभ्याम् " " ततो द्वन्द्वानभिघातः " या तीन सूत्रांनीं सांगितलें आहे. यांचा सारांश असाः— पद्मक, स्वस्तिक इत्यादिकांतील जशा प्रकारच्या देहस्थापनरूप आसनानें पुरुषास सुख व स्थैर्य प्राप्त होईल तें त्यास योग्य आसन होय. शरीरावयवास पीडा न होणें हें सुख व शरीर न हालणें हें स्थैर्य होय. त्या आसनाच्या सिद्धीचा प्रयत्नशैथिल्य हा लौकिक उपाय आहे. व्यायाम, गृहकृत्यें, तीर्थयात्रा, स्नान, यज्ञ, होम इत्यादिकांविषयीं मनांत असलेला उत्साह ( म्हणजेच प्रयत्न ) शिथिल करावा. कारण त्यांविषयींचा मानसिक उत्साह कमी न केल्यास तो शरीरास उठवून बलात्कारानें कोणत्या तरी कामांत त्यास प्रेरित करील. अनन्त समापत्ति हा अलौकिक उपाय आहे; म्हणजे आपल्या सहस्र फणांनीं पृथ्वीस धारण करून स्थिर होऊन रहाणारा जो हा अनंत तोच मी आहे, असें ध्यान करणें हीच चित्ताची अनन्तामध्यें समापत्ति होय. हिच्या योगानें वर सांगितलेल्या प्रकारचें आसन सिद्ध करून अदृष्ट निष्पन्न होतें. अदृष्ट म्हणजे एक सूक्ष्म शक्ति. ही कर्मानंतर उत्पन्न होऊन फलापर्यंत रहाते. असो; हें आसनसिद्ध झालें म्हणजे त्या पुरुषास शीत, ऊष्ण, सुख दुःख, मान, अपमान इत्यादि द्वंद्वापासून पूर्वीप्रमाणें पीडा होत नाहीं. आतां अशा प्रकारच्या आसनास योग्य स्थान कोणतें ह्मणून विचाराल तर त्याविषयीं श्वेताश्वतर उपनिषदांत जें सांगितलें आहे तेंच मी तुह्मांस सांगतोंः— " एकांतस्थळीं सुखासनावर पवित्र होऊन व मान, मस्तक आणि शरीराचा मध्य भाग यास सम धारण करून बसावें " " वाळु, अग्नि, खडे, पक्ष्यादिकांचा ध्वनि इत्यादिकांनीं रहित; मनास प्रसन्न करणाऱ्या व नेत्रांसही मनोहर वाटणाऱ्या वायुरहित गुहा, मंदिर इत्यादि सम व पवित्र, स्थळीं आसन घालावें. " असो; आतां भोजनाविषयीं शास्त्रकारांनीं कोणते नियम केले आहेत; ते थोडक्यांत सांगतों.—

अत्याहारमनाहारं नित्यं योगी विवर्जयेत् ॥

असें श्रुतिवचन आहे. म्हणजे योगी पुरुषानें अति आहार व अनाहार म्हणजे मुळींच भोजन न करणें हीं दोन्हीं सोडावींत. अर्थात् मित आहार करावा. श्रीमद्भगवद्गीतेंत भगवानांनींही " अति भोजन करणाऱ्या पुरुषाचें चित्त स्थिर

होत नाहीं व मुळींच भोजन न करणाऱ्याचेंही होत नाहीं. जो अति झोंप घेतो त्याचें व जो अति जागतो त्याचेंही चित्त निश्चल होत नाहीं, तर युक्त आहार, युक्त विहार, युक्त कर्मानुष्ठान, योग्य कालीं झोंप घेणें व नियमित समयीं उठणें, हीं जो करितो त्याचा योग ( चित्ताचें ऐकाग्र्य ) त्याच्या दुःखाचा नाश करणारा होतो. " असें सांगितलें आहे.

मनोनाश करण्याकरितां प्रयत्न करणारा योगी दोन प्रकारचा असतो. एक विद्यामदादि आसुरसंपत्तीनें युक्त व दुसरा शुद्ध. त्यांतील दुसऱ्या प्रकारचा जो योगी असेल त्यानें ब्रह्माचें ध्यान करून मनाचा निरोध केला कीं लागलाच प्राणांचाही आपोआप निरोध होतो, अशा पुरुषास उद्देशून श्वेताश्वतरांत असें म्हटलें आहे,—" मस्तक, मान व शरीरमध्यभाग यांस सम धारण करून व मनासह सर्व इंद्रियांस हृदयांत अडकवून विद्वानानें ब्रह्मचिंतनरूपी नावेनें सर्व दुःखावह जलाशयांतून म्हणजे दुःखमय संसारांतून तरून जावें " आतां पहिल्या प्रकारच्या योग्यानें काय करावें म्हणून म्हणाला तर, त्यानेंही काय करावें तें त्याच उपनिषदांत असें सांगितलें आहे.—दृढ व सतत अभ्यास करून प्राणांचा निरोध करावा. प्राणांचा पूर्णपणें निरोध झाला कीं, मनाचा अवश्य निरोध होतो. कारण प्राणायाम केला ह्मणजे शरीराचे इतर व्यापार आपोआप कमी होतात, व त्यामुळें विद्येचा मद इत्यादि मनाच्या चेष्टाही क्षीण होतात. दक्ष योग्यानें दुष्ट घोड्याप्रमाणें सावधानपणें मनाचें धारण करावें. एका श्रुतिवचनांत—" सोनें, रूपें इत्यादि पर्वतांच्या धातूंस अग्नींत घालून जाळिलें असतां जसे त्यांचे मळ जळून जातात व ते धातु शुद्ध होतात, त्याप्रमाणें प्राणांचा निग्रह केल्यानें इंद्रियकृत दोष जळून जातात. "—असें ह्मणून प्राणायामाच्या योगानें चित्तदोष कसे क्षीण होतात हें दृष्टांत देऊन सांगितलें आहे. यांविषयीं वसिष्ठ आणखी असें ह्मणतातः—

यः प्राणपवनस्पन्दश्चित्तस्पन्दः स एव हि ॥
प्राणस्पन्दक्षये यत्नः कर्तव्यो धीमतोच्चकैः ॥ १ ॥

जो प्राणस्पंद तोच चित्तस्पंद होय. यास्तव बुद्धिमानानें प्राणस्पंदाच्या क्षयाकरितां दृढ प्रयत्न करावा. १ बृहदारण्यकोपनिषदांत एक आख्यायिका आहे. तिचा सारांश असाः—मन, वाणी, नेत्र इत्यादि इंद्रियांच्या देवता " आम्ही आपापला व्यापार निरंतर करूं " असा संकल्प

करून त्याप्रमाणें मननादि व्यापार करू लागल्या; पण श्रमरूपी मृत्यूनें त्यांस ग्रासलें. तो प्राणांस मात्र ग्रासण्यास समर्थ झाला नाहीं. तेव्हां प्राण अहोरात्र श्वासोच्छ्वास करीत असूनही थकत नाहीं, असें पाहून सर्व देवतांनीं त्याच्या स्वरूपांत प्रवेश केला. त्यामुळेंच इंद्रियांस प्राण असें म्हणतात. इंद्रियांच्या सर्व चेष्टा प्राणाच्या अधीन असतात, हेंच इंद्रियें प्राणरूप आहेत असें म्हणण्याचें कारण आहे. असो; याप्रमाणें प्राण व मन यांच्या स्पंदाचें साहचर्य असल्यामुळें प्राणांचा निग्रह केला असतां मनाचा निग्रह होतो. आतां यावर कोणी असें म्हणेल कीं—प्राण व मन यांच्या स्पंदाचें साहचर्य आहे, असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण सुषुप्तींत मन लीन झालेलें असलें तरी प्राणांचा स्पंद चाललेलाच असतो. तसेंच "प्राणक्षीण झाल्यावर नासिकेनें श्वासोच्छ्वास करावा" असें जें श्वेताश्वतरोपनिषदांत म्हटलें आहे, तें खरें दिसत नाहीं, कारण प्राण क्षीण झाले म्हणजे प्राणी मरतो, असें आम्हांस ठाऊक आहे. तेव्हां मेल्यावर श्वास कसा सोडणार ? सारांश, प्राणी जिवंत असेपर्यंत त्याच्या प्राणाचा क्षय होणें आम्हांस अशक्य वाटतें—या शंकेचें समाधान असें—प्राणवायूचा प्रवाह जोरानें न चालणें यासच प्राणक्षय म्हणतात. कुदळीनें खणीत असलेल्या, कुऱ्हाडीनें तोडीत असलेल्या, पर्वतावर चढत असलेल्या व धांवणाऱ्या पुरुषाचा श्वास जसा वेगानें चालतो तसा उभ्या किंवा बसलेल्या पुरुषाचा श्वास चालत नाहीं; हें सर्वांस ठाऊक आहे. त्याचप्रमाणें प्राणायामाचा ज्यानें पुष्कळ अभ्यास केला आहे, त्याचा श्वास अल्प चालतो. प्राणायाम करून हळु हळु उच्छ्वास सोडावा, असें श्रुतीनें सांगितलें आहे. दुष्ट घोडे मार्ग सोडून रथास कोठें तरी नेऊन सोडितात. पण सारथी त्यांचे लगाम ओढून धरून त्यांस पुनः मार्गांत आणतो. त्याप्रमाणें इंद्रियें व वासना मनास इकडे तिकडे ओढून नेऊं लागतात. पण त्याचे प्राणरूपी लगाम ओढून धरल्यास तें उन्मार्गाकडे न जातां सन्मार्गांतच रहातें.

आतां प्राणायाम कसा करावा तें सांगतों "प्राणांस वर ओढून घेऊन, प्रणव, व्याहृति व शिर यांसह गायत्रीचा तीन वेळ जप करावा. रेचक पुरक व कुंभक असा तीन प्रकारचा प्राणायाम आहे. पोटांतील वायु बाहेर सोडून हृदयांतील आकाश शून्य करून सोडावें व आत्म्याकडे चित्त लावावें, म्हणजे तो रेचक प्राणायाम होतो. पोपयाच्या किंवा नळाच्या नळीसारख्या देंठानें मुलें जसें तोंडानें पाणी ओढून घेतात, त्याप्रमाणें एका नाकपुडीनें वायु

वर ओढून घेणें त्यास पूरक म्हणतात. श्वास सोडूंही नये व वर ओढूनही घेऊं नये आणि शरीराचे अवयव हालवूं नयेत. तर स्वस्थपणें आत्मध्यान करीत बसावें, हें कुंभकाचें लक्षण आहे. हा कुंभक आंतर व बाह्य असा दोन प्रकारचा आहे. " प्राण वर ओढून घेतल्यावर तो अपानांत अस्त पावतो त्यानंतर तो पुनः हृदयांत जोंपर्यंत उदय पावत नाहीं तोंपर्यंत कुंभकावस्था असते, हाच आंतर कुंभक होय. श्वास सोडून झाल्यावर प्राण बाहेर अस्त पावला असतां पुनः जोंपर्यंत वायु आंत जाऊं लागत नाहीं तोंपर्यंत बाह्य कुंभक होतो " असें याविषयीं श्रीवसिष्ठांनीं सांगितलें आहे. उच्छ्वास आंतर कुंभकाच्या विरुद्ध असतो; निःश्वास बाह्य कुंभकाच्या विरुद्ध असतो; व शरीरास हालविणें हें दोन्हीं कुंभकाच्या विरुद्ध आहे. कारण शरीर हालविल्यास उच्छ्वास किंवा निःश्वास यांतील कांहीं तरी अवश्य होतेंच. पतंजलींनींही आसनानंतर होणाऱ्या प्राणायामाचें—" तस्मिन्सति निःश्वसोच्छ्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः "—असें लक्षण केलें आहे. या सूत्राचा अर्थ असाः— आसनाचा जय झाला असतां श्वास व उच्छ्वास यांची गति तोडणें म्हणजे श्वासोच्छ्वास न करणें यास प्राणायाम म्हणतात. बाह्य वायूस पोटांत ओढून घेणें यास श्वास अथवा निःश्वास म्हणतात व कोठ्यांतील वायूस बाहेर सोडणें यास उच्छ्वास किंवा प्रश्वास म्हणतात. यावर कोणी म्हणेल कीं, पूरकादि तिन्ही प्राणायामांस हें लक्षण लागू होत नाहीं. कारण कुंभकामध्यें जरी श्वासप्रश्वासांची गति विच्छिन्न झाली तरी पूरक व रेचक यांमध्यें क्रमानें श्वास व प्रश्वास यांची गति असते, पण तें बरोबर नाहीं. कारण अधिक काल प्राणायाम करण्याचा अभ्यास केला असतां प्राणांची सम गति विच्छिन्न होते. पतंजलींनींही योगसूत्रांत " स तु बाह्याभ्यंन्तरस्तम्भवृत्तिर्देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः " असें म्हटलें आहे. या योगदर्शनाच्या दुसऱ्या पादाच्या पन्नासाव्या सूत्राचा अर्थ असा—पोटांतील वायूस बाहेर काढून टाकून त्याची गति बंद करणें यास रेचक किंवा बाह्यवृत्ति म्हणतात. त्यास आंत ओढून घेऊन प्राणाची स्वाभाविक गति विच्छिन्न करणें यास पूरक म्हणतात. त्यास या सूत्रांत आभ्यंतरवृत्ति, असें म्हटलें आहे; व अंतर्बाह्य गतिरहित प्राणायामास कुंभक अथवा स्तंभवृत्ति म्हणतात. यांतील एकेकाचें देश, काल व संख्या यांच्या योगानें परीक्षण केलें असतां व उत्तरोत्तर अधिकाधिक प्रमाण वाढविलें असतां तो प्राणायाम दीर्घसूक्ष्मसंज्ञक

होतो. परीक्षणाचा प्रकार असा—स्वाभाविक रेचकप्रसंगीं श्वास हृदयांतून निघून नाकाच्या शेंड्यासमोर बारा अंगुल प्रदेशांत समाप्त होतो. पण अभ्यास करूं लागलें असतां, जसा जसा अभ्यास अधिक होईल तसा तसा वायु क्रमानें नाभीपासून अथवा मूलाधारापासून बाहेर येऊं लागतो व त्याची समाप्ति नाकासमोरील चोवीस किंवा छत्तीस अंगुलप्रदेशांत होते. या रेचकाविषयीं अतिशय प्रयत्न झाला असतां नाभी, मूलाधार इत्यादि स्थानीं क्षोभ होतो व त्यावरून हा रेचकश्वास कोठून निघाला हें समजतें. सारांश, त्याच्या आंतील प्रदेशाचा निश्चय असा करावा, व बाहेरच्या प्रदेशाचा निश्चय थोडासा कापूस नाकापुढें धरून करावा. येणेंप्रमाणें देशपरीक्षा करावी. आतां कालपरीक्षा कशी करावी तें सांगतों. रेचकसमयीं दहा, वीस, तीस इत्यादि अधिकाधिक ओंकाराचा उच्चार करून प्रथम एका रेचकाच्या कालाची परीक्षा करावी. नंतर या महिन्यांत मी प्रतिदिवशीं दहा रेचक करीत आहें, पण पुढच्या महिन्यांत वीस करीन; त्याच्या पुढच्या महिन्यांत तीस करीन इत्यादि निश्चय करून त्याप्रमाणें केलें असतां कालपरीक्षा सहज होते. वर सांगितल्याप्रमाणें देश व काल यांनीं युक्त असलेले प्राणायाम दहा, वीस, तीस इत्यादि क्रमानें उत्तरोत्तर वाढवीत जाणें ही संख्यापरीक्षा होय. रेचकाप्रमाणें पूरकाच्या देश—काल—संख्येचीही परीक्षा करावी. कुंभक स्थिर असल्यामुळें त्याची देशपरीक्षा होणें शक्य नाहीं, तथापि त्याचा काल व संख्या यांची परिक्षा करितां येते. असो; याप्रमाणें देश, काल व सख्या यांचें परिक्षण करून प्राणायामाचें प्रमाण उत्तरोत्तर वाढवित गेलें असतां प्राण अधिकाधिक दीर्घ व दुर्लक्ष्य झाल्यामुळें सूक्ष्म होतो. म्हणजे कापसाचा घट्ट गोळा पिंजरून विरल केला असतां तो जसा दीर्घ व सूक्ष्म होतो तसाच या प्राणाचा प्रकार होतो, असें समजावें.

पतंजलींनीं योगसूत्रांत या रेचकादि त्रिविध प्राणायामाहून आणखी एक निराळा प्राणायामाचा प्रकार सांगितला आहे. तो असाः—" बाह्याभ्यन्तरविषयाक्षेपी चतुर्थः " या सूत्राचा अर्थः—आपल्या शक्तीप्रमाणें पोटांतील सर्व वायु बाहेर सोडून नंतर बाहेरचा कुंभक करणें व यथाशक्ति पूरक प्राणायाम करून आंत कुंभक करणें, हा प्राणायामाचा चवथा प्रकार आहे. कारण या प्राणायामाचे वेळीं रेचक व पूरक यांचा आदर न करितां केवल कुंभकाचाच अभ्यास करावयाचा असतो. पण यांतील कोणता प्राणायाम

केव्हां करावा म्हणून म्हणाल तर सांगतों. निद्रा, तंद्रा, इत्यादि प्रबल दोष वाढले असतील तेव्हां रेचकादि तिन्ही प्राणायाम करावे व वरील दोष नसतील तेव्हां हा चवथा ( केवल कुंभक ) करावा. प्राणायामाचें फल स्वतः पतंजलींनींच " ततः क्षीयते प्रकाशावरणं " असें सांगितलें आहे, आणि " प्राणायाम केल्यामुळें सत्त्वाचें आवरण म्हणजे आच्छादन व निद्रा, आलस्य इत्यादिकांस उत्पन्न करणारें तम क्षीण होतें " असा त्याचा भावार्थ आहे. योगसूत्रांतच प्राणायामाचें आणखीं एक फल सांगितलें आहे तें असें:— " धारणासु योग्यता मनसः " या सूत्राचा अर्थ—-प्राणायामाच्या योगानें मन धारणेस योग्य होतें. मूलाधार, नाभिचक्र, हृदय, भुंवयांचा मध्यभाग, ब्रह्मरंध्र इत्यादिकांतील कोणत्या तरी एका प्रदेशीं चित्त स्थिर करणें यास धारणा म्हणतात. प्राणायामाच्या अभ्यासानें, रजोगुणामुळें मनामध्यें येणारें चांचल्य व तमोगुणामुळें येणारें आलस्य, यांचें निवारण होतें आणि त्यामुळें दोषरहित चित्त धारणेस योग्य होतें. " गुरूंनीं दिलेल्या ( सांगितलेल्या ) युक्तीनें प्राणस्पंदाचा निरोध करितां येतो " असें याच प्रकरणांत वर म्हटलें आहे. त्यांतील युक्तिशब्दानें योगीजनांत अति प्रसिद्ध असलेलें शिरोरूप मेरुचालन, घण्टिकाभ्रामण, ज्योतिर्ध्यान इत्यादि घ्यावें. सारांश, अध्यात्मविद्या, साधुसमागम, वासनाक्षय व प्राणनिरोध हे चित्तनाशाचे उपाय आहेत, व त्यांचें वर्णन येथवर केलें. आतां त्या उपायांच्या योगानें साध्य होणाऱ्या समाधीचें प्रतिपादन करितों. चित्ताच्या एकंदर पांच भूमि असतात. त्यांतील पहिल्या तीन भूमींचा त्याग केला असतां बाकी रहाणाऱ्या शेवटच्या दोन भूमि हीच समाधि होय. क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र व निरुद्ध अशा पांच भूमि योगभाष्यकार व्यासांनीं सांगितल्या आहेत, व त्यांचा निर्देश आम्ही वर एकदां पहिल्या प्रकरणांत केला आहे. क्षिप्त व मूढ या अवस्थांस समाधि म्हणतां येईल कीं नाहीं या विषयीं शंकाच नको. विक्षिप्त चित्तांत समाधीचा थोडासा भाग असतो; पण तो फार वेळ टिकत नाहीं. एकाग्र चित्तामध्यें जो समाधीचा भाग असतो तो आत्मस्वरूपास व्यक्त करितो; क्लेशांस क्षीण करितो; कर्मबंधनांस शिथिल करून सोडतो; व चित्तास निरोधाभिमुख करितो; यास्तव त्यास संप्रज्ञात समाधि म्हणतात, आणि चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध झाला असतां असंप्रज्ञात समाधि होते. एकाग्रतेसच संप्रज्ञात-समाधि म्हणतात; हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. तिचें लक्षण योगसूत्रांत

" शान्तोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रता परिणामः " असें सांगितलें आहे. याचा भावार्थ असाः—शांत म्हणजे भूत; उदित म्हणजे वर्तमान व प्रत्यय म्हणजे चित्तवृत्ति अर्थात् भूत. प्रत्ययानें ज्या पदार्थाचें ग्रहण केलें होतें त्याचेंच ग्रहण वर्तमान प्रत्ययानें केल्यास ते दोन्ही प्रत्यय तुल्य होतात, आणि अशा प्रकारचा जो चित्ताचा परिणाम त्यास एकाग्रता म्हणतात. या एकाग्रतेची अभिवृद्धि म्हणजेच समाधि होय. तिच्याविषयीं असें योगसूत्र आहे " सर्वार्थतैकाग्रतयोः क्षयोदयौ चित्तस्य समाधिपरिणामः " रजोगुणाच्या योगानें चंचल झालेलें चित्त क्रमानें सर्व पदार्थांचें ग्रहण करितें, पण योगी त्या रजोगुणाच्या निरोधाकरितां प्रयत्न करितो. त्याच्यायोगानें चित्ताची ती सर्वार्थग्रहणशक्ति प्रत्यहा क्षीण होते व पूर्ण एकाग्रता ऊत्पन्न होते. अशा प्रकारच्या या चित्ताच्या परिणामास समाधि म्हणतात. तिचीं एकंदर आठ अंगें आहेत. पण त्यांतील यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार हीं पांच बहिरंगें होत. अहिंसा, सत्य, अस्तेय ( चोरी न करणें ), ब्रह्मचर्य व अप्रतिग्रह ( दानादि न घेणें ) हे पांच यम आहेत. हिंसा, असत्य, चौर्य, इत्यादि अधर्मांपासून योग्याचें जे नियमन करितात ते यम, अशी यांची यौगिक व्युत्पत्ति आहे. शौच, संतोष, तप, स्वाध्याय ( वेदशास्त्राध्ययन ) व ईश्वरप्रणिधान ( परमेश्वराची अनन्य भक्ति ) हे पांच नियम आहेत. उत्तर जन्मास कारण होणाऱ्या काम्य कर्मांपासून योग्यांस निवृत्त करून मोक्षास कारण होणाऱ्या निष्कामकर्मांमध्ये जे त्यांस प्रवृत्त करितात ते नियम होत. यांतील यमांचें सेवन सतत करावें, नियमांचें नित्य सेवन न केलें तरी चालेल. कारण यमांचें सेवन न करितां केवल नियमांचें सेवन करणारा योगी पतित होतो. असो; या यमनियमांचें फल योगदर्शनाच्या दुसऱ्या पादांत सांगितलें आहे. त्याचा सारांश असाः—अहिंसा प्रतिष्ठित झाली असतां त्या योग्याच्या संनिध असलेले सर्व प्राणी वैरत्याग करितात. सत्य प्रतिष्ठित झालें असतां योग्याची वाणी अमोघ होते, म्हणजे तो जें म्हणतो तें तसेंच घडतें. अस्तेय प्रतिष्ठित झालें असतां सर्व दिशांतील रत्नें त्यास प्राप्त होतात. स्थिर ब्रह्मचर्यामुळें वीर्याचा लाभ होतो व अपरिग्रहाचें स्थैर्य झालें असतां मी कोण होतों; कसा होतों; पुढें कोण होईन; कसा होईन, इत्यादि सर्व ज्ञात झाल्यामुळें जन्मादिकांविषयींची चिंता नाहींशी होते. शौचामुळें आपलें शरीर निंद्य वाटूं लागतें व दुसऱ्याच्या शरीराशीं संसर्ग ठेवूं नये

असें वाटतें. त्याचप्रमाणें शौचामुळें चित्त शुद्ध होतें. चित्तशुद्धीच्या योगानें सौमनस्य होतें. सर्व सात्त्विक भावांचा मनांत प्रादुर्भाव होणें हेंच सौमनस्य होय. सौमनस्यामुळें चित्त एकाग्र होतें. याप्रमाणें चित्ताचा जय झाला असतां त्याच्या अधीन असणाऱ्या इंद्रियांचा जय होतो. म्हणजे इंद्रियें योग्याच्या अधीन रहातात व त्यामुळें आत्मसाक्षात्काराची योग्यता येते. संतोषसंज्ञक दुसऱ्या नियमामुळें अत्युत्तम सुखाचा लाभ होतो. तपाच्या योगानें शरीर, इंद्रियें व बुद्धि यांची शुद्धि होते. स्वाध्यायाच्या योगानें इष्ट देवतांचा साक्षात्कार होतो. आणि ईश्वर प्रणिधानामुळें समाधीची सिद्धि होते. आसन व प्राणायाम यांचें व्याख्यान वर केलें आहे. यास्तव प्रत्याहार संज्ञक समाधीच्या पांचव्या अंगाचें आतां वर्णन करितों. " स्वविषयासंप्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः " असें पतंजलींनीं त्याचें लक्षण सांगितलें आहे. शब्दादि विषयांपासून निवृत्त केलेलीं इंद्रियें चित्ताच्या स्वरूपाचें अनुकरण करीत असल्याप्रमाणें रहातात, तोच प्रत्याहार होय. "श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें व मन यांस शब्दादि अनात्म पदार्थांपासून निवृत्त करणें व तीं इंद्रियें आणि मन आत्म्याचे किरण आहेत असें चिंतन करणें यास प्रत्याहार म्हणावें " असें उपनिषदांतही म्हटलें आहे. " ततः परमा वश्यतेन्द्रियाणाम् " म्हणजे प्रत्याहारामुळें इंद्रियें अतिशय अधीन होतात. असें ह्मणून योगसूत्रकारांनीं प्रत्यहाराचें फल सांगितलें आहे. धारणा हें समाधीचें सहावें अंग आहे. कोणत्या तरी एकाद्या प्रदेशीं चित्तास स्थिर करणें ही धारणा होय, असें वर म्हटलें आहे; व मूलाधार, नाभिचक्र इत्यादि धारणेचीं स्थानेंही सांगितलीं आहेत. पण श्रुतीमध्यें आणखीं एक उत्तम स्थान सांगितलें आहे, तें असें:—

मनः संकल्पकं ध्यात्वा संक्षिप्यात्मनि बुद्धिमान् ।
धारयित्वा तथात्मानं धारणा परिकीर्तिता ॥ १ ॥

मनच स. वस्तूंविषयीं संकल्प करीत असतें; असें जाणून बुद्धिमानानें त्यास आत्म्यामध्येंच संक्षिप्त करावें. म्हणजे त्याला इतर वस्तूंपासून निवृत्त करून आत्म्याविषयींच संकल्प करावयास लावावें. याप्रमाणें चित्तास आत्म्यामध्यें स्थिर करणें हीच धारणा आहे. चित्ताचा प्रवाह एकाच वस्तूकडे चालू ठेवणें यास ध्यान ह्मणतात. पण एकवस्तुविषयक प्रवाह दोन प्रकारचा

असतो. एक वारंवार विच्छिन्न होऊन चालणारा व दुसरा सतत चालणारा. त्यांतील पहिल्या प्रवाहास ध्यान व दुसऱ्या प्रवाहास समाधि ह्मणतात; सर्वानुभव योगी व श्रीमच्छंकराचार्य यांनींही असेंच वर्णन केलें आहे. ग्रंथविस्तार होईल म्हणून तीं त्यांचीं वचनें येथें देत नाहीं. पण सर्वानुभव योग्यांनीं समाधिसंज्ञक आठव्या अंगालाच संप्रज्ञातसमाधि, असें म्हटलें आहे. यास्तव त्याचें कारण येथें सांगितलें पाहिजे, संप्रज्ञातसमाधि अंगी असून यमनियमादि त्याचीं अंगें आहेत हें खरें, पण समाधि हें आठवें अंग व संप्रज्ञातसमाधि अंगी यांच्यामध्यें फारसा भेद नाहीं. वेद शिकत असलेला बटु पदोपदीं चुकत अनुवाका म्हणतो. ज्यानें वेदाध्ययन संपविलें आहे असा ब्राह्मण सावधानपणें बिनचुक अनेक पाठ ह्मणतो व अध्यापक सावधान नसला तरी व पेंगत असतांनाही बिनचुक पाठ सांगतो; हें आपणास ठाऊक आहे. त्याचप्रमाणें ध्यान, समाधि व संप्रज्ञात समाधि यांचा विषय एक असूनही परिपक्वतेच्या न्यूनाधिकते-प्रमाणें ध्यानादि तीन भेद झाले आहेत. वस्तुतः त्यांत कांहीं भेद नाहीं. कारण वारंवार बाहेर जाणाऱ्या चित्तास परत फिरवून इष्ट स्थळीं स्थिर करणें हें ध्यान त्याचीच परिपक्व अवस्था म्हणजे अंगभूत समाधि; व तिची परिक्वता म्हणजेच समाधि. ( अंगभूत समाधीची अधिक परिपक्वता म्हणजेच संप्रज्ञात समाधि व तिची परिपूर्ण पक्वता म्हणजे असंप्रज्ञात समाधि होय. ) धारणा, ध्यान, व समाधि या तिन्ही अंगांचा मनाशीं संबंध असल्यामुळें तीं संप्रज्ञात समाधींचीं अंतरंग साधनें असून यमनियमादि पहिलीं पांच बहिरंगें आहेत. यास्तव उत्कट पुण्ययोगानें प्रथम अंतरंग अंगें सिद्ध झाल्यास यमादि बहिरंग साधनांविषयीं प्रयत्न करावयाचें कांहीं कारण नाहीं. योगदर्शनांत या समाधीचे अनेक प्रकार सांगितले आहेत. पण ते अंतर्धान पावणें, इत्यादि सिद्धींच्या उपयोगी असल्यामुळें व मोक्षास कारण होणाऱ्या समाधीच्या विरुद्ध असल्यामुळें, किंबहुना ते सर्व प्रकार मोक्षप्रतिबंधक असल्यामुळें, आम्हीं त्यांचा मुळांच आदर करीत नाहीं. योगाभ्यास करणाऱ्या उद्दालकानेंही सिद्धींचा अनादर करून मोक्ष देणाऱ्या निर्विकल्प समाधीचाच अभ्यास केला, अशी आख्यायिका आहे. राम व वसिष्ठ यांच्या प्रश्नोत्तरावरून आम्हीं ह्मणतों तेंच सिद्ध होत आहे. योगवासिष्ठांतील त्यांच्या संवादाचा सारांश असाः—

श्रीरामः—आत्मज्ञ गुरूराज, जीवन्मुक्ताचें ठायीं आकाशमार्गानें गमन करणें इत्यादि सिद्धि कशा आढळत नाहींत? श्रीवसिष्ठः—रामा, जो मुक्त झालेला

नसतो तो अनात्मज्ञच आणिमादि अष्टसिद्धि व आकाश गमनादि यांची इच्छा करितो. मंत्र, द्रव्य, क्रिया, काल इत्यादि सर्व आनात्मज्ञ पुरुषांच्या उपयोगीं असतें. आत्मज्ञ त्या अनात्म पदार्थांकडे ढुंकूनही पहात नाहीं. कारण त्याची दृष्टि सर्वदां आत्म्याकडे लागलेली असते. तो आत्म्याच्या योगानें आत्म्यामध्यें तृप्त होऊन रहातो; त्यामुळें अविद्या व तिचीं कार्यें यांच्या मागें लागत नाहीं. कारण जगांतील सर्व भाव अविद्यामय आहेत, असें तो जाणतो. एकदां परमात्मपदाची प्राप्ति झाली कीं मग त्याला जगांतील कोणतीही वस्तु उपयोगी व उपकारक वाटत नाहीं. सर्व इच्छा नाहींशा झाल्यावांचून आत्मलाभ होत नाहीं, असा नियम आहे. यास्तव आत्मज्ञ जीवन्मुक्त सिद्धींची इच्छा करील अशी आशा करणेंही व्यर्थ आहे.

असो; सारांश आत्मविषयक संप्रज्ञातसमाधि वासनाक्षय व निरोध समाधि अथवा मनोनाश यांस कारण होते. आणि त्याकरितांच आह्मी तिच्याविषयीं इतका आदर दाखविला.

आतां या पंचम भूमिकारूप निरोध समाधीचेंच वर्णन करितों. "व्युत्थान संस्कारांचा पराभव होऊन निरोध संस्कारांचा प्रादुर्भाव होणें व चित्तानें निरुद्ध होऊन रहाणें हाच निरोध परिणाम होय." असें वरही एकदां ह्मटलें आहे. व्युत्थानसंस्कार समाधीस प्रतिबंध करीत असतात. त्यांचें यथार्थ वर्णन उद्दालकाच्या समाधीचें निरूपण चाललें असतां, योगवासिष्ठांत, असें केलें आहे:—मननरहित अशा परम पावन पदीं मी कधीं पोंचेन व तेथें स्थिर कसा व केव्हां राहीन. अशा चिंतेनें व्याकुळ झालेला उद्दालक पुन: पुनः आसनावर स्थिर होऊन ध्यानाचा अभ्यास करूं लागला, पण मर्कटाप्रमाणें चंचल असलेल्या चित्तास नाना प्रकारचे विषय ओढून नेऊं लागल्यामुळें त्यास परम आनंद देणारी स्थिर समाधानवृत्ति प्राप्त झाली नाहीं. एकादे वेळीं तें मर्कट बाहेरच्या विषयांकडे धांवे व एकादे वेळीं अतर विषयांत आसक्त होई. एकादे वेळीं त्यास सूर्यासारिखें तेज दिसे; व केव्हां केव्हां तर त्यास शून्याचा अथवा अंधकाराचा भास होई. मध्येंच एकदां त्यास नानाप्रकारचे विषय दिसत. पण मनाची ही अस्थिरस्थिति बरी नव्हे, असें जाणून त्या शूर उद्दालकानें त्या सर्व मानसिक कल्पनांस तोडून मनास हृदयकमलांत नेलें. तों त्यास तेथें गाढ अंधकार दिसला. पण त्याच्या पलीकडे शुद्ध विवेक असेल, असें समजून त्यानें ज्ञान-

सूर्यानें त्या अंधकारासही हटविलें. तेव्हां त्यास हृदयांमध्यें तेजाचा पुंजका दिसला. पण त्या निःस्पृह मुनीनें त्या तेजाचाही लोभ धरिला नाहीं. तेव्हां त्याचें मन लीन होऊं लागलें. ह्मणजे त्यास निद्रा लागू लागली. पण त्या प्रयत्नशील ब्राह्मणानें तिलाही हटविलें. निद्रा गेल्यावर त्याला चिदाकाश दिसूं लागलें. पण त्यालाही थारा न मिळाल्यामुळें त्याचें मन मोहित झालें. शेवटीं त्या महात्म्यानें मोहाचेंही परिमार्जन केलें. तेव्हां तेज, तम, निद्रा, मोह, इत्यादिकांनीं रहित पण जिचें शब्दांनीं वर्णन करितां येत नाहीं, अशा एका अवस्थेंत मन विश्रांति घेऊं लागलें. पण ती अवस्थाही फार वेळ टिकली नाहीं. कारण तिच्याकरितां त्याचा दीर्घ अभ्यास झालेला नव्हता. असो; याप्रमाणें व्युत्थानसंस्कार निरोधसमाधीस प्रतिबंध करीत असतात. करितां साधकानें चित्तनिरोधाविषयीं प्रतिदिन व प्रतिक्षण प्रयत्न करून त्यांचा प्रादुर्भाव न होईल असें करावें—ह्मणजे निरोधसंस्कार आपोआप उद्भवतात; आणि असल्या निरोधसंस्कारांनीं युक्त असलेलें चित्त निरुद्ध होऊन रहातें. सारांश अशाप्रकारें हा निरोधपरिणाम होतो. यावर कोणी म्हणेल कीं, "एका चैतन्यशक्तीवांचून इतर सर्व पदार्थ प्रत्येक क्षणीं परिणाम पावणारे आहेत" असें योगसूत्रांत सांगितलेलें असल्यामुळें चित्ताचाही सर्वदां परिणाम होत रहाणार हें उघड आहे. मग निरुद्ध चित्ताचा उदय केव्हां व कसा होणार? ही शंका बरोबर आहे. कारण व्युत्थित चित्ताचा एकसारिखा परिणाम प्रवाह चालत असतो, हें सर्वांस आपापल्या अनुभवावरून ठाऊक आहे. पण निरुद्ध चित्ताचा परिणाम कसा होतो? याविषयीं शंका आहे. व तिचें समाधान स्वतः योगसूत्रकारांनींच "ततः प्रशान्तवाहिता संस्कारात्" या सूत्रांत केलें आहे. ज्याप्रमाणें समिधा, घृत इत्यादिकांच्या आहुत्या दिल्या असतां अग्नि उत्तरोत्तर अधिक प्रज्वलित होतो व होम संपून समिधादि द्रव्यें जळून गेलीं असतां तो प्रथम क्षणीं किंचित् शांत होतो व उत्तरोत्तर त्यांची शांति अशीच वाढत जाते. त्याप्रमाणें निरुद्ध चित्ताच उत्तरोत्तर अधिक शांत प्रवाह चालू लागतो. व त्या शांतीच्या प्रवाहांतील पूर्व पूर्व संस्कारच पुढच्या पुढच्या शांतीच्या प्रवाहास कारण होतो. या प्रशांतवाहितेचें भगवानांनीं श्रीगीतेच्या सहाव्या अध्यायांत असें वर्णन केलें आहे—

"ज्यावेळीं अत्यंत नियमित केलेलें चित्त आत्म्यामध्येंच स्थिर होऊन रहातें व साधक सर्व विषयोपभोगांविषयीं निःस्पृह होतो तेव्हां त्यास योगी

असें ह्मणतात. वायुरहित प्रदेशीं ठेविलेल्या दीपाची ज्योति जशी हालत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें चित्त स्थिर करणाऱ्या योग्याचें चित्त निश्चल रहातें. योगाभ्यासानें निरुद्ध चित्त जेव्हां शांत होतें जेव्हां योगी शुद्धचित्ताच्या योगानें आत्म्यास पहात संतुष्ट होतो, जेव्हां तो केवल बुद्धिग्राह्य, अतींद्रिय व निरतिशय सुखाचा अनुभव घेतो; ज्याच्या ठायीं स्थित झालेला हा योगी तत्त्वापासून च्युत होत नाहीं; ज्याची प्राप्ति झाली असतां त्याहून दुसरा कोणताही लाभ त्यास अधिक वाटत नाहीं; व ज्याच्यामध्यें स्थित झाल्यावर मोठ्या थोरल्या दुःखानेंही योगी चंचल होत नाहीं तो योग होय असें; जाणावें व कंटाळा न करितां दृढ निश्चयानें त्याचा अभ्यास करावा. ”

निरोध समाधीचें साधन “ विरामप्रत्ययाभ्यासपूर्वकः संस्कारशेषोऽन्यः ” या सूत्रांत सांगितलें आहे. विराम ह्मणजे वृत्तीची शांति; तिचा प्रत्यय ह्मणजे कारण—पुरुषाचा प्रयत्न; त्याचा वारंवार अभ्यास करणें; अर्थात् चित्तवृत्ति शांत व्हाव्या ह्मणून सतत प्रयत्न करणें. असें केल्यानें असंप्रज्ञात समाधि प्राप्त होते. पण त्या अवस्थेंत वृत्तिरहित झालेलें चित्त दुर्लक्ष्य होतें. ह्मणून तें त्यावेळीं संस्काररूपानें रहातें असें ह्मणतात. चित्ताच्या वृत्ति शांत व्हाव्या ह्मणून त्यांच्या निरोधांचा अभ्यास करावा असें श्रीकृष्णांनींही सांगितलें आहे. त्याच्या वचनामृताचा सारांश असा:—

संकल्पांपासून उद्भवणाऱ्या सर्व कामांचा पूर्णपणें त्याग करून व विवेकयुक्त चित्तानेंच इंद्रियसमुदायाचें सर्व बाजूंनीं नियमन करून धैर्ययुक्त बुद्धीनें हळु हळु शांत व्हावें, मनाला आत्म्यामध्यें स्थिर करावें, व कशाचेंही चिंतन करूं नये; पण इतकें केल्यावरही जर मन अस्थिर होऊन विषयांकडे जाऊं लागलें तर तें जिकडे जिकडे जाईल तिकडून तिकडून त्याला वळवून आणून आत्म्याच्या अधीन करावें.

पुष्पांच्या माळा, चंदनाच्या उट्या, स्त्रिया, पुत्र, मित्र, गृह, क्षेत्र, वित्त इत्यादि इष्ट पदार्थ अनेक दोषांनीं भरलेले आहेत व ते सर्व दोष मोक्षशास्त्रांत कुशल असलेल्या विवेकी जनांस ठाऊकही आहेत. पण प्रयत्नशील पुरुषही अनादि अज्ञानामुळें त्या दोषांस विसरून त्यांच्या ठायीं उत्तमोत्तम गुणांची कल्पना करितात, त्यामुळें “ मला हें हवें; मला तें हवें ” अशी त्यांस हांव सुटते “ संकल्पमूलः कामो वै ” असें म्हटलेंच आहे. तसेंच—

काम जानामि ते मूलं संकल्पात्किल जायसे ।
न त्वां संकल्पयिष्यामि समूलस्त्वं विनङ्क्ष्यसि ॥ १ ॥

अरे कामा, मी तुझें मूळ जाणतों, तूं संकल्पापसूनच उद्भवतोस. बरें आहे, मी आतां तुझ्याविषयीं संकल्पच करणार नाहीं. म्हणजे तूं समूळ नाहींसा होशील. १. असेंही एक वचन आहे; यास्तव विवेकाचा आश्रय केल्यामुळें विषय-दोषांचा साक्षात्कार झाला असतां, कुत्र्यानें ओकून टाकिलेल्या क्षीरीप्रमाणें विवेक्यास कामांची किळस येते. वर सांगितलेल्या माळा, चंदन इत्यादि ऐहिक कामांप्रमाणेंच ब्रह्मलोकादि पारलौकिक काम व अणिमादि ऐश्वर्य सुद्धां त्याज्य आहे, हें सुचविण्याकरितां भगवानांनीं " सर्व कामांचा पूर्णपणें त्याग करून " या वाक्यांत सर्वशब्द घातला आहे. एक महिनाभर उपवास करण्याचा संकल्प करून ज्यानें मासोपवास व्रत धरिलें आहे त्यानें त्या महि-न्यांत अन्नाचा जरी त्याग केला तरी त्याची इच्छा वारंवार होत असते, हें सर्वांस ठाऊक आहे. त्याप्रमाणें पूर्वोक्त विषयांचा त्याग केला तरी त्यांच्या-विषयीं इच्छा होणें साहाजिक आहे. हें मनांत आणून वरील वाक्यांत "पूर्णपणें" असें म्हटलें आहे. अर्थात् कोणत्याहि विषयाविषयीं इच्छा होणेंही योग्य नाहीं. कामांचा त्याग केल्यावर इंद्रियांची प्रवृत्ति मनःपूर्वक जरी न झाली तरी रूपादि विषयांचे ठायी तीं स्वाभाविकपणें प्रवृत्त होतील. करितां त्यांस मनानें नियमित केलें पाहिजे. देवतादर्शनादि शुभ कार्यामध्येंही त्यांस आसक्त होऊं देऊं नये. हें सुचविण्यासाठीं " सर्व बाजूंनीं ( समंततः )" असें वर म्हटलें आहे. भूमिकांचा उत्तरोत्तर जय करून चित्तास शांत करावें; असें सुचविण्याकरितां " शनैः शनैः " म्हणजे हळु हळु असें म्हटलें आहे. भूमिका चार आहेत. कठोपनिषदांत त्यांचें असें वर्णन केलें आहे. " सुज्ञ साधकानें वाणीचें मनामध्यें नियमन करावें. नंतर मनाचें ज्ञान–आत्म्यामध्यें नियमन करावें. ज्ञान-आत्म्याचें महान्-आत्म्यामध्यें नियमन करावें व शेवटीं त्याचें शांत-आत्म्यामध्यें नियमन करावें. " लौकिक व वैदिक असा वाणीचा दोन प्रकारचा व्यापार आहे. बडबड करणें इत्यादि लौकिक, व जपादि करणें हा वैदिक वाग्व्यापार होय. पण त्यांतील लौकिक वाग्व्यापार पुष्कळ विक्षेप उत्पन्न कर-णारा असल्यामुळें योग्यानें व्युत्थान कालींही त्याचा त्याग करावा. कारण " मौन, योगासन, योग, तितिक्षा, एकांतवास, निःस्पृहत्व व समत्व हे सात

एकदण्डी संन्याशाचे धर्म आहेत." असें सांगितलें आहे. पण जपादि दुसऱ्या प्रकारच्या वाग्व्यवहाराचा निरोध-समाधीच्या वेळींच त्याग करावा. ही पहिली वाग्भूमि आहे. त्या भूमीस केवल प्रयत्नानेंच कित्येक दिवसांनीं, महिन्यांनीं किंवा वर्षांनीं दृढ जिंकून नंतर दुसऱ्या मनोभूमीविषयीं प्रयत्न करावा. कारण असें न करितां एकदम सर्व भूमींस जिंकण्याच्या इच्छेनें प्रयत्न केल्यास पहिल्या किंवा कोणत्या तरी एका भूमीपासून च्युत होतांच सर्व भूमि नाहींशा होतील. चक्षु, श्रोत्र, इत्यादि बाह्य इंद्रियांचाही निरोध केला पाहिजे. त्यावांचून कांहीं हित होणार नाहीं, हें खरें; पण त्या बाह्य साधनांचा वाग्भूमींत किंवा मनोभूमींत अंतर्भाव होतो असें समजून वरील श्रुतीनें त्यांचा निराळा निर्देश केला नाहीं. आतां वाणीचें मनामध्यें नियमन करावयाचें ह्मणजे काय? ह्मणून विचाराल तर सांगतों. चित्तामध्यें नानाप्रकारचे विक्षेप उत्पन्न करणारी जी ही वाणी व मन त्यांतील वाणीचा व्यापार अगोदर बंद करून केवल मनो-व्यापार होऊं द्यावा. गाय, म्हैस, घोडा, इत्यादिकांप्रमाणें वाणीचा व्यापार स्वाभाविकपणें बंद झाला असतां त्यानंतर मनाचें ज्ञान-आत्म्यामध्यें नियमन करावें. ज्ञान-आत्मा, महात्मा व शांतात्मा असा आत्मा तीन प्रकारचा आहे. ज्ञातृत्व या उपाधीनें युक्त असलेला व शरीरांत राहून सर्व जाणणारा जो अहंकार त्यांस येथें ज्ञान असें ह्मटलें आहे. अर्थात् अहंकारच ज्ञानात्मा होय. मन हें त्याचें साधन आहे. व तो त्याचें नियमन करीत असतो. हा अहंकार विशेषरूप व सामान्यरूप असा दोन प्रकारचा आहे. "हा मी अमुक, अमक्याचा पुत्र" इत्यादि प्रकारचा जो स्पष्ट अभिमान तो विशेषरूप अहंकार व "मी आहें" इत्यादि प्रकारचा सर्व व्यवहारास अवश्य असलेला जो अस्तित्वमात्र अहंकार, तो सामान्य अहंकार होय. हा सामान्यरूप अहंकार सर्व व्यक्तींमध्यें व्याप्त असल्यामुळें त्यास महान् ह्मणतात. हाच महात्मा आहे. सारांश विशेषरूप अहंकारास ज्ञानात्मा व सामान्यरूप अहंकारास महात्मा ह्मणतात. पण "मी आहें." अशा प्रकारचा अस्तित्वमात्र अहंकारही ज्यामध्यें नसतो तो शांतात्मा होय. हे तीन आत्मे अंतर्बहिर्भावानें रहातात. शांतात्मा सर्वांच्या आंत रहात असून तो केवल चैतन्यरूप आहे. जडशक्तिरूप अव्यक्त अथवा मूल प्रकृति त्याच्या आश्रयानें रहाते. ती प्रथमतः सामान्य अहंकाररूप होऊन व महत्तत्त्व हें नांव धारण करून व्यक्त होते. पुढें ती त्याच्याही बाहेरील विशेष अहंकार होते. पुढें ती मूलप्रकृतिच अहंकाराच्याही

बाहेरचें मन होतें. पुढें तीच वागादि इंद्रियरूप होते. इंद्रियें मनाच्या बाहेर असतात. वरील कठोपनिषदांतच याविषयीं असें ह्मटलें आहे:–

"इंद्रियांच्या पलीकडे विषय आहेत; विषयांच्या पलीकडे मन आहे; मनाच्या पलीकडे बुद्धि आहे; बुद्धीच्या पलीकडे महान्-आत्मा आहे; महात्माच्या पलीकडे अव्यक्त आहे; व अव्यक्ताच्या पलीकडे पुरुष आहे. पुरुषाच्या पलीकडे कांहीं नाहीं. कारण तीच परम सीमा आहे व तीच परम गति आहे."

तात्पर्य, असा प्रकार असल्यामुळें नानाप्रकारचे संकल्पविकल्प करणाऱ्या मनाचें नियमन अहंकारांत करावें. ह्मणजे मनोव्यापारांचा त्याग करून केवल अहंकारास बाकी ठेवावें. असें करणें अशक्य आहे, असें समजूं नये. कारण "त्या मनाचा निग्रह वायूच्या निग्रहाप्रमाणें अत्यंत दुष्कर आहे, असें मी समजतों." असें अर्जुनानें ह्मटलें असतां त्यावर भगवानांनीं "हें जरी खरें आहे, तरी अभ्यास व वैराग्य या दोन उपायांच्या योगानें त्याचा निग्रह करितां येतो. शरीर व इंद्रियें ज्यानें आपल्या स्वाधीन ठेविलेलीं नाहींत त्याला हा योग प्राप्त होणें कठिण आहे. पण ज्यानें त्यांस आपल्या अधीन ठेविलें आहे त्यास उपायानें मनोनिग्रह करितां येतो." असें उत्तर दिलें आहे. येथील अभ्यास व वैराग्य यांचें व्याख्यान मागें थोडक्यांत केलें आहे व याचप्रकरणांत पुढें करणार आहों. योगाभ्यासाचा कंटाळा न करणें हा मनोनिग्रहाचा मुख्य उपाय आहे व त्याचा निर्देश गौडपादाचार्यांनीं केला आहे. त्यांच्या कारिकेचा सारांश असा:—दर्भाच्या अग्रावर राहील एवढ्या बिंदूस ह्मणजे अगदीं लहानशा बिंदूस आपल्या चोचीनें प्रत्येक वेळीं उडवून, टिटवीनें न कंटाळतां जसा समुद्राचा पराभव केला त्याप्रमाणें सतत व निश्चयानें प्रयत्न केल्यास मनाचा निग्रह करितां येतो. एका बलाढ्यानेंही पुष्कळ दुर्बलांशीं विरोध करूं नये. कारण टिटवीनें जसा समुद्राचा पराभव केला तसा त्याचा पराभव होतो. संप्रदायवेत्ते याविषयीं अशी एक आख्यायिका सांगतात:—एका टिट्टिभ नामक पक्ष्यांचीं तीरावरील अंडीं एकदां समुद्राच्या भरतीनें वाहून गेलीं. तें पाहून त्या क्षुद्र पक्ष्यास मोठा राग आला व मी या गर्वित समुद्रास सुकवून टाकतों; असा निश्चय करून तो आपल्या चोचीनें दर्भाच्या अग्रावर राहील असा एकेक बिंदु उपसून बाहेर टाकूं लागला. तेव्हां त्याच्या जातीचे अनेक पक्षी येऊन त्याची समजूत घालूं लागले व या दुर्घट कर्मापासून परत फिरण्याविषयीं त्यांनीं त्यास सांगितलें. पण तो आपल्या

निश्चयापासून ढळेना. उलट " तुम्ही सर्व मला सहाय करा, ह्मणजे दीनांस दुःख देणाऱ्या या मोठ्यास मी आज नाहींसें करून टाकीन " असें तो ह्मणाला. आपल्या बारिक चोंचीनें पाणी उडविण्याचा त्याचा सपाटा तसाच चालला होता. त्याचे ते कष्ट पाहून इतर पक्षीही समुद्राचें पाणी उपसूं लागले. कांहीं कालानें आकाशांतून गमन करणाऱ्या नारदांनीं हा चमत्कार पाहिला व पक्ष्यांचें ते क्लेश पाहून त्यांस दया आली. त्यांनीं गरुडास हें सर्व वर्तमान सांगून त्यांच्या सहायास पाठविलें. तेव्हां त्याच्या पंखाच्या सपाट्यानें व्याकुळ झालेला समुद्र त्यास शरण आला व पक्ष्याचीं अंडीं त्यानें परत केलीं. असो; याप्रमाणें खिन्न होऊन हें काम दुर्घट आहे, असें न ह्मणतां मनोनिग्रहासारिख्या परम धर्मामध्यें तत्पर होऊन रहाणारा योगी ईश्वरानुग्रहास पात्र होतो. मध्यें मध्यें मनास अनुकूल वाटेल असेंच वागल्यानें खेद कमी होतो. ह्मणजे स्वभावतःच पानचट असलेला भात खातांना कंटाळा येऊं नये ह्मणून चटण्या, कोशींबिरी, भाज्या इत्यादिकांचा जसा मध्यें उपयोग करितात तसाच योगाभ्यासाचाही कंटाळा येऊं नये ह्मणून मध्यें थोडें थोडें चित्तानुकूल वर्तनही करावें. हाच अभिप्राय मनांत धरून वसिष्ठ ह्मणतातः—" जाग्रत् अवस्थेचा जो काल आहे त्याचे चार भाग करून अगदीं नवशिक्या साधकानें त्यांतील दोन भाग चित्तानुकूल वागण्यांत घालवावे. शास्त्राभ्यासांत एक भाग घालवावा. व राहिलेला भाग गुरुशुश्रूषेंत व्यतीत करावा. ज्याला बराच अभ्यास झाला आहे, अशा मध्यम साधकानें एक भाग चित्तरंजनांत, दोन भाग गुरुशुश्रूषेंत व चवथा भाग शास्त्रार्थ चिंतनात घालवावा. आणि ज्याचा अभ्यास पूर्ण झाला आहे, अशा उत्तम साधकानें दोन भाग शास्त्रचिंतन व वैराग्य यांत घालवून दोन भाग ध्यान व पूजा यांत घालवावे." या वसिष्ठ वचनांत चित्तानुकूल वागणें व चित्तरंजन असे जे शब्द आले आहेत त्याचा अर्थ " मनधोक्त—यद्वातद्वा वागणें " असा समजूं नये. तर प्राण वांचण्यास अत्यंत अवश्य अशा भिक्षाटनादि व्यापारांत व आपल्या वर्णाश्रमानुरूप कर्मांत काल घालविणें असा त्याचा अर्थ समजावा. यथाशक्ति एक घटिका किंवा दोन घटिका चित्तास स्थिर करण्याचा अभ्यास करून नंतर दोन घटिका चित्तांत शास्त्रचिंतन करावें. पुढें कांहीं वेळ गुरुसेवा करावी. त्यानंतर देहचिंता करावी व पुनरपि योगाभ्यास करावा. याप्रमाणें वारंवार करीत रहावें. रात्रीं निजावयाच्या पूर्वीं त्या दिवशीं किती काल योगाभ्यासांत गेला याचा

विचार करावा. दुसऱ्या दिवशीं त्याच्यापेक्षां जास्त काल योगाभ्यास करणें चांगलें. पण कांहीं कारणानें तसें न घडल्यास निदान कमी अभ्यास तरी होऊं देऊं नये. याप्रमाणें प्रति दिवशीं किंवा प्रतिपक्षीं अथवा प्रतिमासीं अभ्यासाचा काल वाढवीत जावें. म्हणजे एका वर्षाच्या अंतीं योगाभ्यासाचा काल बराच मोठा होईल. पण उत्तरोत्तर असाच काल वाढवीत गेल्यास कांहीं दिवसांनीं इतर सर्व व्यवहार लुप्त होईल, अशी कोणी शंका घेईल; पण ज्याचे इतर सर्व व्यापार लुप्त झाले आहेत त्याचाच या योगानुष्ठांत अधिकार असल्यामुळें तिला अवकाशच रहात नाहीं. एवढ्याकरितांच जीवन्मुक्तीस विद्वत्संन्यासाची अपेक्षा असते असें आम्ही पहिल्या प्रकरणांत म्हटलें आहे. असो; सारांश तदेकनिष्ठ पुरुषच अध्ययन करणाराप्रमाणें किंवा वाण्याप्रमाणें क्रमानें योगारूढ होतो. अध्ययन करणारा ब्रह्मचारी प्रथम पादाचा एक अंश घेतो; नंतर सर्व पादाची संथा घेतो; पुढें अर्धी ऋचा घेतो; कांहीं दिवसांनीं सर्व ऋचा एकदम घेऊं लागतो; कांहीं महिन्यांनीं दोन दोन ऋचा म्हणतो व पुढें पुढें तर वर्गाचा वर्ग घेतो; आणि अशा रीतीनें अध्ययन करितां करितां दहा किंवा बारा वर्षांनीं तो अध्यापक होतो. किंवा वाणी अगोदर एका मोहरेचा जिन्नस घेऊन तो विकतो. त्यांत झालेला लाभ मूळ भांडवलांत मिळवून तो उत्तरोत्तर व्यापार वाढवूं लागतो. असें करितां करितां कांहीं दिवसांनीं तो लक्षपति किंवा क्रोडपति होऊन बसतो. सारांश हीं दोन उदाहरणें डोळ्यांपुढें ठेवून क्रमानें चित्तजयाचा अधिकाधिक अभ्यास करणारा योगी कांहीं काल गेल्यानंतर योगारूढ होतो, यांत कांहीं संशय नाहीं. यास्तव उद्दालकाप्रमाणें पुनः पुनः प्राप्त होणाऱ्या संकल्पविकल्पांचा तिरस्कार करून मनाचें विशेष अहंकाररूप ज्ञानात्म्यामध्यें नियमन करावें. या द्वितिय भूमिकेस जिंकून बालकाप्रमाणें किंवा मुक्या प्राण्याप्रमाणें निर्मनस्त्व स्वाभाविकपणें सिद्ध झालें असतां ज्ञानात्म्याचें सामान्य अहंकाररूप महत्तत्त्वामध्यें नियमन करावें. झोंप लागण्यापूर्वी थोडीशी तंद्रा येते, हें सर्वांस ठाऊक आहे. तिलाच आपण गुंगी म्हणतों. त्या वेळीं विशेष अहंकाराचा आपोआप संकोच होत असतो. किंवा तंद्रा नसतांनाही एकादी पूर्वी अनुभलेली गोष्ट आठवूं लागलों असतां अहंकाराचा संकोच होतो. तशाच प्रकारची ही तिसरी भूमिका आहे. अभ्यासाच्या दृढतेमुळें ही भूमिका साध्य

झाली असतां त्यो सामान्यरूप अहंकारासही ( ह्मणजे महत्तत्त्वास अथवा महात्म्यासही ) उपाधिरहित व त्यामुळेंच चिदेकरस शांत आत्म्यामध्यें लीन करावें.

महत्तत्त्वं तिरस्कृत्य चिन्मात्रं परिशेषयेत् ॥

ह्मणजे महत्तत्त्वाचा तिरस्कार करून केवल चैतन्यास अवशिष्ट ठेवावें, असे श्रीवसिष्ठांनींही ह्मटलें आहे. पूर्वीप्रमाणेंच प्रयत्न करणारास ही भूमि सहज जिंकता येते. शास्त्राच्या अभ्यासास नुकताच ज्यानें आरंभ केला आहे, अशा विद्यार्थ्यास व्युत्पत्ति होण्यापूर्वी प्रत्येक श्लोकाच्या व्याख्यानाची अपेक्षा असते. पण तीच ज्याची व्युत्पत्ति दृढ झाली आहे, त्यास पुढील ग्रंथाचा अर्थ आपोआप समजतो. त्याप्रमाणेंच ज्यानें पूर्व भूमीचा चांगला अभ्यास केला आहे अशा योग्याला उत्तर भूमीच्या जयाचा उपाय आपोआप सुचतो. ह्मणूनच योगभाष्यकार व्यासांनीं:—

योगेन योगो ज्ञातव्यो योगो योगात्प्रवर्तते ।
योऽप्रमत्तस्तु योगेन स योगी रमते चिरम् ॥ १ ॥

असें ह्मटलें आहे. योगाच्या योगानेंच योगास जाणावें. योग योगापासूनच प्रवृत्त होतो. योगानें जो अप्रमत्त ( सावधान ) असतो तो योगी दीर्घ काल रममाण होतो. सारांश उत्तरोत्तर अभ्यासानें अधिकाधिक कौशल्य येऊन शांति मिळते, असा या वचनाचा भावार्थ आहे. वरील कठोपनिषदांतील श्रुतींत महत्तत्त्व व शांतात्मा ( पुरुष ) यांच्यामध्यें अव्यक्ताचा निर्देश केला आहे. तेव्हां महत्तत्त्वास अव्यक्तांत निरुद्ध करावयास कां सांगितलें नाहीं? अव्यक्त महत्तत्त्वाचें साक्षात् उपादान कारण असल्यामुळें त्यांचा अव्यक्तांत निरोध होणेंच योग्य आहे, असें कोणास वाटेल; पण तें बरोबर नाहीं. कारण महत्तत्त्वाचा अव्यक्तांत निरोध केल्यास त्याचा लय होईल. ह्मणजे झोंप लागेल. निरोध होणार नाहीं. आह्मांस लय नको आहे; महत्तत्त्वाचा निरोध पाहिजे आहे, तो उपादान नसलेल्या शांत आत्म्यामध्येंच होणें शक्य आहे. मातीच्या घागरीचें जल उपादान कारण नाहीं. ह्मणून त्याचा त्यांत निरोध करिता येतो. ( त्यास जलांत बुडवून ठेवितां येतें. ) पण माती हें तिचें उपादान कारण असल्यामुळें तिच्यामध्यें मडक्याचा निरोध न होतां लयच होईल. यास्तव श्रुतिमातेनें महत्तत्त्वाचा शांत आत्म्यांत निरोध करावयास सांगितलें आहे. महत्तत्त्वाच्या स्वरूपाचाच लय होणें ह्मणजे महत्तत्त्व सर्वथैव नष्ट होणें; हा पुरुषार्थ आहे, असें ह्मणूनही चालत नाहीं.

कारण " सूक्ष्मदर्शी पुरुष अति सूक्ष्मबुद्धीनें त्यास पहातात " असें ह्मणून त्याच श्रुतीनें पुढें बुद्धि सूक्ष्म होण्याकरितां चित्तनिरोध हा उपाय सांगितला आहे. शिवाय चित्तनिरोधाकरितां जसा भगीरथ प्रयत्न करावा लागतो तसा किंवा त्याच्या सहस्रांशही प्रयत्न लयाकरितां करावा लागत नाहीं. कारण प्रत्यहीं गाढ निद्रासमयीं महतत्त्वाचा ह्मणजे बुद्धीचा लय आपोआप होत असतो. यावर कोणी असें म्हणेल कीं—धारणा, ध्यान, समाधि, यांच्या योगानें साध्य होणारी संप्रज्ञात समाधि एकाग्र वृत्तिरूप असल्यामुळें ती आत्मदर्शनास कारण होते, हें आम्हांस मान्य आहे. पण शांत आत्म्यामध्यें चित्ताचा निरोध केल्यावर प्राप्त होणारी जी असंप्रज्ञात समाधि ती आत्मसाक्षात्कारास कशी कारण होणार, हें आम्हांस समजत नाहीं. कारण त्या अवस्थेंत चित्त गाढ निद्रेप्रमाणें वृत्ति रहित असतें. यावर आमचें एवढेंच म्हणणें आहे कीं, असंप्रज्ञात समाधिकालीं चित्त जरी वृत्तिशून्य असतें तरी स्वतःसिद्ध आत्मदर्शनाचें निवारण करितां येत नाहीं. म्हणूनच श्रेयोमार्गांत—

आत्मानात्माकारं स्वभावतोऽवस्थितं सदा चित्तम् ॥
आत्मैकाकारतया तिरस्कृतानात्मदृष्टि विदधीत ॥ १ ॥

असें म्हटलें आहे. " चित्त स्वभावतःच सर्वदां आत्माकार व अनात्माकार होऊन राहिलेलें असतें. यास्तव त्यास केवल आत्माकार करून अनात्माकारवृत्ति नाहींशी करावी, " असा या वचनाचा सारांश आहे. ज्याप्रमाणें मातीचें मडकें उत्पन्न होता होतांच आकाशानें परिपूर्ण असें स्वभावतःच उत्पन्न होतें; व पाणी, तांदुळ इत्यादिकांनीं त्यास मागाहून म्हणजे तें तयार झाल्यावर मनुष्याच्या प्रयत्नानें भरतां येतें, तसेंच त्यांतील पाणी, तांदुळ इत्यादि मागून घातलेले पदार्थ काढूनही टाकितां येतात; पण आकाशास काढून टाकितां येत नाहीं; फार काय, पण त्या मडक्याचें तोंड जरी झांकून ठेविलें तरी आंतील आकाश जसेंच्या तसेंच हवे तितके दिवस रहातें, त्याप्रमाणें चित्त उत्पन्न होतां होतांच तें चैतन्यपूर्ण उत्पन्न होतें. तें उत्पन्न झाल्यावर, मूशींत ओतलेल्या ताम्रादिरसाप्रमाणें, भोगास कारण होणाऱ्या धर्माधर्मानुरूप, घट, पट, रूप, रस, दुःख इत्यादि वृत्तिरूप होतें. पण त्यांतील रूपरसादि अनात्माकाराचें जरी निवारण करितां आलें तरी स्वाभाविक चिदाकाराचें निवारण करितां येणें शक्य नाहीं. यास्तव निरोधसमा-

धीच्यायोगानें वृत्तिरहित झालेल्या, केवल संस्कार अवशिष्ट राहिल्यामुळें सूक्ष्म झालेल्या व चैतन्य–आत्म्याच्या अभिमुख झाल्यामुळें एकाग्र झालेल्या चित्तानें आत्म्याचा साक्षात्कार निर्विघ्नपणें येतो. ह्याच अभिप्राय मनांत धरून वार्तिककार श्रीसुरेश्वराचार्य व सर्वानुभव योगी यांनीं “ धर्म व अधर्म यांच्या योगानें चित्त सुखदु:खादिरूप होतें; पण त्यानें आत्मरूप होणें हें स्वाभाविक आहे. अर्थात् त्याला सुखादि रूप होण्यास धर्मादिकांची जशी अपेक्षा असते तशी हेतुरहित व स्वत:सिद्ध आत्मरूप होण्यास कोणत्याही निमित्ताची अपेक्षा नसते. ज्याच्या सर्व वृत्ति अति शांत झाल्या आहेत असें चित्त परमानन्दास व्यक्त करीत असतें. योग्यास प्रिय असलेली असंप्रज्ञात समाधि हीच होय. ” असें ह्मटलें आहे. असो याप्रमाणें आत्मदर्शन जरी स्वत:सिद्ध असलें तरी अनात्मदर्शनाचें निवारण करण्याकरितां निरोधाचा अभ्यास केला पाहिजे. ह्मणूनच–

आत्मसंस्थं मनःकृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ।

ह्मणजे मन आत्म्यामध्यें स्थिर करून कांहीं चिंतन करूं नये, असें भगवानांनीं अर्जुनास सांगितलें आहे.

योगशास्त्र चित्ताची चिकित्सा करणाऱ्या समाधीचें, तिच्या साधनाचें व अवांतर सांसारिक फलाचें प्रतिपादन करण्याकरितांच प्रवृत्त झालेलें असल्यामुळें निरोध समाधींत आत्मदर्शन होतें, असें त्यांत स्पष्टपणें सांगितलेलें नाहीं, पण पर्यायानें सांगितलें आहे. तें कसें ह्मणून ह्मणाल तर सांगतों. त्या शास्त्राच्या “ योगश्चित्तवृत्तिनिरोधः ” या सूत्रांत “ चित्तवृत्तींचा निरोध हाच योग होय ” असें सांगून, त्याच्या पुढच्याच “ तदा द्रष्टुःस्वरूपेऽवस्थानम् ” या सूत्रांत “ वृत्तींचा निरोध झाला असतां, द्रष्टा आत्मा स्वरूपानें रहातो ” असें ह्मटलें आहे. यद्यपि विकारशून्य द्रष्टा सर्वदां स्वरूपांतच असतो तरी वृत्ति उत्पन्न होऊं लागल्या असतां व त्यांत चैतन्याची छाया प्रतिबिंबित झाली असतां वृत्ति व आत्मा यांच्या भिन्नत्वाचें भान नाहीसें होतें व त्यामुळें आत्मा वृत्तिरूप–ह्मणजेच स्वरूपीं स्थित नसल्यासारिखा–भासतो. पतंजलींनींही “ वृत्तिसारूप्यमितरत्र ” म्हणजे निरोधातिरिक्त कालीं तो द्रष्टा वृत्तिस्वरूप होतो, या सूत्रांत तेंच सांगितलें आहे. योगशास्त्राच्या तिसऱ्या विभूति पादांतही असेंच सांगितलें आहे. असो; याप्रमाणें निरोधसमाधीच्या योगानें निरुपाधिक त्वंपदार्थाचा साक्षात्कार झाला असतां,

तो शुद्ध आत्माच ब्रह्म आहे, असें प्रत्यक्ष अनुभवास आणून देण्याकरितां उपनिषदांतील महावाक्यांच्या योगानें ब्रह्मविद्यानामक आणखी एक वृत्ति उत्पन्न होते. पण शुद्ध त्वंपदार्थाचें साक्षात् दर्शन होण्यास निरोध समाधि हा एकच उपाय आहे, असें समजूं नये. तर विवेक हाही एक त्याचा उपाय आहे, असें जाणावें. कारण विवेकाच्या योगानें चित् व जड यांचें पृथक्करण केलें असतां, त्याचा साक्षात्कार होणें शक्य आहे. म्हणूनच श्रीवसिष्ठांनीं—

> द्वौ क्रमौ चित्तनाशस्य योगो ज्ञानं च राघव ।
> योगस्तद्वृत्तिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥ १ ॥
> असाध्यः कस्यचिद्योगः कस्यचिज्ज्ञाननिश्चयः ।
> प्रकारौ द्वौ ततो देवो जगाद परमेश्वरः ॥ २ ॥

रामा, चित्तनाशाचे योग व ज्ञान असे दोन उपाय आहेत. चित्तवृत्तिनिरोध हा योग व यथार्थ दर्शन हें ज्ञान होय १. कोणास योग असाध्य असतो, कोणाला ज्ञाननिश्चय असाध्य असतो. म्हणून देवाधिदेव परमेश्वरानें दोन प्रकार सांगून ठेविले आहेत २. असें रामचंद्रास सांगितलें आहे. आतां यावर कोणी ह्मणेल कीं, विवेकाचेंही योगामध्येंच पर्यवसान होतें. कारण आत्मदर्शनसमर्थ केवळ आत्माकार झालेली चित्ताची एकाग्रवृत्ति क्षणिक संप्रज्ञात समाधिरूपच असते. तर तें बरोबर आहे. पण संप्रज्ञात व असंप्रज्ञात समाधीमध्यें स्वरूपतः व साधनतः फार वैलक्षण्य आहे. एक वृत्तियुक्त असते, व दुसरी वृत्तिरहित असते, हें प्रसिद्ध असल्यामुळें, त्यांचा स्वरूपभेद तर स्पष्ट आहे. आतां साधनभेद कसा आहे, तो पहा. धारणा, ध्यान व समाधि हीं तीन साधनें संप्रज्ञात समाधीच्याच जातीचीं असल्यामुळें तिचीं तीं अंतरंग साधनें होतात. पण तीं वृत्तिरहित असंप्रज्ञात समाधीच्या जातीचीं नसल्यामुळें तिचीं बहिरंग साधनें आहेत. आतां तीं जर असंप्रज्ञात समाधीच्या जातीचींच नव्हेत तर तीं तिचीं बहिरंग साधनें तरी कशीं ? ह्मणून ह्मणाल, तर सांगतों. अनेक प्रकारच्या अनात्म वृत्तींचें निवारण करण्यास त्यांचा फार उपयोग होतो. ह्मणून धारणा-ध्यानादि साधनें या दुसऱ्या समाधीचीं बहिरंग साधनें आहेत, असें म्हटल्यास कांहीं विरोध येत नाहीं. म्हणूनच पतंजलींनीं " श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् " असें म्हटलें आहे. याचा सविस्तर भावार्थ सांगतों:—याच्या पूर्वींच्या सूत्रांत देवादि कांहीं

८–५८६–२०००

विशिष्ट प्राण्यांस जन्मतः समाधिसिद्धि होते, असें सांगून या सूत्रांत मनुष्यांस समाधीची प्राप्ति कशी होते तें सांगत आहेत. मला हा योगच परम पुरुषार्थ मिळवून देणार असा विश्वास ठेवणें, ही श्रद्धा योगाच्या उत्कर्षाचें श्रवण केल्यानें ती उत्पन्न होते. योगाच्या उत्कर्षाचें वर्णन—श्रीभगवानांनीही "तपस्व्यांहून योगी अधिक आहे; ज्ञानी पुरुषांहूनही तो अधिक आहे. कर्मी पुरुषांहूनही तो श्रेष्ठ आहे. यास्तव, हा अर्जुना, तूं योगी हो" असें ह्मणून—केलें आहे. योग हें उत्तमलोकप्राप्तीचें साधन असल्यामुळें कृच्छ्रचांद्रायणादि तपाहून व ज्योतिष्टोमादि कर्मांहून अधिक आहे. आणि ज्ञानाचें अंतरंग साधन असल्यामुळें व चित्ताच्या विश्रांतीस कारण होणारा असल्यामुळें तो ज्ञानाहूनही श्रेष्ठ आहे असें येथें ह्मटलें आहे. असो; अशाप्रकारचें वर्णन ऐकलें असतां योगाविषयीं श्रद्धा उत्पन्न होते व ती दृढ झाली असतां उत्साह (वीर्य) उद्भवतो. कांहीं झालें तरी मी योग संपादन करणारच; अशा निग्रहास उत्साह किंवा वीर्य ह्मणतात, अशा उत्साहामुळेंच अनुष्ठान करण्यास योग्य व अवश्य असलेल्या योगांगांचें स्मरण होतें. साधनानुष्ठानामुळें समाधिसिद्धि होते, आणि समाधीच्या योगानें आत्मप्रसाद झाला असतां ऋतंभरा प्रज्ञा उत्पन्न होते. याविषयीं "ऋतंभरा तत्र प्रज्ञा" हें सूत्र प्रमाण आहे. समाधीच्या उत्कर्षामुळें उत्पन्न होणारा आत्मप्रसाद झाला असतां "ऋतं" म्हणजे सत्य, वस्तूचें यथार्थस्वरूप. त्यास "भरा" प्रकाशित करणारी प्रज्ञा उद्भवते. ती ऋतंभरा असते, याविषयीं "श्रुतानुमानप्रज्ञाभ्यामन्यविषयाविशेषार्थत्वात्" या सूत्रांत उपपत्ति सांगितली आहे. सूक्ष्म, आड असलेल्या व दूर असलेल्या वस्तूंचे ठायीं अयोग्यांची इंद्रियें प्रवृत्त होत नाहींत. तर आगम (शास्त्र) व अनुमान यांवरून त्यांस त्यांचें ज्ञान होतें. पण शास्त्र व अनुमान यांवरून उत्पन्न झालेल्या त्या प्रज्ञा सामान्य वस्तुज्ञानच करून देतात. पण सर्व वस्तूंमध्यें सारखेंच प्रवृत्त होणारें हें योग्यांचें प्रत्यक्षज्ञान विशेषवस्तुविषयक असल्यामुळें त्याला ऋतंभरत्व असतें. हें योगिप्रत्यक्षही असंप्रज्ञातसमाधीचें बहिरंग साधन आहे, असें सिद्ध करण्याकरितां "तजःसंस्कारोऽन्यसंस्कारप्रतिबन्धी" या सूत्रांत त्याचें उपकारित्व सांगितलें आहे. ह्मणजे या योगिप्रत्यक्षापासून झालेला संस्कार दुसऱ्या सर्व संस्कारांस प्रतिबंध करितो. ह्मणून तें प्रत्यक्ष असंप्रज्ञातसमाधीवर उपकार करणारें आहे. आणि त्यामुळेंच तें त्याचें बहिरंग साधन आहे, असें सिद्ध होतें.

असो; येथवर या दुसऱ्या प्रकारच्या समाधीचें बहिरंग साधन सांगितलें. आता तिचें अंतरंग साधन सांगतों. या बहिरंग साधनभूत प्रज्ञेचा निरोध करणें, हेंच तिचें अंतरंग साधन आहे. ही समाधि सुषुप्तीप्रमाणें साक्षि चैतन्याच्या अनुभवास येते. पण त्यांत सर्व वृत्तींचा निरोध होत असल्यामुळें ती गाढ निद्राच आहे, असें ह्मणणें योग्य नव्हे. कारण, सुषुप्तींतील मन लीन होतें व या समाधींतील मन लीन न होतां केवल निरुद्ध अवस्थेंत रहातें. गौडपादाचार्यांनींही असेंच सांगितलें आहे. मांडुक्य उपनिषदांतील प्रत्यक्ष वचनाचा त्यांनीं आपल्या कारिकेंत असा सारांश घेतला आहे.–" प्राज्ञ व तुर्य या दोघांचेंही द्वैताग्रहण सारिखेंच असतें. ह्मणजे सृष्टींतील हे अनेक पदार्थ सुषुप्तीच्या अभिमानी आत्म्यास जसे दिसत नाहींत तसेच ते समाधिस्थ आत्म्यासही दिसत नाहींत. पण प्राज्ञ वासनामय बीज–निद्रेनें युक्त असतो व तुर्य तिनें युक्त नसतो. जाग्रदवस्थेचा अभिमानी विश्व व स्वप्नावस्थेचा अभिमानी तैजस विपरीतग्रहणरूप स्वप्न व तत्त्वाचें अज्ञानरूपी निद्रा यांनीं युक्त असतात. पण प्राज्ञ केवल निद्रेनें युक्त असतो. द्वैतग्रहणरूपी विपरीत दर्शन ( स्वप्न ) त्याच्या ठायीं नसतें. तुर्याचा ज्यांना अनुभव आलेला असतो ते स्वप्न व निद्रा यांतील कांहींच पहात नाहींत. तत्त्वाचें अज्ञान जाग्रदादि तिन्ही अवस्थेंत असतें. विपरीत ग्रहण जाग्रत् व स्वप्न या दोनच अवस्थेंत होतें. आणि तुर्य–अवस्थेंत त्यांतील कांहींएक नसतें. कारण विद्येच्या ( आत्मसाक्षात्काराच्या ) योगानें अज्ञान व अज्ञानकार्य ( विपरीत ज्ञान ) नष्ट झाल्यावरच अद्वैत् वस्तूचा पूर्ण अनुभव येत असतो. "

यावर कोणी ह्मणेल कीं, समाधि व सुषुप्ति यांमध्यें जरी असा मोठा भेद असला तरी ज्याला तत्त्वाचा साक्षात्कार झाला आहे, त्यास जीवन्मुक्तीकरितां समाधीची कांहीं अपेक्षा नाहीं. कारण त्याच्या रागद्वेषादि क्लेशरूप बंधांची निवृत्ति सुषुप्तीनेंही होईल. ज्याला तत्त्वदर्शन झालेलें नसून तें व्हावें असें वाटत असेल, त्यानें मात्र समाधीचा अभ्यास केला ह्मणजे झालें. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, सुषुप्तीच्यायोगानें क्लेशनिवृत्ति होईल, अशी आशा करणाऱ्या त्यांस आम्ही असें विचारितों कीं, प्रत्यहीं आपोआप येणारी व कांहीं काल रहाणारी झोंप बंधनिवृत्ति करील, असें तुम्ही म्हणतां, कीं अभ्यासाच्या योगानें निरंतर लागणारी झोंप बंधनिवृत्ति करील असें समजतां ? यांतील दुसरा पक्ष स्वीकाराल तर कितीही अभ्यास केला तरी, निरंतर झोंप लागणें शक्य नाहीं. कारण सुषुप्ति ही

जाग्रत् व स्वप्न अवस्थेस कारण होणारें कर्म क्षीण झालें असतां आपोआप उद्भवते व पुनरपि कर्मोदय झाला असतां ती क्षीण होते, असा अनुभव व शास्त्रकथन आहे. बरें, पहिला पक्ष स्वीकाराल तर आमचा असा प्रश्न आहे कीं, रोजची सुषुप्ति त्या सुषुप्तींतीलच क्लेशांचा क्षय करिते कीं, अन्य अवस्थांतील क्लेशांचा सुद्धां क्षय करूं शकते ? यांतील पहिला पक्ष घेतां येणार नाहीं. कारण सुषुप्तींत मुळीं बंधच नसतात. फार काय, पण मूढांना सुद्धां त्या अवस्थेंत क्लेश होत नाहींत. कारण, जर झाले असते तर त्यांस आयास होणें अगदीं साहजिक होतें. पण ते होत असल्याचा अनुभव येत नाहीं. बरें, दुसरा पक्ष स्वीकाराल तरी अडचण येणारच. कशी ती पहा— सुषुप्ति अन्य अवस्थांतील क्लेशांस क्षीण करूं शकते, असें ह्मणणेंच अयोग्य आहे. कारण एका कालच्या सुषुप्तीनें अन्य कालीन क्लेशांस क्षीण करणें शक्य नाहीं. शिवाय शक्याशक्यतेचा विचार न करितां आग्रहानें तसें होतेंच ह्मणून म्हटल्यास मूर्खांच्या जाग्रदादि अवस्थांतील क्लेशांचाही क्षय त्यांच्या सुषुप्तीच्या योगानें होतो, असें ह्मणावें लागेल. एवंच विद्वान् व अविद्वान् यांच्यामध्यें कांहींच अंतर रहाणार नाहीं. तस्मात् ज्याला तत्त्वाचा साक्षात्कार झाला आहे, अशा तत्त्ववेत्त्यासही क्लेशक्षयार्थ असंप्रज्ञात समाधीची अपेक्षा असते. त्या समाधीची गाय, म्हैस, इत्यादिकांप्रमाणें वाङ्निरोध ही प्रथम भूमि; बालमूढादिकांप्रमाणें मनावांचून असलेली जी निर्मनस्त्व भूमि ती दुसरी; तंद्रेप्रमाणें अहंकाररहित्य ही तिसरी व सुषुप्तीप्रमाणें महत्तत्त्वराहित्य ही चवथी भूमि होय. या चार भूमीस उद्देशून वरील भगवद्वचनांत “ हळु हळु ” असें म्हटलें आहे.

त्याच भगवद्वचनांतक धैर्ययुक्त बुद्धीनें ” असें म्हटलें आहे. अर्थात् शांतीचें धैर्ययुक्त बुद्धि हें साधन सांगितलें आहे. कारण महत्, अहंकार, मन व वाणी हीं स्वभावतःच तीव्र वेगानें बाहेर जात असतात. यास्तव मोठ्या वेगानें वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहास अडवावयाचें असल्यास जसें अतिशय धैर्य लागतें, त्याचप्रमाणें त्यां (अहंकारादिकां) चा निरोध करावयाचा झाल्यासही मोठेंच धैर्य लागतें. येथील बुद्धि शब्दाचा अर्थ विवेक असा करावा. म्हणजे पूर्व भूमि जिंकिली कीं नाहीं याचा विचार करून तिचा विजय झाला असें समजून आल्यावर उत्तर भूमीच्या विजयास प्रवृत्त व्हावें. पण तिचा पूर्णपणें विजय झालेला नसल्यास पुनरपि तिचाच अभ्यास करावा. तात्पर्य

अशा विवेकपूर्वक योगानुष्ठान करावें. "मन आत्म्यामध्यें अगदीं स्थिर करून" इत्यादि वाक्यानें चतुर्थ भूमीचा अभ्यासही भगवानांनीं सांगितला आहे. याविषयीं श्रीगौडपादाचार्यांनीं असें म्हटलें आहे.—

काम व भोग यांच्या योगानें विक्षिप्त झालेल्या मनाचें उपायानें नियमन करावें. त्याचप्रमाणें लयामध्यें सुप्रसन्न झालेल्या चित्ताचाही निग्रह करावा. कारण जसा काम तसाच लय होय. म्हणजे कामाप्रमाणेंच लय म्हणजे निद्रा ही आत्मज्ञानास प्रतिबंध करणारी आहे. सर्व दुःख आहे, याचें स्मरण ठेवून मनास कामभोगांपासून निवृत्त करावें आणि सर्व अज म्हणजे वस्तुतः जन्म होण्यास अयोग्य आहे, याचें स्मरण ठेवून साधकानें हें उत्पन्न झालें आहे, या भावनेनें जगाकडे पाहूं नये. मन अज्ञानांत लीन होऊं लागलें असतां त्यास जाग्रत् करावें व तें विक्षिप्त झालें असतां त्यास शांत करावें. तें रागादि–कषायसंपन्न झाल्यास लागलेंच ओळखून त्यास प्रतिबंध करावा व सम अवस्थेस प्राप्त झाल्यावर त्यास चाळवूं नये. त्या सम अवस्थेंतही सुखाचा आस्वाद घेऊं नये. बुद्धीच्या योगानें निःसंग व्हावें. निश्चल व निश्चर चित्त प्रयत्नानें एक करावें. ज्यावेळीं चित्त लीन झालेलें नसतें, व विक्षिप्तही नसतें आणि तें कोणतेंही लिंग व आभास यांनीं रहित असतें तेव्हां तें ब्रह्मरूप झालें आहे, असें समजावें." इत्यादि.

या गौडपादीय वर्णनाचा मथितार्थ असाः—लय, विक्षेप, कषाय व समप्राप्त अशा चित्ताच्या चार अवस्था आहेत. विषयांपासून व्यावृत्त केलेलें चित्त अज्ञानांत लीन होऊं लागतें असा सामान्य नियम आहे. करितां त्यास लीन होऊं देऊं नये. तर लयाच्या कारणांचा निरास करून त्यास चांगलें जागें करावें. पूर्ण झोंप न येणें, अजीर्ण, पुष्कळ भोजन व श्रम हीं निद्रे (लया) चीं कारणें आहेत. पण लयापासून उठविलेलें चित्त रोजच्या जाग्रतीच्या अभ्यासामुळें जर काम व भोग यांच्याकरितां विक्षिप्त झालें तर विवेकी जनांस ठाऊक असलेल्या भोग्य वस्तूंतील दोषांचें अनुस्मरण करून, व शास्त्रप्रसिद्ध जन्मादिरहित अद्वितीय ब्रह्मतत्त्वाचें स्मरण करून भोग्य वस्तूकडे ध्यान न देतां वारंवार चित्तास विक्षेपरहित करावें. कषाय म्हणजे तीव्र चित्तदोष. अर्थात् तीव्ररागद्वेषादिकांची वासना. तिच्या योगानें व्याप्त झालेलें चित्त केव्हां केव्हां समाहित चित्ताप्रमाणें लयविक्षेपरहित व दुःखांमध्यें एकाग्र होऊन रहातें. अशा त्या चित्तास ओळखावें. म्हणजे ही

समाहित अवस्था नव्हे तर ही कषाय—अवस्था आहे, असें जाणून लयविक्षेपाप्रमाणें त्याचाही प्रतीकार करावा. समशब्दाचा ब्रह्म असा येथें अर्थ समजावा. कारण गीतेंतही ब्रह्मास "सम" असें ह्मटलें आहे. लय, विक्षेप व कषाय यांचा परिहार झाला असतां चित्त समब्रह्माशीं मिळून जातें. त्या समप्राप्त चित्तास हा कषाय आहे किंवा लय आहे अशा भ्रांतीनें चाळवूं नये. तर सूक्ष्म बुद्धीनें लय व कषाय यांच्या प्राप्तीचें विवेचन करून समप्राप्तीमध्येंच त्यास दीर्घकाल स्थिर राहूं द्यावें. ह्मणजे ब्रह्मस्वरूपभूत परमानन्द चांगल्या रीतीनें व्यक्त होतो; याच सुखास भगवानांनीं बुद्धिग्राह्य व अतींद्रिय ह्मटलें आहे. श्रुतीनेंही "समाधीच्या योगानें ज्याच्यावरील मल पार निघून गेला आहे व आत्म्यामध्यें जें स्थिर झालें आहे, अशा चित्तास जें सुख होतें, त्याचें वर्णन वाणीनें करितां येत नाहीं, तर स्वतः अंतःकरणानेंच त्याचें ग्रहण होतें." असें ह्मटलें आहे. पण यावर कोणी असें विचारील कीं—भगवानांनीं व श्रुतीनें तें सुख बुद्धिग्राह्य आहे, असें ह्मटलें आहे व श्रीगौडपादाचार्यांनीं "त्या अवस्थेंत सुखाचा आस्वाद घेऊं नये" असें सांगितलें आहे. तेव्हां या विरोधी वचनांची एकवाक्यता कशी करावयाची?—तर त्याचें उत्तर असें—चित्ताच्या निरोधामुळें होणारें सुख बुद्धिग्राह्यच आहे. आचार्यांनीं त्याचा निषेध केलेला नाहीं व तो करितां येणारही नाहीं. परंतु समाधीस निरोध करणाऱ्या व्युत्थानरूप परामर्शाचा त्यांनीं निषेध केला आहे. ह्मणजे ज्याप्रमाणें उन्हाळ्याच्या दिवसांत दोनप्रहरीं भागीरथींत बुडी मारलेल्या पुरुषास त्यावेळीं होत असलेलें शैत्यसुख सांगतां येत नाहीं; तर पाण्यावर डोकें काढिल्यानंतरच तें सांगतां येतें अथवा ज्याप्रमाणें सुषुप्तीमध्यें अतिसूक्ष्म अविद्यावृत्तीच्या योगानें अनुभावास येणारें स्वरूपसुख ही त्यावेळीं सविकल्पक अंतःकरणवृत्तिज्ञानानें ग्रहण करितां येत नाहीं, तर जागें झाल्यावर स्मृतीच्या योगानें त्याचा स्पष्ट परामर्श होतो, त्याप्रमाणें समाधींत वृत्तिरहित किंवा संस्कारमात्रशेष असल्यामुळें सूक्ष्म झालेल्या चित्ताच्या योगानें स्वरूपानंदाचा अनुभव येतो व वरील श्रुति आणि भगवद्वचन यांत त्यासच बुद्धिग्राह्य म्हटलें आहे. मी या अवर्णनीय समाधिसुखाचा अनुभव घेतला, असें नुस्तें मनांत आणणें, ही सुद्धां व्युत्थित अवस्था आहे. कारण अंतःकरणाच्या सविकल्प वृत्तींवांचून असा परामर्श होणें शक्य नसतें. यासच श्रीगौडपादाचार्यांनीं 'सुखास्वाद' असें ह्मटलें आहे, व त्याचाच त्यांनीं निषेध केला आहे. आणि हा आपला अभिप्राय व्यक्त करण्याकरितां "निःसंगः प्रज्ञया भवेत्" असें लागलेंच पुढें ह्मटलें आहे.

प्रकृष्ट (ह्मणजे सविकल्पक) ज्ञानास प्रज्ञा ह्मणतात. अशा प्रज्ञेशीं संग ठेवूं नये. अथवा वर सांगितलेल्या धैर्ययुक्त बुद्धीसच येथें प्रज्ञा असें म्हटलें आहे, असें समजावें. त्या प्रज्ञारूप साधनानें सुखाचा आस्वाद घेणं, त्याचें वर्णन करणें, इत्यादिरूप आसक्ति वर्ज करावी. समाधीमध्यें ब्रह्मानंदांत निमग्न झालेलें चित्त जर एकादे वेळीं सुखास्वाद घेण्याकरितां अथवा शीत, वात, मशक (चिलटें) इत्यादिकांच्या उपद्रवानें चंचल झालें तर तें पुन: निश्चल होईल अशा रीतीनें त्याचें ब्रह्मांशीं ऐक्य करावें. चित्ताच्या निरोधाकरितां प्रयत्न करणें हाच त्याचा उपाय आहे. सारांश लय, विक्षेप, कषाय व सुख-स्वाद यांनीं रहित असलेलें चित्त ब्रह्ममध्यें निर्विघ्नपणें स्थिर होतें. या अभि-प्रायानेंच कठोपनिषदांत "जेव्हां पंच ज्ञानेंद्रियें मनासह स्थिर होतात व बुद्धिही चेष्टा करीत नाहीं, तेव्हां त्या अवस्थेस परम गति असें ह्मणतात. त्या स्थिर इंद्रिय धारणेस योग असें ह्मणतात. त्यावेळीं पुरुष सावध रहातो. कारण तसें न करितां जर त्यानें योगाची उपेक्षा केली तर इंद्रियवृत्तीचा उदय होतो व त्याचें अनुष्ठान केल्यास वृत्तींचा लय होतो" असें ह्मटलें आहे. पतंजलींनींही "चित्तवृत्ति निरोध" हें योगाचें स्वरूपलक्षण केलें आहे. पण वृत्ति अनंत असल्यामुळें त्या सर्वांचा निरोध होणें अशक्य आहे असें कोणास वाटेल ह्मणून त्या वृत्तींचा इयत्ता दाखविण्याकरितां "त्या क्लिष्ट व अक्लिष्ट वृत्ति पांच प्रकारच्या आहेत" असें पुढें म्हटलें आहे. क्लेशरूप रागद्वेषादि आसुर वृत्ति क्लिष्ट वृत्ति आहेत व रागादिरहित दैवीवृत्ति अक्लिष्ट वृत्ति होत. त्या दोन्ही प्रकारच्या वृत्तींचा प्रमाणादि पांच वृत्तींमध्येंच अंतर्भाव होत असतो. त्यांतील क्लिष्ट वृत्तींचाच मात्र निरोध केला म्हणजे झालें, असें कोणास वाटेल; पण तें वाटूं नयें म्हणून क्लिष्ट वृत्तींबरोबर अक्लिष्ट वृत्तींचाही योगसूत्रांत उल्लेख केला आहे. त्या वृत्तींचीं नावें व लक्षणें सांगण्याकरितां पतंजलींनीं सहा सूत्रें केलीं आहेत. त्याचा अक्षरार्थ असा:--

१ प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा व स्मृति या पांच वृत्ति आहेत. २ प्रत्यक्ष, अनुमान व आगम (शब्द) अशीं तीन प्रमाणें आहेत. ३ वस्तूच्या स्वरूपांत नसलेलें मिथ्याज्ञान हाच विपर्यय आहे. (जसें रज्जूच्या स्वरूपांत नसलेलें सर्पाचें मिथ्याज्ञान). ४ शब्दज्ञानाच्या मागून जाण्याचें ज्याचें शील असून वस्तूच्या तशाच स्वरूपाची अपेक्षा न करणारा जो निश्चय तो विकल्प होय. (जसें पुरुषाचें चैतन्य; राहूचें शिर; येथें कृष्णाची मुरली या वाक्यांतील कृष्ण-

शब्दाप्रमाणेंच जरी पुरुष व राहू यांची षष्ठी विभक्ति आहे तरी चैतन्य व शिर हें त्यांचें क्रमानें स्वरूप असल्यामुळें तो विकल्प आहे ). ५ विषयाभावाचा अनुभव हाच जिचा आश्रय आहे तिला निद्रावृत्ति म्हणतात. ६ प्रमाणतः अनुभविलेल्या विषयांचा जो संस्कारद्वारा बुद्धीवर होणारा आरोह तीच स्मृति होय. असो; या पांची प्रकारच्या वृत्तींचा निरोध कसा होतो, तेंही " अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें त्यांचा निरोध होतो " असें म्हणून, सांगितलें आहे. ज्याप्रमाणें तीव्रवेगानें युक्त असलेल्या नदीच्या वेगास धरणाच्या योगानें अडकवून धरून नंतर तिरकस पाट काढून त्यांतून त्यांस शेताकडे नेतात; त्याप्रमाणें वैराग्याच्या योगानें चित्तनदीच्या विषयप्रवाहास प्रतिबंध करून समाधीच्या अभ्यासानें अति शांत प्रवाह निर्माण करिता येतो. मंत्रांचा जप, देवतांचें ध्यान इत्यादि क्रियांचा अभ्यास करितां येतो. कारण अभ्यास म्हणजे वारंवार तेंच तें करणें. पण सर्व व्यापारांचा निरोध करणें ही जी समाधि तिचा अभ्यास कसा करितां येईल ? म्हणून कोणी म्हणेल; यास्तव " तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः " असें पतंजलींनीं सूत्र केलें आहे. त्याचा अर्थ असा:—स्थिति म्हणजे निश्चलता अथवा निरोध, व यत्न म्हणजे उत्साह. स्वभावतःच बाहेर जाण्याचें ज्याचें शील आहे अशा या चित्तास कांहीं झालें तरी भी निश्चल करणार; अशा प्रकारचा उत्साह पुनः पुनः धरणें यासच अभ्यास म्हणतात. पण हा आतां सुरू झालेला अभ्यास, स्वतः दृढ झालेला नसतांना, अनादिकालापासून प्रवृत्त झालेल्या वासनांचा पराभव कसा करूं शकेल, असें कोणास वाटूं नये, म्हणून " स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कार-सेवितो दृढभूमिः " हें सूत्र केलें आहे. व्यावहारिक लोक " वेद तर चारच आहेत. पण ते शिकण्याकरितां माझा मुलगा गेला, त्यास आज पांच दिवस झाले, तरी अजून तो परत येत नाहीं हें काय ? " या एका मूर्ख वचनाचा नेहमीं दृष्टांत देत असतात. त्याप्रमाणें जो योगी वेडा असतो तो कांहीं दिवसांनीं किंवा महिन्यांनीं योगसिद्धि व्हावी अशी इच्छा धरितो. शाहणा असा उतावीळ कधींही होत नाहीं. कारण अनेक वर्षें किंवा जन्म एक-सारखा अभ्यास केल्यावांचून योगसिद्धि होत नाहीं, हें त्यास पूर्णपणें अवगत असतें. भगवानांनींही " अनेक जन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिं " असें म्हटलें आहे. शिवाय योगाभ्यासाचें दीर्घकाल सेवन करूनच चालत नाहीं; तर त्याचा अभ्यास सतत केला पाहिजे. कारण तसें न करितां केवल दीर्घ-

काल अभ्यास करावयाचा एवढेंच ठरवून प्रत्यहीं प्रहरभर अभ्यास करून पुनः व्यवहार करूं लागल्यास अथवा कांहीं वेळ योगाभ्यास, कांहीं वेळ व्यवहार, पुनः कांहीं वेळ अभ्यास कांहीं वेळ व्यवहार, असा क्रम ठेविल्यास अभ्यासामुळें उत्पन्न होणाऱ्या संस्कारांस पुढचे व्युत्थानकालीन संस्कार तुच्छ करून सोडतील व त्यामुळें पुढें पाठ व मागें सपाट अशी अवस्था होईल. यास्तव योगाभ्यास दीर्घकाल सतत व आदरानें केला पाहिजे. तो आदरानें न केल्यास लय, विक्षेप, कषाय व सुखस्वाद यांचा परिहार होत नाहीं. सारांश या तिन्ही गोष्टींकडे ध्यान देऊन अभ्यास केल्यास समाधि दृढ होते. विषयवासना किंवा दुःखवासना यांच्या योगानें चित्त चलायमान न होणें, हेंच समाधीचें दृढभूमित्व होय. ह्मणूनच भगवानांनीं "ज्या अवस्थेंत स्थित झालेला पुरुष मोठ्या थोरल्या दुःखाकडूनही चंचल केला जात नाहीं, त्या अवस्थेस योग, असें समजावें" असें ह्मटलें आहे. या श्रीगीतावचनाप्रमाणेंच कचाच्या वृत्तांतावरूनही योगाहून दुसरा कोणताही लाभ अधिक नाहीं, हें समजतें. वसिष्ठानीं त्याचें असें वर्णन केलें आहे.—

"एकदां ज्याचें मन संतुष्ट झालें आहे, असा कच समाधीस सोडून उठला असतां, एकांतांत सद्गदित वाणीनें असें ह्मणालाः—मी काय करूं? कोठें जाऊं? काय घेऊं व कशाचा त्याग करूं? महाप्रलयांतील जलाप्रमाणें आत्म्याच्यायोगानें हें सर्व परिपूर्ण आहे. सबाह्यभ्यंतर देहांत, खालीं, वर, व दिशेंत, आत्माच पसरला आहे. इकडे आत्मा आहे व येथें आत्मा आहे. जगांत आत्म्यावांचून कांहीं नाहीं. माझ्यामध्यें जें आहे तेंच सर्व वस्तूंत आहे व माझ्यामध्यें जें नाहीं तें कोठेंही नाहीं. सर्वत्र ज्ञानमय आत्माच जर पसरला आहे तर मी अणखी कशाची इच्छा करूं? शास्त्रांमध्यें सात कुल पर्वत सांगितले आहेत पण ते व इतर सर्वही पर्वत अमर्याद ब्रह्मरूपी निर्मल समुद्राचे फेंस आहेत. चैतन्यरूपी सूर्याच्या महातेजामुळें ही मृगजलासारखी जगाची शोभा भासत आहे." ६०

मोठ्या थोरल्या दुःखाच्या योगानेंही योगी चंचल होत नाहीं, हें भगवानाचें म्हणणें योगवासिष्ठांतील शिखिध्वजराजाच्या त्रिवर्षसमाधीच्या वृत्तांतावरून चांगलें ध्यानांत येतें. त्याचें थोडेंसें दिग्दर्शन येथें करितों.—

"तेथें चुडालेनें निर्विकल्पसमाधिस्थ राजास पाहिलें व यास मी आतां परम पदापासून ढळवितें असें ती ह्मणाली. तिनें भयंकर सिंहनाद ( आक्रोश )

केला. पण त्याच्या योगानें तो समाधीपासून ढळला नाहीं. तेव्हां तिनें व्याघ्र–सिंहादि हिंस्र पशूंसही भय वाटेल एवढ्या मोठ्यानें अनेक सिंहनाद केले. पण, हे रामा, तो शिखिध्वज राजा समाधीस सोडून उठला नाहीं. शेवटीं तिनें त्याला जोरानें हापटिलें; पण तो महात्मा चंचल झाला नाहीं." इ०

प्रह्लादाचें वर्तमानही जवळ जवळ असेंच आहे.—

" असा विचार करीत शूर प्रह्लाद परमानंदरूप निर्विकल्पसमाधीस प्राप्त झाला. हजारों वर्षे तो त्याच अवस्थेत होता. पण त्याचें अंग पूर्वीप्रमाणेंच पुष्ट होतें. तो चित्राप्रमाणें दिसत असे. दीर्घकालानें भगवान् त्याच्या समोर आला व महात्म्या, सावध हो" असें म्हणाला. पण तो सावध झाला नाहीं. तेव्हां भगवान् विष्णूनीं आपला शंख मोठ्यानें वाजविला. त्याच्या ध्वनीनें दिशा दणाणून गेल्या. पण तो राक्षसेश समाधि सोडून उठला नाहीं. नतर कांहीं वेळानें हळू हळू तो देहभानावर आला." इत्यादि. याविषयीं दुसरीं अणखी अनेक उदाहरणें आहेत. असो;

वैराग्य दोन प्रकारचें आहे. एक अपर व दुसरें पर. यतमान, व्यतिरेक, एकेंद्रिय व वशीकार असे अपर वैराग्याचे चार भेद आहेत. त्यांतील पहिले तीन भेद " दृष्टानुश्रविकविषयवितृष्णस्य वशीकारसंज्ञा वैराग्य " या सूत्रांत अर्थतः सुचविले आहेत व चवथा भेद प्रत्यक्ष शब्दानें सांगितला आहे. माळा, चंदन, स्त्री, पुत्र, मित्र, क्षेत्र, धन इत्यादि दृष्ट विषय; व वेदोक्त स्वर्गादिक आनुश्रविक विषय होत. त्या दोन्ही प्रकारच्या विषयांविषयीं इच्छा असतांनाही विवेकाच्या न्यूनाधिक प्रमाणाप्रमाणें वैराग्याचे यतमानादि-संज्ञक तीन प्रकार होतात. १ या जगांत सार काय आहे व असार काय आहे, हें मी गुरु व शास्त्र यांच्या साहाय्यानें समजून घेईन, असा निश्चय करून त्याविषयीं उद्योग करणें हें यतमानत्व होय. २ आपल्या चित्तांत पूर्वीं जे दोष होते त्यांताल आजपर्यंत विवेकाच्या अभ्यासामुळें इतके पक्क झाले व अजून इतके आहेत, असें विवेचन करणें हें व्यतिरेक वैराग्य होय. ३ वर सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या विषयांचे ठायीं होणारी प्रवृत्ति दुःखरूप आहे, असें समजल्यामुळें त्या प्रवृत्तीस सोडून केवल मनाच्या औत्सुक्यामुळें त्यांची तृष्णा रहाणें हें एकेंद्रिय वैराग्य होय. व ४ त्यांच्याविषयीं तृष्णाही नसणें हें वरील सूत्रांत सांगितलेलें चवथ्या प्रकारचें वशीकारसंज्ञा वैराग्य होय. हें अपर वैराग्य अष्टांग योगास प्रवृत्त करणारें आहे. म्हणजे या वैराग्यामुळें

अष्टांग योगामध्यें पुरुषाची प्रवृत्ति होते. यास्तव तें संप्रज्ञात समाधीचें अंतरंग साधन आहे; व असंप्रज्ञात समाधीचें बहिरंग साधन आहे. पर वैराग्य हें या दुसऱ्या प्रकारच्या समाधीचें अंतरंग साधन आहे. पतंजलींनीं " तत्परं पुरुषख्यातेर्गुणवैतृष्ण्यम् " या सूत्रांत त्याचा निर्देश केला आहे. संप्रज्ञातसमाधि दृढ झाली म्हणजे त्रिगुणात्मक प्रकृतीहून अगदीं भिन्न असलेल्या पुरुषाचा साक्षात्कार होतो. त्या साक्षात्कारामुळें सर्व गुणत्रयव्यवहाराविषयीं होणारें जें वैतृष्ण्य ( वैराग्य ) तें पर होय. त्याच्या न्यूनाधिकतेप्रमाणें समाधिसिद्धीस अधिक किंवा न्यून काल लागतो. " तीव्रसंवेगानां आसन्नः " असें सूत्र आहे. त्याचा अर्थ—संवेग म्हणजे वैराग्य. ज्याचें वैराग्य तीव्र असतें, त्यास समाधीचा लाभ अगदीं लवकर होतो. वैराग्याच्या भेदामुळें मृदुसंवेग, मध्यसंवेग, व तीव्रसंवेग असे तीन प्रकारचे योगी होतात. तीव्रसंवेग योग्यासही समाधीचा लाभ होण्यास वैराग्यप्रमाणें न्यूनाधिक काल लागतो.—" मृदुमध्याधिमात्रत्वात्ततोऽपि विशेषः " या सूत्रांत पतंजलींनीं तेंच सांगितलें आहे. मृदुतीव्र, मध्यतीव्र, व अधिमात्रतीव्र या तीव्रतेच्या भेदाप्रमाणें उत्तरोत्तर लवकर समाधिसिद्धि होते. जनक, प्रह्लाद इत्यादि अधिमात्रतीव्र होते. कारण दोन घटिका विचार केल्यानेंच त्यांना दृढ समाधीचा लाभ झाला. उद्दालकादिक मृदुसंवेग होते. कारण दीर्घकाल प्रयास केल्यावर त्यांस समाधीचा लाभ झाला. याचप्रमाणें इतर योग्यांविषयीं जाणावें. सारांश येणेप्रमाणें अधिमात्र तीव्र योग्यास दृढभूमि असंप्रज्ञातसमाधि प्राप्त झाली असतां पुनः व्युत्थान पावण्यास असमर्थ झालेलें मन नष्ट होतें. अशा प्रकारच्या मनोनाशाच्या योगानें वासनाक्षयाचें रक्षण झालें असतां जीवन्मुक्ति अतिशय प्रतिष्ठित होते. मनोनाशाच्या योगानें विदेहमुक्तिच मात्र मिळते जीवन्मुक्ति मिळत नाहीं, असें म्हणणें योग्य नाहीं. कारण राम व वसिष्ठ यांच्या प्रश्नोत्तरावरून त्याचा निर्णय होतो. त्यांच्या संवादाचें तात्पर्य असें:—

श्रीरामः—गुरुराज, विवेकाच्या उदयामुळें चित्ताचें स्वरूपच नाहींसें झालें असतां, योग्याचे मैत्र्यादिगुण कोठें उत्पन्न होतात, तें मला सांगा. श्रीवसिष्ठः—रामा, चित्ताचा नाश सरूप व अरूप असा दोन प्रकारचा आहे. जीवन्मुक्तिप्रसंगीं त्याचा सरूप नाश होतो व विदेहमुक्तींत अरूप नाश होतो. प्रकृतीच्या गुणांचा समूह माझा आहे, असें समजून सुखदुःखसंपन्न होणारें चित्त विद्यमान चित्त होय. ह्मणजे देहादिकांस उद्देशून 'हें माझें' असें ह्मणणें व

त्यामुळें मनानें सुखदुःखयुक्त होणें हें त्याच्या अस्तित्वाचें चिन्ह होय. आतां त्याचा नाश म्हणजे काय तें तूं ऐक. प्राण्याचे निःश्वास ज्याप्रमाणें मोठ्या पर्वतास चंचल करूं शकत नाहींत, त्याप्रमाणें सुखदुःखादि दशा ज्या धीर पुरुषास सम अवस्थेपासून ढळवूं शकत नाहींत, त्याचें चित्त मेलें आहे, असें समजावें. आपत्ति, कृपणता, उत्साह, मद, मंदता व मोठा उत्सव हीं ज्यास विरूप ( निस्तेज ) करू शकत नाहींत, त्याचें मन नष्ट झालें आहे, असें समजावें. रामा, आशारूपी चित्त जेव्हां नष्ट होतें तेव्हां मैत्र्यादि गुणांनीं युक्त असलेलें सत्त्व उदय पावतें. पुनर्जन्मानें रहित असलेलें तेंच जीवन्मुक्ताचें मन होय; हा सरूप मनोनाश जीवन्मुक्तास प्राप्त होतो. ( मनाचें केवल सात्त्विक रूपानें रहाणें हा सरूप मनोनाश होय. ) अरूप मनोनाश म्हणून जो मी वर सांगितला आहे तो विदेहमुक्तीमध्येंच असतो; तो सर्व कलारहित असतो. सर्व उत्तम गुणांचा आधार असें जें सत्त्व ( सत्त्वगुण ) तें विदेहमुक्तिसमयीं निर्मल व परम पावन पदीं लीन होतें. दुःखशून्य, चैतन्यरूप, एक, अद्वितीय आनंदपूर्ण, व रजस्तमोरहित असें जें परम पद त्याच्या ठायीं चित्तरहित झालेले महात्मे रहातात. जीवन्मुक्त सुखदुःखादि स्थितींत मोहित होत नाहींत. ते प्रकृतीच्या संबंधामुळें कांहीं करितात किंवा करीतही नाहींत. इत्यादि.

सारांश, सरूप मनोनाश जीवन्मुक्तीचें साधन आहे, ही गोष्ट यावरून सिद्ध झाली.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत जीवन्मुक्तिविवेकसाराचें मनोनाशनिरूपण-नामक तिसरें प्रकरण समाप्त झालें.

---

## अथ चतुर्थं स्वरूपसाधनप्रयोजनप्रकरणम् ।

श्रीगणेशाय नमः । श्रीशंकराचार्यचरणारविंदाभ्यां नमः । जीवन्मुक्ति म्हणजे काय? तिच्याविषयीं प्रमाण काय आहे? व तिची सिद्धि कशी होईल? या तीन प्रश्नांचें उत्तर येथवर दिलें. आतां जरी तिची सिद्धि झाली तरी तिचें प्रयोजन काय? या चवथ्या प्रश्नाचें उत्तर देतों. ज्ञानरक्षा, तप, विसंवादाभाव, दुःखनाश व सुखाविर्भाव अशीं तिचीं पांच प्रयोजनें आहेत. प्रमाणाच्या योगानें उत्पन्न झालेल्या ज्ञानाचा बाध होणें मुळींच

शक्य नाहीं. तेव्हां ज्ञानरक्षा व्हावी अशी इच्छा करण्यांत काय अर्थ आहे ? ह्मणून कोणी ह्मणेल. पण चित्त विश्रांत झालेलें नसल्यास संशय व विपर्यय अवश्य प्राप्त होतात. दशरथपुत्र रामाला तत्त्वज्ञान झालें होतें; पण त्याचें चित्त शांत झालेलें नसल्यामुळें त्याला संशय आला, असें योगवासिष्ठांत आरंभींच वर्णन केलें आहे.

" विश्वामित्र म्हणतातः—ज्ञान्यांतील श्रेष्ठ राघवा, तूं आपल्याच सूक्ष्म बुद्धीनें सर्व जाणलें आहेस यास्तव तुला आतां आणखीं ज्ञेय असें कांहीं राहिलें नाहीं. श्रीव्यासपुत्र शुकाप्रमाणें तुझी बुद्धि आतां केवल विश्रांतीची अपेक्षा करीत आहे. "

तसेंच शुकास स्वबुद्धीनेंच प्रथम तत्त्वज्ञान झालें होतें. पण त्यास संशय आला व त्यानें आपल्या पित्यास तत्त्वाविषयीं प्रश्न केला. पण त्यानेंही, आपणास जें कांहीं समजलें होतें तेंच सांगितलें. अधिक कांहींच सांगितलें नाहीं; असें पाहून तो पित्याच्या सांगण्यावरून जनकाकडे गेला. त्यानेंही तेंच सांगितलें. तेव्हां शुक म्हणालाः—श्रेष्ठ राजा, हें तत्त्व तर मी स्वतः विवेकानें जाणलें होतें. पण त्यावर माझा विश्वास बसला नाहीं; ह्मणून पित्यास विचारलें. त्यानेंही तसेंच सांगितलें. तरी माझ्या मनाचें समाधान झालें नाहीं. ह्मणून मी तुमच्याकडे आलों. पण तुह्मींही तेंच सांगत आहां. शास्त्रांतही असेंच सांगितलेलें आढळतें.—" हा संसार आपल्या संकल्पामुळेंच उत्पन्न झालेला आहे व तो आपला संकल्प क्षीण झाल्यानेंच क्षीण होणार. वस्तुतः हा निःसार आहे.—" पण असाच जर निश्चय आहे तर माझें चित्त संशयग्रस्त होऊन अजून व्याकुळ कां होत आहे ? तें शांत कां होत नाहीं ?

हा प्रश्न ऐकून जनक म्हणालाः—मुनिराज, शास्त्रनिश्चय काय तो एवढाच आहे. तूं हें तत्त्व स्वतः जाणलें आहेस व तें गुरूच्या तोंडूनही ऐकलें आहेस. या सृष्टींत जणूं काय एक अखंड चैतन्य पुरुषच आहे. दुसरें कांहीं नाहीं. प्राणी आपल्या संकल्पामुळेंच बद्ध झाला आहे व संकल्प सोडल्यानेंच तो मुक्त होईल. शुकदेवा, तुला ज्ञान झालें आहे. ऐहिक सर्व भोगांविषयींही तूं विरक्त आहेस. ज्याचें चित्त पूर्ण झालें आहे अशा तुला सर्व प्राप्तव्य प्राप्त झालें आहे. दृश्यवस्तूंविषयीं तूं मुळींच प्रयत्न करीत नाहींस. यास्तव, हे ब्राह्मणा, तूं मुक्त आहेस. आतां त्याविषयीं तूं साशंक होऊं नकोस. सर्व भ्रांति सोड. याप्रमाणें महात्म्या जनकानें उपदेश केला असतां शुक

शांतचित्त होऊन स्वात्मवस्तूंमध्यें स्थिर झाला; त्याचा शोक, भय व आयास यांचा क्षय झाला; सर्व इच्छा लीन झाल्या व संशय नष्ट झाले. त्यानंतर तो एकांतांतील समाधीचें सुख घेण्याकरितां मेरुशिखरावर गेला. तेथें अनेक वर्षें निर्विकल्प समाधीनें राहून तैलरहित दीपाप्रमाणें शेवटीं तो स्वात्मज्योतींत शांत झाला. इत्यादि.

तस्मात् जरी तत्त्वज्ञान झालें तरी चित्तविश्रांति नसल्यास शुक व राम यांच्याप्रमाणें संशय उत्पन्न होण्याचा संभव आहे व तो अज्ञानाप्रमाणेंच मोक्षास प्रतिबंध करितो. ह्मणूनच भगवानांनींही "अज्ञ, अश्रद्धालु व संशयी नाश पावतो. संशयी पुरुषास तर हा लोक प्राप्त होत नाहीं; परलोक मिळत नाहीं व सुखही नाहीं." असें ह्मटलें आहे. अश्रद्धा ह्मणजे विपर्यय. त्याचें अधिक वर्णन पुढें करीन. अज्ञान व विपर्यय हे दोष केवळ मोक्षालाच प्रतिबंध करीत असतात; पण संशय, भोग व मोक्ष या दोघांनाही प्रतिबंध करितो. कारण तो एकमेकाच्या विरुद्ध अशा दोन कोटींचा आश्रय करून रहात असतो. जेव्हां संशयी पुरुषाची संसारसुखाकडे प्रवृत्ति होऊं लागते तेव्हां मोक्षबुद्धि तिला आडविते व मोक्षाकडे जेव्हां त्याची प्रवृति होऊं लागते तेव्हां तिला संसारबुद्धि प्रतिबंध करिते; त्यामुळें संशयी पुरुषास सुख होत नाहीं. यास्तव मुमुक्षूनें सर्वथा संशयाचा नाश करावा. एवढ्याकरितांच श्रुतीनें "परमात्म्याचा साक्षात्कार झाला असतां सर्व संशय तुटतात" असें ह्मटलें आहे. निदाघ हें विपर्ययाचें चांगलें उदाहरण आहे. ऋभु मोठ्या करुणेनें निदाघाच्या घरीं येऊन अनेक प्रकारें त्यास बोध करून गेला. त्याचा उपदेश त्याला बरोबर समजला होता. पण त्यानें जें तत्त्व सांगितलें होतें त्याच्यावर त्याचा विश्वास बसला नाहीं व कर्मच परम पुरुषार्थाचें साधन आहे, अशी विपरीत समजूत करून घेऊन तो पूर्वीप्रमाणेंच कर्मानुष्ठान करूं लागला. तेव्हां तोही मुनि आपला शिष्य परमपुरुषार्थापासून भ्रष्ट न व्हावा ह्मणून कृपेनें पुनरपि आला व त्यानें त्यास बोध केला. तरी निदाघाचा विपर्यय गेला नाहीं. पण तिसऱ्या वेळीं पुनः येऊन जेव्हां ऋभूंनीं त्यास बोध केला तेव्हां त्याचा विपर्यय नाहींसा होऊन तो शांतचित्त झाला. असंभावनारूप संशय व विपरीत भावनारूप विपर्यय यांच्या योगानें तत्त्वज्ञानाच्या फलास प्रतिबंध होतो. पराशरांनीं याविषयीं असें ह्मटलें आहे—

"ज्याप्रमाणें मणि, मंत्र व औषधि यांच्या योगानें प्रतिबद्ध झालेला अग्नि

पेटत असला तरी काष्ठांस जाळूं शकत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाग्नि उत्पन्न होऊन अत्यंत दीप्त व दृढ जरी झालेला असला तरी प्रतिबद्ध झालेला असल्यास पापाचा दाह करण्यास तो समर्थ होणार नाहीं. विपरीत भावना व असंभावना तत्त्वज्ञानाला प्रतिबंध करीत असतात. दुसरें कांहीं त्यास प्रतिबंध करीत नाहीं " इत्यादि.

तस्मात् ज्याचें चित्त शांत नाहीं, अशा पुरुषाच्या तत्त्वज्ञानाच्या फलास संशय व विपर्यय यांच्या योगानें प्रतिबंध होण्याचा संभव आहे. यास्तव अशा प्रकारच्या बाधापासून ज्ञानाचें रक्षण व्हावें ह्मणून चित्तविश्रांतीची अपेक्षा असते. शांतचित्त पुरुषाचा मनोनाश झालेला असतो, त्यामुळें त्यास जगाचेंही भान रहात नाहीं. मग संशय व विपर्यय कोठून होणार? ज्याला जगाचाही भास होत नाहीं, अशा तत्त्ववेत्त्याचा देहव्यवहार त्याच्या प्रयत्नावांचूनच परमेश्वरप्रेरित प्राणवायूच्या योगानें होतो. एवढ्याकरितांच छांदोग्योपनिषदांत " ब्रह्मवेत्ता लोकांच्या समीप असलेल्या या शरीरास स्मरत नाहीं, त्या शरीरासमीप असलेले लोक, हें याचें शरीर, असें जाणतात, पण त्याचें मन क्षीण असल्यामुळें तो स्वतः हें माझें शरीर यांच्या जवळ आहे; हें आतां अमुक करीत आहे; इत्यादि स्मरत नाहीं." असें ह्मटलें आहे. गाडी ओढण्याची ज्याला पुष्कळ संवय झाली आहे, असा बैल किंवा घोडा गाडीस जोडून एकदां त्याला हांकलें ह्मणजे तो जसा आपोआप सरळ मार्गानें गाडी ओढून नेत असतो, व गाडीवानाच्या पुनः पुनः हांकण्याची अपेक्षा न धरितां आपोआप तिला इष्ट स्थळीं घेऊन जातो, त्याप्रमाणें परमेश्वरानें ज्याची या शरीरांत योजना केली आहे, असा हा प्राणवायु जीवाचा प्रयत्न होत असला तरी व नसला तरी त्याचा शरीरनिर्वाह करितो. भागवतांतही—" सिद्ध पुरुषास स्वरूपाचा साक्षात्कार झालेला असल्यामुळें तो हें क्षणभंगुर शरीर उठलें आहे कीं बसलें आहे हें पहात नाहीं. तर मदिरा पिऊन मत्त झालेल्या मूर्खास जसें शरीरावरील वस्त्राचें भान नसतें त्याप्रमाणें त्यास शरीरसंयोगाचें किंवा त्याच्या वियोगाचें भान नसतें." असें ह्मटलें आहे. वसिष्ठांनींही " जवळच्या लोकांनीं सांगितलें असतां संतजन पूर्वपरंपराप्राप्त आचार निजून उठलेल्या पुरुषांप्रमाणें अखंडित पाळितात." असें सांगितलें आहे. चित्ताची विश्रांति जशी न्यूनाधिक असेल त्याप्रमाणें सिद्धांच्या आचाराची व्यवस्था लाविली असतां, कांहीं मुळींच आचारसंपन्न नसतात व कांहीं चांगले आचारसंपन्न असतात, याचें

कारण समजतें. या चित्तविश्रांतीच्या न्यूनाधिकतेस अनुलक्षून " आत्मक्रीड, आत्मरति, व क्रियावान् असा हा ब्रह्मवेत्त्यांतील वरिष्ठ आहे, " असें श्रुतीनें म्हटलें आहे. या श्रुतींत ब्रह्मवेत्त्यांचे चार प्रकार सुचविले आहेत. पहिला ब्रह्मवित्, दुसरा ब्रह्मविद्वर, तिसरा ब्रह्मविद्वरीयान् व चवथा ब्रह्मविद्वरिष्ठ. सात योगभूमींतील चवथ्या योगभूमीपासून क्रमानें यांच्या या अवस्थांचा आरंभ होतो. योगाच्या सात भूमी श्रीवसिष्ठांनीं सांगितल्या आहेत. त्यांच्या वर्णनाचा सारांश असा–

शुभेच्छा ही पहिली ज्ञानभूमि आहे. विचारणा दुसरी, तनुमानसा तिसरी, सत्त्वापति चवथी, असंसक्ति पांचवी, पदार्थाभाविनि सहावी व तुर्यगा सातवी भूमि आहे. १ मी असा मूर्खासारिखा काय बसलों आहे ? शास्त्र व सज्जन यांच्या द्वारा मला शास्त्रसिद्धांत समजून घेतला पाहिजे; अशी वैराग्यपूर्वक इच्छा होणें हीच शुभेच्छा होय. तिला ज्ञानभूमि असेंही ह्मणतात. २ शास्त्र व सज्जन यांच्या सहवासामुळें व वैराग्याच्या अभ्यासामुळें चांगल्या विचारांत जी प्रवृत्ति होते तिला विचारणा असें म्हणतात. ३ विचारणा व शुभेच्छा यांच्या योगानें इंद्रियांच्या विषयांमध्यें अनासक्ति होते. म्हणजे मन विषयांमध्यें आसक्त होईनासें होतें. तीच तनुमानसा होय. ४ या वरील तीन भूमिकांचा अभ्यास केल्यामुळें व वैराग्यामुळें चित्त केवल सात्त्विक, स्थिर व शुद्ध झालें असतां जी अवस्था प्राप्त होते तिला सत्त्वापत्ति म्हणतात. ५ या पहिल्या चारी दशांचा अभ्यास केला असतां अनात्मवस्तूंशीं अगदीं संसर्ग होत नाहीं व सर्व मायिक आहे अशी दृढ भावना होते. हीच संसक्तिनामक पांचवी भूमिका आहे. ६ पांची भूमिकांचा अभ्यास केल्यानें योगी आत्म्यामध्येंच तल्लीन होतो. त्यास देहाच्या आंतील व बाहेरील पदार्थांचें भान होत नाहीं व असल्या या समाधींत शांत होऊन राहिलेल्या त्या ज्ञान्यास मोठ्या प्रयत्नानें देहभानावर आणावें लागतें. ही पदार्थाविभाविनी नामक सहावी भूमि आहे. ७ या साहाही भूमींचा दीर्घकाल अभ्यास केला असतां आत्म्याची स्वाभाविक तुर्यगानामक सातवी अवस्था सिद्ध होते.

यांतील पहिल्या तीन भूमी ब्रह्मविद्येचें साधन आहेत. त्यांचा विद्याकोटींत अंतर्भाव होत नाहीं. कारण, त्यांत भेद सत्य आहे, या बुद्धीचें निवारण होत नसतें. ह्मणूनच श्रीवसिष्ठांनीं या तीन भूमींस जाग्रत् असें म्हटलें आहे. पुढें वेदान्त वाक्यांवरून निर्विकल्पब्रह्मात्मैक्यसाक्षात्कार होणें ही चवथी भूमि

आहे. हीच फलरूप सत्त्वापत्ति होय. या भूमींत साधक सर्व जगाचें उपादान कारण जें ब्रह्म तें सत्य, अद्वितीय व सत्तास्वभाव आहे, असा निश्चय करून त्याच्या ठायीं आरोपित असलेलें हें नामरूपात्मक जग मिथ्या आहे, असें जाणतो. मुमुक्षूच्या वर सांगितलेल्या जाग्रत् अवस्थेच्या अपेक्षेनें ही भूमि स्वप्न आहे. कारण श्रीवसिष्ठांनीं " अद्वैत स्थिर झालें असतां व द्वैत क्षीण झालें असतां चवथ्या भूमीस पोंचलेले मुमुक्षू या लोकास स्वप्नाप्रमाणें पहातात" असें म्हटलें आहे. या भूमिकेंतील योग्यास ब्रह्मविद् म्हणतात. पांचवी, सहावी व सातवी या तीन भूमिका जीवन्मुक्तीचेच पोटभेद आहेत. निर्विकल्प समाधीच्या अभ्यासामुळें प्राप्त होणाऱ्या चित्तविश्रांतीच्या न्यूनाधिकतेमुळें ते होत असतात. पांचव्या भूमींतील योगी निर्विकल्पसमाधींतून आपोआप उठतो. त्यास ब्रह्मविद्वर म्हणावें. सहाव्या भूमींतील योगी जवळच्या दुसऱ्या लोकांनीं जागें केलें तरच जागा होतो. तो ब्रह्मविद्वरीयान् होय. या दोन भूमींस क्रमानें सुषुप्ति व गाढ सुषुप्ति असें म्हणतात. " सुषुप्तिसंज्ञक पांचव्या भूमिकेस प्राप्त झालेला योगी सर्व विशेष-अंशरहित होऊन केवल अद्वैतांत रहातो. तो सतत अंतर्मुख असतो व जरी कदाचित् बहिर्मुख झाला तरी सतत श्रांत असल्यामुळें निद्रालुसारिखा भासतो. या भूमीची आस्था न धरितां तसाच तिचा अभ्यास करीत रहाणारा योगी पुढें आपोआप सहाव्या भूमींत जातो. तिला गाढ सुषुप्ति असें म्हणतात. त्या अवस्थेंत तो सद्रूपही नसतो व असद्रूपही नसतो. त्याला अहं असें भासत नाहीं व अनहं असेंही वाटत नाहीं. तर तो मननरहित आणि द्वैत व ऐक्य यांहून निराळा असतो. कोणी अद्वैत तत्त्व समजतात व कोणी द्वैताला तत्त्व म्हणतात, पण द्वैत आणि अद्वैत यांनीं रहित असलेलें सम ब्रह्म कोणी जाणत नाहींत. हा योगी मात्र अंतरालीं ठेविलेल्या कुंभाप्रमाणें अंतःशून्य व बहिःशून्य असतो व समुद्रांत बुडविलेल्या घटाप्रमाणें आंत पूर्ण व बाहेर पूर्ण असतो, " असें वसिष्ठमुनींनीं या दोन्ही भूमींतील योग्यांचें वर्णन केलें आहे. त्यांतील शेवटच्या दृष्टांताचें रहस्य असें—गाढ निर्विकल्पसमाधीस प्राप्त झालेल्या व ज्याच्यामध्यें केवल संस्कारच शेष आहेत, अशा चित्तामध्यें मनोराज्य करण्याचें किंवा बाह्य पदार्थांचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य रहात नसल्यामुळें तें आकाशांतील घागरीप्रमाणें अंतर्बहिःशून्य असतें. पण तें स्वतः स्वयंप्रकाशसच्चिदानंदरूप ब्रह्मामध्यें मग्न झाल्यामुळें व बाहेर सर्वत्र ब्रह्मदृष्टि

९-५८६-२०००

ठेविल्यामुळें समुद्रांतील घागरीप्रमाणें अंतर्बाह्य: पूर्ण असतें. असो; तुरीयसंज्ञक सातव्या भूमीस प्राप्त झालेला योगी स्वतः किंवा दुसऱ्याच्या प्रयत्नानेंही व्युत्थान पावत नाहीं. अशा प्रकारच्या योग्यास उद्देशून वरील भागवतांतील वचन प्रवृत्त झालें आहे. असंप्रज्ञात समाधीचें प्रतिपादन करणारीं योगशास्त्रें येथें समाप्त होतात. ह्मणजे त्यांची सीमा येथपर्यंतच आहे. या असल्या योग्यास ब्रह्मविद्वरिष्ठ असें ह्मणतात. " आत्मक्रीड० " इत्यादि श्रुतींत याचाच निर्देश केला आहे. सारांश याप्रमाणें सिद्धांच्या आचाराची व अनाचाराची व्यवस्था लावितां येत असल्यामुळें वरील भागवतांतील वचन व वसिष्ठांचें वचन यांमध्यें विरोध रहात नाहीं. तात्पर्य पांचवी, सहावी व सातवी भूमिरूप जी जीवन्मुक्ति ती प्राप्त झाली असतां द्वैताचा प्रतिभास होत नसल्यामुळें संशय व विपर्यय यांस आवकाश व निमित्तही मिळत नाहीं आणि त्यामुळें उत्पन्न झालेलें ज्ञान अबाधित रहातें. हेंच जीवन्मुक्तीचें ज्ञानरक्षानामक प्रथम फल होय. तप हें तिचें दुसरें प्रयोजन आहे. योगभूमींच्या अभ्यासानें देवत्वादिकांची प्राप्ति होते. यास्तव त्यांना तप असें ह्मणण्यास कांहीं अडचण दिसत नाहीं. अर्जुन व भगवान् आणि श्रीराम व वसिष्ठ यांच्या प्रश्नोत्तरांवरून योगाभ्यास देवत्वादिप्राप्तीस कारण कसा होतो तें चांगलें समजतें. त्यांचा सारांश असा:—

योगाभ्यासाचा अंगीकार करून इहपरलोकप्राप्तीचीं साधनें जीं कर्में त्यांचा ज्यानें त्याग केला आहे त्यास, सम्यक् ज्ञान हें फल मिळण्यापूर्वींच, मरण आल्यास उभयतः भ्रष्ट झाल्यामुळें त्याचा नाश होईल कीं काय ? असा संशय आल्यामुळें अर्जुन ह्मणतो:—फार प्रयत्न न करणारा पण योगामध्यें ज्याची दृढ भक्ति व श्रद्धा आहे, असा पुरुष अंतकाळीं योगापासून चलितचित्त झाल्यास कोणत्या गतीस जातो. दोन्हीं आधारांपासून वेगळ्या झालेल्या अभ्राप्रमाणें त्याचा नाश तर होत नाहीं. ? भगवन्, या माझ्या संशयाचें निरसन करा.

श्रीभगवान् ह्मणतात:—पार्था, त्याचा या लोकीं किंवा परलोकींही नाश होत नाहीं. ( येथें नाश ह्मणजे हीन जन्म, असें समजावें. ) कारण शुभाचरण करणारा कोणीही दुर्गतीस जात नसतो. तो योगभ्रष्ट पुण्यवानांच्या लोकांस जाऊन व तेथें दीर्घ काल राहून पुनः या लोकीं पवित्र व श्रीमान् लोकांच्या कुलांत जन्म घेतो. अथवा पवित्र व बुद्धिमान् अशा दरिद्र्यांच्या कुलांत तो जन्मास येतो. हा दुसऱ्या प्रकारचा जन्म तर अति दुर्लभच

होय. नंतर तेथें त्यास पूर्वजन्मांतील बुद्धि प्राप्त होते. व त्यामुळें तो पुनरपि अधिक प्रयत्न करितो.

श्रीरामः—भगवन्, पहिल्या, दुसऱ्या किंवा तिसऱ्या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्यास फलरूप चवथ्या भूमीची प्राप्ति होण्यापूर्वींच मरण आल्यास त्याची काय गति होते?

श्रीवसिष्ठः—योगभूमिकेंत आरूढ झालेल्या पुरुषास, सिद्धि मिळण्यापूर्वींच मरण आल्यास त्याच्या भूमिकेच्या योग्यतेप्रमाणें त्याचें पूर्व दुष्कृत क्षीण होतें. त्यानंतर तो देवांच्या विमानांतून सुंदर स्त्रियांसह विहार करितो. लोकपालांच्या नगरांत व मेरुपर्वतावर राहून आनंद भोगतो. पुढें भोगांच्या योगानें पुण्यसंचय क्षीण झाला असतां तो भूलोकीं पवित्र, वैभवशाली व गुणी सज्जनांच्या कुलांत उत्पन्न होतो. तेथें पूर्वजन्मीं ज्यांचा अभ्यास केला होता, त्या भूमींस केवल स्पर्श करून तो उत्तर भुमिकेंत प्रविष्ट होतो. इत्यादि.

यावरून योगाभ्यास देवत्वप्राप्तीचें साधन आहे, असें ठरतें. पण त्यालाच तप कसें ह्मणतां येईल? असें कोणी विचारील. परंतु स्वतः श्रुतीनें "तपाच्या योगानें पूर्वीं देव देवत्वास प्राप्त झाले. तपाच्या योगानें ऋषी सुस्वर्-लोकास गेले." असें सांगितलेलें असल्यामुळें देवत्व देणाऱ्या योगाच्या पहिल्या तीन भूमींस तप ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. व तत्त्व-ज्ञानाच्या पूर्वींच्या तीन भूमिकांसही जर तप ह्मणतां येतें, तर तत्त्वज्ञानानंतरच्या पांचव्या, साहाव्या व सातव्या भूमीस तप ह्मणण्यास मुळींच अडचण नाहीं. एवढ्यासाठींच स्मृतीमध्यें—

मनसश्चेन्द्रियाणां च ऐकाग्र्यं परमं तपः ।
तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते ॥ १ ॥

ह्मणजे मन व इंद्रियें यांचें ऐकाग्र्य हें परम तप आहे. तें सर्व धर्मांहून श्रेष्ठ आहे व तो परधर्म आहे असें ह्मटलें आहे १. आतां पंचमादि पुढच्या भूमिकांस प्राप्त झालेल्या योग्यास, असल्या तपाच्या योगानें दुसरा उत्तम जन्म प्राप्त करून घ्यावयाचा नसतो हें खरें, पण त्याचें हें तप लोकसंग्रहाच्या उपयोगीं असतें. ह्मणूनच भगवानांनीं "लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊनही तुला कर्म करणेंच उचित आहे." असें ह्मटलें आहे. ज्याचा संग्रह करावयाचा असा लोक—शिष्य, भक्त व तटस्थ असा—त्रिविध आहे. त्यांतील शिष्याचा विश्वास अंतर्मुख

योगी गुरूच्या ठायीं पूर्ण असतो. त्यामुळें तो त्यास प्रामाणिक समजतो व त्याच्या वचनावर पूर्ण श्रद्धा ठेवितो. त्यामुळें त्याचें चित्त लागलेंच शांत होतें. म्हणूनच " ज्याची देवावर व देवाप्रमाणेंच गुरूवर परम भक्ति असते, त्यास हे सर्व शास्त्रार्थ चांगले समजतात " असें म्हटलें आहे. भगवानांनींही " श्रद्धावान्, तत्पर व जितेंद्रिय जो असतो त्यास ज्ञान प्राप्त होतें व ज्ञान प्राप्त झाल्यामुळें थोड्याच अवकाशांत त्यास परम शांति मिळते. " असें सांगितलें आहे. असो; अन्न देणें, रहावयास स्थान तयार करून देणें इत्यादिकांच्या योगानें सेवा करणारास भक्त म्हणतात. तो त्याचें तप ग्रहण करितो. कारण श्रुतींत " त्याची संपत्ति पुत्र घेतात; भक्त पुण्यकर्म घेतात व शत्रु ( विरोधी ) पाप घेतात. " असें म्हटलें आहे. तिसरा लोक तटस्थ. तो आस्तिक व नास्तिक असा दोन प्रकारचा आहे. त्यांपैकीं आस्तिक, योग्याचें सदाचरण पाहून आपणही तसेंच करितो. " श्रेष्ठ जें जें करितो त्याचें त्याचेंच इतर जन अनुकरण करितात. तो ज्यास प्रमाण मानतो त्यालाच इतर प्रमाण समजतात. " असें श्रीकृष्णांनींही अर्जुनास सांगितलें आहे. आतां जो नास्तिक तटस्थ असतो तोही योग्यानें त्याच्याकडे पाहिलें असतां पापापासून मुक्त होतो. कारण " ज्याची बुद्धि अनुभवापर्यंत तत्त्वामध्यें प्रवृत्त झालेली असते, त्याच्या दृष्टीं पडलेले सर्व पापापासून मुक्त होतात " असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. सारांश याप्रमाणें तो सर्व प्राण्यांवर उपकार करणारा होतो. आणि खरा प्रकार असा असल्यामुळेंच—

स्नातं तेन समस्ततीर्थसलिले सर्वाऽपि दत्तावनि-
यज्ञानां च सहस्रमिष्टमखिला देवाश्च संपूजिताः ।
संसाराच्च समुद्धृताः स्वपितरस्त्रैलोक्यपूज्योऽप्यसौ
यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥१॥
कुलं पवित्रं जननी कृतार्था विश्वंभरा पुण्यवती च तेन ।
अपारसंवित्सुखसागरेऽस्मिँल्लीनं परे ब्रह्मणि यस्य चेतः ॥२॥

असें ह्मणत असतात. या पद्यांचा अर्थः—ज्याचें चित्त ब्रह्मविचारांत एकक्षणभरही स्थिर होतें त्यानें सर्व तीर्थ-जलामध्यें स्नान केल्यासारिखें, सर्व पृथ्वीचें दान दिल्यासारिखें, सहस्र यज्ञ केल्यासारिखें व सर्व देवतांची पूजा

केल्यासारिखें होतें. तो आपल्या पितरांस संसारांतून सोडवितो व स्वतः त्रैलोक्यपूज्य होतो. १ या अपार संविसुखसागरांत ह्मणजेच परब्रह्माचे ठायीं ज्याचें चित्त लीन झालेलें असतें त्याच्या योगानें त्याचें कुल पवित्र होतें, माता कृतार्थ होते व पृथ्वी पुण्यवती होते. २ असो; योग्याच्या केवल शास्त्रीय व्यवहारालाच तप ह्मणतात, असें नाहीं. तर त्याच्या लौकिक व्यवहारालाही तप ही संज्ञा प्राप्त होते. ती कशी ह्मणून ह्मणाल तर सांगतों—तैत्तिरीय शाखेच्या नारायणोपनिषदांतील शेवटच्या अनुवाकांत विद्वानांचा महिमा वर्णिला आहे. अनुवाकाच्या पूर्व भागीं योग्याच्या अवयवांचें यज्ञद्रव्यरूपानें वर्णन केलें आहे. त्याचें तात्पर्य असें:—

" ज्याला ब्रह्मात्मसाक्षात्कार झाला आहे अशा त्या जीवन्मुक्ताच्या यज्ञाचा—त्याचा साक्षी आत्माच—यजमान, श्रद्धा पत्नी, शरीर इध्म, उरच वेदी, लोम दर्भ, वेद शिखा, हृदय हाच यूप ( पशूस बांधण्याचा स्तंभ ) काम हेंच घृत, क्रोध हाच पशु, तप अग्नि, दम पशूचें दमन करणारा, दान ही दक्षिणा, वाणी होता, प्राण उद्गाता, चक्षु अध्वर्यु, मन ब्रह्मा व श्रोत्र अग्नीत् आहे. " मूळ वाक्यांत दक्षिणा या शब्दाच्या पूर्वी दान हा शब्द नाहीं. पण छान्दोग्यांत " तप, दान, आर्जव, अहिंसा व सत्य भाषण ही जीवन्मुक्ताची दक्षिणा आहे " असें ह्मटलें आहे. त्यास अनुलक्षून येथें दानशब्दाचा अध्याहार करून अर्थ केला आहे. असो; त्याच अनुवाकाच्या मध्य भागानें योग्याचे व्यवहार व जीवन काल ज्योतिष्टोमाच्या आणि त्याच्या पुढच्या इतर यज्ञांच्या अवयव व क्रियारूपानें वर्णिले आहेत.—" तो भोजनापूर्वी जेवढा वेळ रहातो ती त्याची दीक्षा, भोजन करितो तो हवि, जें पेयपान करितो तें सोमपान; रममाण होतो तें उपसद, जो संचार करितो, बसतो व उठतो तो प्रवर्ग्य, त्याचें जें मुख तो आहवनीय अग्नि, त्याची जी भूः, भुवः इत्यादि व्याहृति ती आहुति; त्याचें जें विज्ञान तेंच हवन, सायंकालीं व प्रातःकालीं तो जें खातो त्या समिधा, प्रातःकालादि तीन काल हींच तीन सवनें, त्याचे जे अहोरात्र तेच दर्श व पूर्णमास, जे अर्धमास व मास ते चातुर्मास्य, जे ऋतु तेच पशुबंध आणि जे संवत्सर व परिवत्सर ते अहर्गण आहेत. ( अहोरात्रादि परिवत्सरपर्यंत जें हें योग्याचें आयुष्य आहे तेंच त्याचें सर्वस्वदक्षिणायुक्त सत्र आहे, असा याचा भावार्थ. ) त्याचें जें मरण तेंच अवभृथ स्नान आहे " इत्यादि. त्याच अनुवाकाच्या शेवटच्या

भागात त्या सर्वयज्ञात्मक योगांची उपासना करणारास—कार्यकारण ब्रह्मरूप सूर्यचंद्रांचें तादात्म्य हें फल मिळतें, असें सांगितलें आहे—“ हें जें जरामरण-पर्यंत चालणारें योग्याचें चरित्र आहे तें वेदोक्त अग्निहोत्रादि-संवत्सरसत्रान्त कर्मरूप आहे, असें समजून त्याची उपासना करणारा पुरुष उदगयनांत मेल्यास भावनातिशयामुळें देवांच्या ऐश्वर्यास प्राप्त होतो व सूर्याशीं तादात्म्य पावतो व तो दक्षिणायनांत मरण पावल्यास अग्निष्वात्तादि पितरांच्या ऐश्वर्यास प्राप्त होऊन चंद्राच्या सायुज्यास व सलोकतेस प्राप्त होतो. याप्रमाणें सूर्य व चंद्र यांच्या लोकीं जाऊन त्यांच्या ऐश्वर्याचा अनुभव घेत असतांनाच हिरण्य-गर्भाची उपासना करणारा ब्राह्मण तेथील देहपातानंतर हिरण्यगर्भाच्या ऐश्व-र्याचा अनुभव घेण्याकरितां त्याच्या लोकीं जातो ” इत्यादि वर्णन करून प्रस्तुतप्रकरणाचा उपसंहार केला आहे. त्यावरून जीवन्मुक्ताचें सर्व लौकिकादि आचरण तपोरूप असतें, असें ठरतें. तस्मात् जीवन्मुक्तीचें तप हें दुसरें प्रयोजन सिद्ध झालें.

विसंवादाभाव हें तिचें तिसरें प्रयोजन आहे. बाह्य व्यवहाराकडे ढुंकूनही न पाहतां सदा अंतर्मुख असणाऱ्या योगीश्वराबरोबर कोणीही लौकिक अथवा शास्त्रज्ञ पुरुष वाद करण्यास प्रवृत्त होत नाहीं. कारण विसंवाद दोन प्रकारचा आहे. एक कलहरूप व दुसरा निंदारूप. पण क्रोधादिकांनीं रहित असणाऱ्या योग्याशीं कोणताही भांडखोर लौकिक पुरुष सुद्धां कसा वाद करणार ? कारण योग्यानें कसें वागावें तें पुढील वचनांत स्पष्ट सांगितलें आहे.

> क्रुध्यन्तं न प्रतिक्रुध्येदाक्रुष्टः कुशलं वदेत् ।
> अतिवादांस्तितिक्षेत नावमन्येत कंचन ॥ १ ॥

कोणी रागावल्यास त्याच्यावर उलट रागाऊं नये. कोणी शिव्याशाप दिल्यास “ तुझें कल्याण होवो ” असा आशीर्वाद द्यावा. अतिवादांची तितिक्षा करावी व कोणाचाही अवमान करूं नये १. शिवाय प्रथम विविदिषा संन्यास, त्यापासून तत्त्वज्ञान, त्याच्यानंतर विद्वत्संन्यास व त्याच्याही नंतर जीवन्मुक्ति असा क्रम असल्यामुळें, जीवन्मुक्ताचे ठायीं क्रोधादि दोष असणें शक्य नाहीं. कारण विविदिषा संन्यास ही पहिली अवस्था असून तिच्या-मध्येंही जर क्रोधादिकांचा अभाव असतो, तर तिच्या पुढील दोन अवस्थांमध्यें व विशेषतः या शेवटच्या अवस्थेंत ते कसे असणार ? क्रोधादि दोषांच्या

अभावीं कलहाचा उद्भव होणें अशक्य आहे. यास्तव जीवन्मुक्ताशीं कोणत्याही लौकिक पुरुषाचा कलह होणें शक्य नाहीं. लौकिक पुरुष त्याची निंदा तरी करतील, ह्मणून ह्मणावें तर–

यन्न सन्तं न चासन्तं नाश्रुतं न बहुश्रुतम् ।
न सुवृत्तं न दुर्वृत्तं वेद कश्चित्स वै यतिः ॥ १ ॥

असें म्हटलें आहे. म्हणजे हा सत् आहे कीं असत् आहे; अविद्वान् आहे कीं बहुश्रुत आहे; सदाचरणी आहे की दुराचरणी आहे, हें ज्याच्याविषयीं कोणी जाणत नाहीं तो यति होय १. असें मुख्य यतीचें लक्षण सांगितलेलें असल्यामुळें लौकिक जनांस त्याच्यांतील गुणदोषच समजत नाहींत. मग ते त्याची निंदा कशी करणार ? बरें दुसऱ्या शास्त्रज्ञाशीं त्याचा किंवा त्याच्याशीं शास्त्रज्ञाचा कलह होईल ह्मणून म्हणावें तर शास्त्रविषयांत त्याचा कलह होणें शक्य नाहीं. कारण हा योगी दुसऱ्यांच्या शास्त्रप्रमेयास कधींही दोष देत नाहीं. कारण " एका आत्म्यालाच जाणावें. तदतिरिक्त सर्व वाणीचा त्याग करावा. पुष्कळ शब्दांचें अध्ययन करूं नये. कारण तें वाणीस शीण देत असतें. " असें श्रुतीनें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें तो आपल्या शास्त्राचें प्रमेय प्रतिवाद्यापुढें सांगत बसत नाहीं. कारण " धान्याची इच्छा करणारा जसें सर्व भूंस टाकून देतो, त्याप्रमाणें सर्व ग्रंथांचा त्याग करून ब्रह्ममय होऊन रहावें " असें सांगितलें आहे. शिवाय हा ब्रह्मनिष्ठ प्रतिवाद्यासही स्वतःच्या आत्मरूपानें पहात असतो. तेव्हां त्याच्याशीं वाद करून त्यास जिंकावें अशी इच्छा त्यास कशी होणार ? बरें, योग्याचा जो आचार सांगितला आहे, त्याविषयीं याचा दुसऱ्या शास्त्रज्ञाशीं कलह होईल ह्मणून ह्मणावें तर तेंही संभवत नाहीं. कारण चार्वाकावांचून इतर सर्व शास्त्रकार मोक्षाचा अंगीकार करीत असतात. त्यामुळें मोक्षाचें साधन असा जो आचार त्याच्याविषयीं त्यांचा फारसा मतभेद होण्याचा संभव नसतो. जैन, बौद्ध, वैशेषिक, नैयायिक, शैव, वैष्णव, शाक्त, सांख्य, योग इत्यादिकांच्या शास्त्रांतील प्रतिपाद्य प्रमेयाविषयीं जरी विविधता असली तरी मोक्षसाधनभूत यमनियमादि अंगांविषयीं ऐक्यमत्यच असतें. यास्तव असल्या जीवन्मुक्त योगीश्वराशीं कोणाचाही कोणत्याही प्रकारचा विसंवाद होत नाहीं. उलट तो सर्वांस मान्य होतो. श्रीवसिष्ठांनींही असाच आपला अभिप्राय दिला आहे.

"राघवा, ज्याचा हा शेवटचा जन्म असतो त्याच्यामध्यें सर्व शुद्ध विद्या प्रवेश करितात. आर्यता, हृद्यता, मैत्री, सौम्यता, मुक्तता व ज्ञता ह्या त्याच्या हृदयाचा, अंतःपुरांतील स्त्रियांप्रमाणें, आश्रय करितात. मधुर ध्वनियुक्त वाद्य जसें वनपशूंस अतिशय आवडतें त्याप्रमाणें शुद्ध सदाचारसंपन्न योगी सर्व लोकांस आवडतो. जाग्रत् अवस्थेंत निद्रेप्रमाणें जो शांत चित्त-वृत्तीनें रहातो त्याची कलायुक्त चंद्राप्रमाणें सर्व लोक सेवा करितात. अशा पुरुषासच मुक्त ह्मणावें. समशाली पुरुषावर सर्व सम व विषम स्वभावाचे प्राणी मातेप्रमाणें विश्वास ठेवितात. तपस्वी, बहुश्रुत, याजक, राजे, बलाढ्य व गुणवान् इतक्या सर्वांहून शमसंपन्न योगीच अधिक शोभतो." इत्यादि.

असो; तात्पर्य येणेंप्रमाणें जीवन्मुक्तीचें विसंवादाभावरूप तिसरें प्रयोजन अबाधितपणें सिद्ध झालें. आतां दुःखनाश व सुखाविर्भावरूप चवथें व पांचवें प्रयोजन पंचदशीच्या विद्यानंदसंज्ञक चवदाव्या प्रकरणांत विस्तारपूर्वक सांगितलें आहे. त्याचाच येथें थोडक्यांत निर्देश करितों. "हा मीच कूटस्थ आत्मा आहें, असें जर जीवानें जाणलें तर मग कशाची इच्छा करून व कोणाकरितां शरीर संतप्त होईल?" या श्रुतीनें जीवन्मुक्ताच्या ऐहिक दुःखाचा नाश होतो, असें सांगितलें आहे. व "जीवन्मुक्तास मरण-समयीं-मी सदाचरण कां केलें नाहीं, मी पाप कां केलें, हा विचार ताप देत नाहीं." अशा अर्थाच्या श्रुती परलोकास कारण होणाऱ्या पुण्यपापाची चिंता (ह्मणजेच त्याचें पारलौकिक दुःख) नाश पावतें, असें सांगतात. विद्वानांचा अनुभवही तसाच आहे. त्यामुळें दुःखनाश हें जीवन्मुक्तीचें चवथें प्रयोजन सिद्ध होतें. सुखाविर्भाव-सर्व कामावाप्ति, कृतकृत्यत्व व प्राप्त-प्राप्तव्य-असा तीन प्रकारचा आहे. त्यांतील सर्व कामावाप्ति या सुखाविर्भावाचे सर्व साक्षित्व, सर्वत्र अकामहतत्व व सर्व भोक्तृरूपत्व असे तीन प्रकार आहेत. हिरण्यगर्भापासून स्थावर पदार्थांपर्यंत सर्व देहामध्यें अनुगत असलेलें जें साक्षि चैतन्यरूप ब्रह्म तेंच मी आहें असें जाणणारा पुरुष स्वदेहाप्रमाणें परदेहामध्यें-ही सर्व कामांचा साक्षी होतो. ह्मणजे माझा हा साक्षी आत्माच सर्व देहांतील साक्षी आहे, असें तो जाणतो. त्यामुळें सर्व साक्षित्व हा धर्म त्याच्या ठायीं येतो. ह्मणूनच "तो ज्ञानी सर्वज्ञ ब्रह्मरूपानें सर्व भोग एकाच कालीं भोगतो." असें ह्मटलें आहे. व्यवहारांत भोगाचा उपभोग घेतल्यावर त्याच भोगाविषयीं कांहीं काल इच्छा रहात नाहीं. त्यालाच अकामहत म्हणतात.

तत्त्ववेत्ता सर्व भोगाचें ठायीं दोष पहात असतो. त्यामुळें तो सर्वत्र अकामहत असतो. अशा अकामहतत्त्वासच सर्व कामाप्ति ह्मणतात. तैत्तिरीयोपनिषदांत सार्वभौम राजापासून हिरण्यगर्भापर्यंत जितके उत्तरोत्तर शतपट अधिक आनंद आहेत ते सर्व अकामहत श्रोत्रियास प्राप्त होतात, असें सांगितलें आहे. सद्रूपानें, चिद्रूपानें व आनंदरूपानें आपला आत्माच सर्वत्र स्थित आहे असें पाहणाऱ्या योग्यास सर्व भोक्तृत्व सहज प्राप्त आहे, या अभिप्रायानें "मी अन्न आहें व मीच अन्नाद (आहें म्हणजे भोग्य व भोक्ता मीच आहें)" असा विद्वनांचा अनुभव श्रुतीनें सांगितला आहे. तात्पर्य विद्वानांस त्रिविध सर्व कामावाप्ति प्राप्त होतें.

त्याच्या कृतकृत्यतेचेंही स्मृतीमध्यें असें वर्णन आढळतें:—"ज्ञानामृतानें तृप्त झालेल्या व त्यामुळेंच कृतकृत्य योग्यास कांहीं एक कर्तव्य नसतें. ज्याला कांहीं कर्तव्य असतें तो तत्त्ववेत्ताच नव्हे, असें समजावें. त्याचप्रमाणें जो आत्म्यामध्यें रत होणारा, आत्म्यामध्येंच तृप्त होऊन राहणारा व आत्म्यामध्येंच संतुष्ट होणारा असतो त्यास कांहीं कर्तव्य नसतें." इत्यादि

त्याच्या प्राप्तप्राप्यतेचेंही वर्णन श्रुतींत असें केलें आहे "हे जनका, तूं अभयास (ब्रह्मास) प्राप्त झाला आहेस." "यास्तव तें सर्व तो झाला" "ब्रह्मज्ञ ब्रह्मच होतो." इत्यादि.

येथें कोणी ह्मणेल कीं दुःखनाश व सुखाविर्भाव हीं दोन्हीं तत्त्वज्ञानाच्या योगानेंच सिद्ध होतात, यास्तव त्यांस जीवन्मुक्तीचीं प्रयोजनें ह्मणणें योग्य नाहीं. पण तें बरोबर नाहीं; कारण सुरक्षित दुःखनाश व सुरक्षित सुखाविर्भाव जीवन्मुक्तीचें प्रयोजन आहे, असें आमचें ह्मणणें आहे. तत्त्वज्ञान पूर्वीं उत्पन्न झालेलें असलें तरी जीवन्मुक्तीच्या योगानें तें जसें सुरक्षित होतें त्याप्रमाणें तीं दोन्हीं जीवन्मुक्तीमुळें सुरक्षित होतात. जीवन्मुक्तीचीं अशीं पांच प्रयोजनें असल्यामुळें समाहित योगीश्वर लोक-व्यवहार करणाऱ्या तत्त्ववेत्त्याहून श्रेष्ठ आहे, असें ह्मटलें पाहिजे. पण—

श्रीरामः—भगवन्, कांहीं तत्त्ववेत्ते व्यवहार करीत असूनही चित्तांत अगदीं शांत असतात. व कित्येक एकांतांत बसून सर्व व्यवहार सोडून समाधिनिष्ठ होऊन राहतात, त्यांतील श्रेष्ठ कोणते? श्रीवसिष्ठः—रामा, सत्त्वादि गुण व त्यांचें सुखदुःखादि परिणाम यांचा अनात्मवस्तूशींच संबंध असतो; आत्म्याशी

त्याचा कांहीं संबंध नाहीं. असें पहाणाऱ्या विद्वानांची जी अंतःशीतलता तीच समाधि होय. तत्त्ववेत्ते दृश्यार्शी माझा कांहीं संबंध नाहीं असें जाणत असतात. व या निश्चयामुळेंच ते चित्तांत शांत असतात, पण त्यांतील कित्येक व्यवहार करितात व कित्येक ध्यानपरायण होऊन रहातात. रामा, अंत:करणांत अति शीतल असणारे ते दोघेही अगदीं सारखेच आहेत. त्यांतील कोणालाही न्यून किंवा अधिक ह्मणतां येत नाहीं. कारण अतःशीतलता हें अनंत तपाचें फल आहे.

या प्रश्नोत्तरांत त्याचा निर्णय केलेला असल्यामुळें जीवन्मुक्त योगीश्वर लोकव्यवहार करणाऱ्या तत्त्ववेत्त्याहून श्रेष्ठ आहे, असें ह्मणतां येत नाहीं-असें कोणी ह्मणेल, पण तें बरोबर नाहीं; कारण या वसिष्ठांच्या उत्तरांत वासना-क्षयरूप अंतःशीलत्व अवश्य संपादन करावें, एवढेंच सांगितलें आहे. त्यानंतर होणाऱ्या मनोनाशाचें कांहीं त्यांत निवारण केलेलें नाहीं. तृष्णेची शांति हीच अंतःशीतलता, असें वसिष्ठांच्या वचनावरूनच स्पष्ट होत आहे. कारण " अंतः-शीतलता प्राप्त झाली ह्मणजे जग शीतल होतें, पण जे चित्तांत तृष्णेनें संतप्त झालेले असतात त्यांना हें जग दावाग्नी( वणव्या )सारखें भासतें " असें पुढें त्यांनींच सांगितलें आहे. आतां " समाधिस्थ पुरुषाचें चित्त जर वृत्तींच्या योगानें चंचल होत असेल तर ती त्याची समाधि वेड्याच्या नाचण्याप्रमाणेंच आहे. पण वेड्याप्रमाणें नाचत असतांनाही जर एकाद्याचें चित्त वासनारहित असेल तर तें त्याचें नृत्यही ब्रह्मसमाधीच्या बरोबर आहे. " असें वसिष्ठांचें वचन आहे. पण त्यांत समाधीचें प्रशस्तत्व मान्य करून वासनेची निंदा केली आहे, हें विसरतां कामा नये. त्या वचनांचा गूढाभिप्राय असा आहे. व्यवहाराहून समाधि प्रशस्त आहे यांत कांहीं संशय नाहीं. पण ती जर वासनायुक्त असेल तर वासनाशून्य व्यवहाराहून ती अधमच होय. पण योगी व व्यवहारी हे दोघेही जेव्हां अतत्त्वज्ञ व वासनासंपन्न असतात तेव्हां व्यवहारी पुरुषाहून योगी श्रेष्ठ आहे, असें म्हणावें लागतें. कारण त्याची समाधि वासनायुक्त जरी असली तरी ती उत्तम लोक देणाऱ्या पुण्यास उत्पन्न करीत असते. तसेच ते दोघेही जेव्हां ज्ञाननिष्ठ व वासनाशून्य असतात, तेव्हां वासनाक्षयरूपी जीवन्मुक्तीचें परिपालन करणारी ही मनोनाशरूपी समाधि प्रशस्त आहे. ह्मणजे अशा प्रसंगीं व्यवहारी तत्त्वज्ञापेक्षां योगीच

श्रेष्ठ आहे. सारांश, येणेप्रमाणें पांच प्रयोजनांनीं युक्त असलेल्या जीवन्मुक्तीस कांहीं प्रत्यवाय येत नाहीं, हें सिद्ध झालें.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत जीवन्मुक्तिविवेकसाराचें चवथें प्रकरण समाप्त झालें.

---

## अथ पञ्चमं विद्वत्संन्यासप्रकरणम् ।

श्रीगणेशाय नमः । श्रीशंकराचार्यचरणकमलाभ्यां नमः । आतां जीवन्मुक्तीच्या अत्यंतोपकारक विद्वत्संन्यासाचें निरूपण करितों. परमहंसोपनिषदांत त्याचें प्रतिपादन केलें आहे. यास्तव त्या उपनिषदाचाच सारांश येथें देतों.– प्रथमत: नारद ब्रह्मदेवाकडे जाऊन "परमहंस योग्यांचा मार्ग कोणता व त्यांची स्थिति कशी असते ?" असा प्रश्न विचारिता झाला. या वाक्यांत विद्वत्संन्यासाविषयीं प्रश्न केला आहे. ज्याला वेदान्तश्रवणादिकांच्या योगानें तत्त्वज्ञान झालेलें असतें, पण लोक व्यवहारामुळें चित्तास विक्षेप होत असल्याकारणानें मनोविश्रांति मिळत नाहीं; त्यास मनोविश्रांतीची उत्कट इच्छा होते. असला पुरुष विद्वत्संन्यासाचा अधिकारी आहे. अशा अधिकाऱ्यास उद्देशून नारदांनीं प्रश्न केला आहे. प्रश्नामध्यें योगी व परमहंस अशीं दोन पदें योजिलीं आहेत; कारण केवळ योगी किंवा केवल परमहंस विद्वत्संन्यासाचा मुख्य अधिकारी नसतो. केवल योग्यास तत्त्वज्ञान नसतें. त्यामुळें त्रिकाळ ज्ञान, आकाशगमन इत्यादि योगैश्वर्य व चमत्कार यांमध्यें तो आसक्त होतो; आणि यमनियमादिकांच्या अनुष्ठानांतच गढून जातो. पण त्यामुळेंच तो परम पुरुषार्थापासून भ्रष्ट होत असतो. योगदर्शनांतही याविषयीं असेंच सांगितलें आहे व त्याचा आम्ही वर (प्रक. ३ रें) निर्देश केला आहे. तसेंच, केवल परमहंस जो असतो तो ऐश्वर्य असार आहे, असें समजून त्याविषयीं विरक्त होतो हें खरें; पण तो ब्रह्मविद्येच्या दर्पानें विधिनिषेधांचें उल्लंघन करूं लागतो, व "निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः" हें आचार्यांचें वचन आपला दोष झांकण्याकरितां पुढें करितो. पण त्यामुळें श्रद्धाळु शिष्ट त्याची—

सर्वे ब्रह्म वदिष्यन्ति संप्राप्ते तु कलौ युगे ।
नानुतिष्ठन्ति मैत्रेय शिश्नोदरपरायणाः ॥ १ ॥

असें ह्मणून निंदा करितात. "कलियुग लागल्यावर सर्व वेदान्ती ब्रह्मनिरूपण लांबलचक करतील. पण शिश्नोदरपरायण झाल्यामुळें अनुष्ठान कोणी करणार नाहींत." असा या वचनाचा सारांश आहे. असो. परमहंस योग्यामध्यें हीं दोन्हीं मर्मे नसतात. उलट त्यामध्यें आणखी एक विशेष असतो. त्याविषयीं श्रीरामानें प्रश्न केला असतां श्रीवसिष्ठ ह्मणतात:—ज्ञानी नित्य तृप्त व प्रशांतात्मा असतो, त्याची बुद्धि आत्म्यामध्येंच स्थिर रहाते. मंत्रतंत्रादिकांनीं सिद्ध होणाऱ्या सिद्धींचा त्यास मुळींच चमत्कार वाटत नाहीं. इतरांपेक्षां ज्ञानीपुरुषामध्यें जो विशेष असतो तो हाच कीं—कोणत्याही वस्तूचे ठायीं आस्था न ठेविल्यामुळें त्याचें मन तृष्णारहित व निर्मल असतें. ज्याचा संसारभ्रम नाहींसा झाला आहे त्या आत्मज्ञ पुरुषाचा काम, क्रोध, विषाद, मोह, लोभ व आपत्ति यांचा प्रत्यहीं अधिकाधिक क्षय होत असतो. इत्यादि. सारांश येथें सांगितलेल्या या विशेषानें युक्त असलेल्या व वरील दोन दोषांनीं रहित असलेल्या योगी परमहंसाचा मार्ग व स्थिति यांविषयीं नारदांनीं वरील वाक्यांत प्रश्न केला आहे. वेष, भाषा इत्यादि व्यवहारास येथें मार्ग असें ह्मटलें आहे. व चित्तशांतिरूप आंतर धर्मास स्थिति असें ह्मटलें आहे. असो; नारदांनीं असा प्रश्न केला असतां विवक्षित मार्गाविषयीं परम श्रद्धा उत्पन्न करण्याकरितां ब्रह्मदेव अगोदर त्याची स्तुति करूं लागले. हा परमहंसाचा मार्ग लोकांत अत्यंत दुर्लभ आहे. त्यामुळें त्याचा प्रचार फारसा आढळत नाहीं." कारण या मुख्य मार्गांत स्वशरीरभोग व लोकोपकार यांची त्या योगी परमहंसाला अपेक्षा नसते. पण अशा प्रकारचे पराकाष्ठेस पोंचलेलें वैराग्य फारच दुर्लभ आहे. त्यामुळें हा मार्गही दुर्लभ झाला आहे. तरी पण त्याचा अगदींच अभाव झालेला नाहीं. यावर कोणी म्हणेल कीं, अशा दुर्लभ, प्रयाससाध्य व निष्प्रयोजन मार्गाचा काय उपयोग? तर तें बरोबर नाहीं.—कारण श्रुति म्हणते—" एक जरी असा पुरुष झाला, तरी तोच परमात्म्यामध्यें स्थित आहे व तोच वेदपुरुष आहे, असें विद्वान् समजतात." भगवानांनींही श्रीगीतेंत "सहस्रावधि मनुष्यांतील कोणी एखादाच सिद्धीकरितां प्रयत्न करितो. व प्रयत्न करणाऱ्या सिद्धांतील कोणी एकादाच मला तत्त्वतः जाणतो." असें म्हटलें आहे. वरील श्रुतीच्या अर्थांत "तोच" असा शब्द आला आहे. त्यांतील "च" या अव्ययावरून केवल योगी व केवल परमहंस यांची व्यावृत्ति होते, असें समजावें. कारण केवल योगी परमात्म्यास जाणत नाहीं

व केवल परमहंस परमात्म्यास जरी जाणत असला तरी त्याच्या चित्तास विश्रांति नसल्यामुळें तो बहिर्मुख असतो; त्यामुळें ब्रह्मामध्यें त्याची स्थिति होत नाहीं. वेदप्रतिपाद्य पुरुषास वेदपुरुष म्हणतात. सारांश ब्रह्मानुभव व चित्तविश्रांति यांचें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांत पारंगत असलेले विद्वान् परमहंस योगी ब्रह्मनिष्ठ आहे असें समजतात. पण स्वतः ब्रह्मनिष्ठांस तेंही सहन होत नाहीं. तर ते " सर्व विकल्प सोडून केवलरूपानें रहाणारा ब्रह्मवेत्ता स्वतः ब्रह्मच आहे " असें समजतात. तस्मात् हा मार्ग दुर्लभ व प्रयाससाध्य जरी असला तरी त्याचें प्रयोजन नाहीं, असें ह्मणणें योग्य नव्हे. असो; आतां प्रजापति तो परमात्म्यामध्यें स्थित व वेदपुरुष कसा हें प्रत्यक्ष शब्दांनीं स्पष्ट सांगून योगी परमहंसाची स्थिति अर्थतः सुचवितात. " तो महापुरुष आपलें चित्त सदां माझ्या ठायीं स्थिर करितो. त्यामुळें मीही त्याच्याच ठायीं रहातों. " वैदिक ज्ञान व कर्म यांच्या अधिकारी पुरुषांमध्यें परमहंस योगी उत्तम आहे. ह्मणून त्यास या श्रुतीनें महापुरुष असें ह्मटलें आहे. त्याच्या संसारांतील पदार्थांविषयींच्या सर्व चित्तवृत्ति, अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें, निरुद्ध झालेल्या असतात. ह्मणून भगवान् प्रजापति शास्त्रसिद्ध परमात्म्याचा स्वानुभवानें परामर्श करून माझ्या ठायीं त्याचें चित्त असतें,—असें ह्मणतात. ज्याअर्थीं योगी आपलें चित्त माझ्या ठायींच स्थापित करितो त्याअर्थीं मी सुद्धां परमात्मरूपानें त्याच योग्याच्या ठायीं प्रकट होऊन रहातों. इतर अज्ञांच्या ठायीं मी रहात नाहीं. कारण ते अविद्या—आवृत असतात. जे तत्त्वज्ञ पुरुष योगी नसतात, ते बाह्यचित्तवृत्तींनीं आवृत झालेले असतात. ह्मणून त्यांच्या चित्तांतही मी प्रकट होत नाहीं. असो; आतां " मार्ग कोणता " असा जो नारदांनीं प्रश्न केला होता त्याचें स्पष्ट उत्तर देतात. " हा परमहंस आपला पुत्र, मित्र, स्त्री, बांधव इत्यादि; शिखा ( शेंडी ) यज्ञोपवीत, स्वाध्याय ( उपनिषदावाचून इतर वेदशास्त्रांचें अध्ययन ), सर्व कर्में व ब्रह्मांड यांचा त्याग करून स्वशरीरभोगार्थ व लोकोपकारार्थ कौपीन, दंड व आच्छादन यांचें ग्रहण करितो." एकाद्या गृहस्थास, पूर्व पुण्यकर्मांचा समूह फलोन्मुख झाल्यामुळें, श्रवणादि साधनांचें अनुष्ठान करावें, अशी इच्छा होते. पण माता, पिता, स्त्री, पुत्र, ज्ञातीचे लोक इत्यादिकांच्या प्रतिबंधामुळें विविदिषा संन्यास करितां येत नाहीं. तरी पण त्या आश्रमांत राहूनच तो वेदान्तश्रवण, मनन व निदिध्यासन करितो. त्यामुळें त्यास तत्त्वसाक्षात्कार होतो. पण पुढें गृहस्था-

श्रमांत अवश्य करावयास लागणाऱ्या लौकिक व वैदिक शेंकडों व्यापारामुळें त्याचें चित्त विक्षिप्त होतें. त्यामुळें त्यास असह्य दुःख होतें. नंतर चित्त शांत व्हावें ह्मणून तो विद्वत्संन्यास करण्याची इच्छा धरतो. अशा पुरुषास उद्देशून "आपला पुत्र, मित्र" इत्यादि वरील श्रुतिवचनांत ह्मटलें आहे. कारण प्रथम विविदिषासंन्यास करून तत्त्वज्ञान झाल्यावर विद्वत्संन्यास करणारास पुत्रादिकांची प्राप्तिच नसते. यावर कोणी विचारील कीं हा विद्वत्संन्यास इतर संन्यासाप्रमाणें प्रैषोच्चार करणें, इत्यादि शास्त्रोक्त प्रकारानेंच संपादन करावा लागतो, कीं जुनें वस्त्र, उपद्रव होत असलेलें स्थान इत्यादिकांच्या त्यागाप्रमाणेंच केवल लौकिक त्यागानें तो संपादित होतो? तत्त्ववेत्त्याला कर्तृत्वाचा अभिमान नसल्यामुळें, ह्मणजे मी कर्ता आहें, असें तो मानीत नसल्यामुळें त्यास विधिनिषेधांचा अधिकार नसतो. यास्तव पहिला पक्ष घेतां येत नाहीं, एवढ्यासाठींच "ज्ञानामृतानें तृप्त व कृतकृत्य झालेल्या योग्यास कांहीं एक कर्तव्य नसतें व ज्यास कांहीं कर्तव्य असतें तो तत्त्ववेत्ताच नव्हे." असें स्मृतींत ह्मटलें आहे व त्याचा वर एकदां तुह्मींही उल्लेख केला आहे. आतां दुसरा पक्ष घेतल्यास ह्मणजे विद्वत्संन्यास लौकिक त्यागानेंच संपादन होतो. असें ह्मटल्यास, कौपीन, दंड इत्यादि आश्रमचिन्हांचें विधान वरील वाक्यांत केलें आहे, तें जुळत नाहीं. तेव्हां या अडचणींतून कसें पार व्हावयाचें? याचें उत्तर असें—प्रतिपत्तिकर्माप्रमाणें विद्वत्संन्यास विधिरूप व लौकिकत्यागरूपही आहे. ज्योतिष्टोम यज्ञांत ज्यानें दीक्षा घेतलेली असते त्यास दीक्षांग नियमांच्या अनुष्ठानसमयीं हातानें अंग खाजविण्याचा निषेध करून, अंगास खाज सुटल्यास कृष्णमृगाच्या शिंगानें खाजवावें, असें सांगितलें आहे. पण दीक्षानियम समाप्त झाला असतां त्या शिंगाचा त्याग सहजच प्राप्त होतो. कारण यज्ञसमाप्तीनंतर त्याचा कांहीं उपयोग नसतो. पण वेदानें त्याचा त्याग अमुक वेळींच करावा, असें विधान केलें आहे. ह्मणजे "दक्षिणा देऊन झाली कीं मग यजमान तें शिंग चव्हाट्यावर टाकितो" अशा रीतीनें वेदांत त्याचा विधि सांगितला आहे. हें प्रतिपत्ति कर्म लौकिक व वैदिकही आहे. त्याचप्रमाणें विद्वत्संन्यासही उभयरूप आहे असें समजावें. तत्त्ववेत्त्यामध्यें कर्तृत्व मुळींच नसतें, असें ह्मणतां येत नाहीं. कारण चैतन्य-आत्म्याच्या ठायीं कल्पिलेलें (आरोपित) कर्तृत्व जरी विद्येच्या योगानें क्षीण झालेलें असलें तरी चिदाभासानें युक्त असलेल्या व

सहस्रावधि विकारांनीं भरलेल्या अंतःकरणांतील स्वाभाविक कर्तृत्व नाहींसें होणें शक्य नाहीं. कारण स्वाभाविक धर्म, धर्मी वस्तु असे पर्यंत नाहींसा होत नाहीं. अग्नि विद्यमान असे तोंपर्यंत दाहशक्ति अगदीं नाहींशी होत नाहीं. तर मग—वरील स्मृतिवचनांशीं विरोध येईल—ही भीतिही व्यर्थ आहे. कारण जरी आत्मज्ञान झालें तरी चित्तास शांति नसल्यास तृप्ति होत नाहीं. त्यामुळें चित्तशांतीच्या उपायांचें अनुष्ठान कर्तव्य असतें. ह्मणून तो कृतकृत्य नव्हे. आतां तत्त्ववेत्त्याला शास्त्रविधि आहे, असें ह्मटल्यास, त्याच्या अनुष्ठानामुळें उत्पन्न होणारें पुण्यरूप अपूर्व ( अदृष्ट ) त्यास आणखी जन्म देईल, असें ह्मणण्याचेंही कांहीं कारण नाहीं. कारण त्या अपूर्वाचें—चित्ताच्या विश्रांतीस प्रतिबंध करणाऱ्या दोषांचें निवारण करणें—हे प्रत्यक्ष फल असतांना अदृष्ट ( अप्रत्यक्ष ) फलाची कल्पना करणें बरोबर नाहीं. नाहींतर श्रवणादि विधीचेंही ब्रह्मज्ञानोत्पत्तीस प्रतिबंध करणारांचें निवारण करणें, हें प्रत्यक्ष फल सोडून जन्मांतरास कारण होणें, हें अदृष्ट फल कल्पावें लागेल. यास्तव तत्त्वज्ञाला विधि आहे, असें मानण्यांत कांहीं दोष नाहीं. ह्मणून विविदिषूप्रमाणें विद्वान् गृहस्थानेंही नान्दीमुख श्राद्ध, उपवास, जागरण, इत्यादि विधींस अनुसरूनच संन्यास घ्यावा. वरील उपनिषद्वाक्यांत श्राद्धादिकांचा जरी उल्लेख केलेला नाहीं, तरी विद्वत्संन्यासही विविदिषा संन्यासाची विकृति असल्यामुळें व " प्रकृतीप्रमाणें विकृति करावी " असा मीमांसेचा नियम असल्यामुळें विविदिषासंन्यासाचे सर्व धर्म येथें करावे. ज्या कर्मांचीं सर्व अंगें प्रत्यक्ष वचनांनीं सांगितलेलीं असतात तीं कर्में प्रकृति व कांहीं विशेष अनुष्ठानाचा प्रयक्ष उपदेश करून " इतर सर्व अनुष्ठान असुक कर्मांप्रमाणें करावें " असें ज्याच्याविषयीं सांगितलेलें असतें, तें कर्म, ज्याच्याप्रमाणें तें करावें ह्मणून ह्मटलेलें असतें त्याची विकृति असतें. या न्यायानें अग्निष्टोमादि यज्ञांच्या अतिरात्रादि यज्ञ विकृती आहेत. म्हणून अग्निष्टोमाचे धर्म अतिरात्रादिकांत प्राप्त होतात. यास्तव इतर संन्यासाप्रमाणें विद्वत्संन्यास घेतांनाही प्रैषमंत्रानें पुत्रमित्रादिकांच्या त्यागाचा संकल्प करावा. वरील वचनांत " बांधव इत्यादि " येथें जो आदिशब्द आहे त्यावरून सेवक पशु, गृह, क्षेत्र, इत्यादि लौकिक पदार्थ घ्यावे. उपनिषदांवांचून इतर वेदाध्ययन व शास्त्राध्ययन यांचा त्याग करावा; असें वर सुचविलें आहे. पण त्याबरोबर वेदार्थोपयोगी सर्व उपकरणांचाही त्याग करावा असें समजावें.

काव्यनाटकादिकांचें तर नांवही घेणें अयोग्य आहे, सर्व कर्मांचा त्याग करावा असें ह्मटलें आहे. त्यावरून सर्व लौकिक व वैदिक नित्य, नैमित्तिक, काम्य, व निषिद्ध कर्में सोडावीं–असें समजावें. पुत्रादिकांच्या त्यागाबरोबर सर्व ऐहिक भोगांचाही त्याग करावा. कर्मत्यागाचा उपदेश करून श्रुतिमाउलीनें चित्तांत विक्षेप उत्पन्न करणाऱ्या पारलौकिक भोगांच्या इच्छेचा परिहार करावयास सांगितलें आहे. आतां ब्रह्मांडाचा त्याग करावयाचा ह्मणजे काय ? म्हणून म्हणाल, तर सांगतों. विराड्रूप परमेश्वराची उपासना केली असतां ब्रह्मांडाची प्राप्ति होते, असें वेदांत सांगितलें आहे, यास्तव ब्रह्मांडाचा त्याग याचा अर्थ–विराटपुरुषाची उपासना, हिरण्यगर्भाची उपासना इत्यादि उपासनांचा त्याग–असा समजावा. फार काय पण विद्वत्संन्यास करणारास, तत्त्वज्ञानास कारण होणाऱ्या श्रवणादिकांचाही, त्याग केला पाहिजे. तात्पर्य स्वपुत्रापासून हिरण्यगर्भापर्यंत जितक्या प्रिय वस्तु आहेत व या सृष्टींत जेवढीं ह्मणून सुखसाधनें आहेत त्या सर्वांचा प्रैषमंत्रोच्चारानें त्याग करून, दोन लंगोट्या, एक वस्त्र, थंडीचें निवारण करणारी घोंगडी किंवा धाबळी व पादुका यांचा मात्र स्वीकार करावा. कारण स्वशरीरोपभोग व लोकोपकार हीं दोन प्रयोजनें त्यांच्या योगानें सिद्ध होतात. तीं कशीं ह्मणून ह्मणाल तर सांगतों—लंगोटीच्या योगानें लज्जारक्षण होणें, दंडाच्या योगानें गाय, बैल, सर्प इत्यादिकांच्या उपद्रवाचें निवारण होणें, आच्छादानाच्या योगानें शीतादिकांचा परिहार होणें व पादुकांच्या योगानें अशुद्ध पदार्थादिकांचा स्पर्श न होणें, हा शरीरोपभोग होय. दंडादि चिन्हांवरून हा उत्तम आश्रमसंपन्न आहे, असें समजून वंदन, भिक्षादान इत्यादिकांच्या योगानें लोकांस पुण्य संपादन करितां येतें. हा दंडादिकांमुळें होणारा लोकोपकार होय. शिवाय तसें करण्यानें शिष्टाचारप्राप्त आश्रममर्यादेचें पालन होतें. पण कौपीनादिकांचा स्वीकार करणें उचित आहे, एवढेंच येथें श्रुतीस सांगावयाचें आहे. तो मुख्य धर्म आहे, असें तिचें मुळींच म्हणणें नाहीं. कारण “ कौपीनादिकांचा स्वीकार करणें हा या योगी परमहंसाचा मुख्य कल्प नव्हे. तर तो अनुकल्प आहे. ” असें याच उपनिषदांत लागलेंच पुढें म्हटलें आहे. विविदिषा संन्याशाला दंडग्रहण करणें मुख्य आहे. आणि त्याकरितांच “ त्यानें दंडावांचून तीन बाणांच्या टप्याच्या बाहेर जाऊं नये ” असें म्हटलें आहे, व दंडाचा नाश झाल्यास त्याला प्रायश्चित्तार्थ शंभर प्राणायाम करावयास सांगितलें आहे, असो; तर मग परमहंस योग्याचा

मुख्य कल्प कोणता तें स्वतः श्रुती सांगत आहे. “ मुख्य कल्प कोणता म्हणाल, तर हा मुख्य आहे—दंड नाहीं; शिखा नाहीं; यज्ञोपवीत नाहीं; आच्छादन नाहीं; अशा रीतीनें परमहंस रहातो.” ज्याप्रमाणें विविदिषु परमहंस शिखायज्ञोपवीतरहित असतो त्याप्रमाणें विद्वान् परमहंसानें दंड, आच्छादन इत्यादिकांनीं रहित असावें. कारण दंड, कंथा इत्यादिकांचें ग्रहण करावयाचें म्हणून म्हटलें कीं, तो बांबूचा आहे कीं नाहीं ? कंथा लोंकरीची आहे कीं नाहीं, इत्यादि परीक्षण करावयाचा प्रसंग आलाच. चित्त परीक्षणाकडे लागलें कीं तें विक्षित झाल्यावांचून बिलकूल रहात नाहीं. यास्तव चित्तांत यत्किंचित्‌ही विक्षेप उत्पन्न करणाऱ्या त्यांचा त्यागच करणें हितकर आहे. पण कंथा इत्यादिकांचा त्याग केल्यावर शीतनिवारण कसें होणार, ह्मणून कोणी ह्मणतील यास्तव “ त्याला शीत नाहीं, उष्ण नाहीं, सुख नाहीं, दुःख नाहीं व मानावमानही नाहींत. तर तो षडूर्मिरहित असतो ” असें श्रुतीनें सांगितलें आहे. ज्यानें आपल्या सर्व चित्तवृत्तींचा निरोध केला आहे, अशा त्या योगी परमहंसास थंडीचें मुळींच भान होत नाहीं. खेळण्यांत गुंतलेल्या बालकाच्या अंगावर वस्त्र नसलें तरी त्यास थंडीचें भान होत नाहीं तर ऐन थंडीच्या दिवसांतही प्रातःकालीं तो उघडाबाघडाच खेळत रहातो, हें प्रायः सर्व कुटुंबी लोकांस ठाऊक आहेच. त्याप्रमाणेंच परमात्म्यामध्यें ज्याचें चित्त आसक्त झालेलें असतें त्यास थंडीच्या दिवसांत थंडी, उष्णकालीं उष्ण व वर्षाकालीं वृष्टि भासत नाहीं. शीतोष्णाची प्रतीति न आल्यामुळें त्यास सुखदुःखही होत नाहीं. कारण ग्रीष्म—ऋतूंत थंड वस्तूंपासून सामान्यतः सुख होतें व हेमंतादि दोन ऋतूंत उष्ण सुखकारक वाटतें. त्याचप्रमाणे ग्रीष्मांत उष्णतेमुळें क्लेश होतात व थंडीच्या दिवसांत थंड वस्तूपासून दुःख होतें. पण योग्यास त्यांचा अनुभवच येत नसल्यामुळें सुखादिही होत नाहीं. दुसऱ्या कोणी केलेल्या सत्कारास मान व तिरस्कारास अवमान म्हणतात. पण हा योगी परमहंस आपल्याहून निराळा दुसरा कोणी आहे, असेंच जर समजत नाहीं, तर मग मानावमानांस कोठून जाणणार ! तात्पर्य शत्रु, मित्र, राग, द्वेष इत्यादिकांतील एकही भाव त्याच्या ठायीं नसतो. क्षुत्पिपासा ( भूक व तहान), शोकमोह व जरामरण या तीन जोड्या मिळून सहा ऊर्मि होतात. त्यांतील पहिली जोडी हा प्राणांचा धर्म आहे; दुसरी मनाचा धर्म आहे व तिसरी

१०–५८६–२०००

देहधर्म आहे. यास्तव आत्मतत्त्वाभिमुख झालेल्या परमहंसास त्यांची पीडा न होणें साहजिक आहे.

आतां समाधि-अवस्थेंत त्याला शीतादिकांचें भान जरी न झालें तरी व्युत्थानदशेंत इतर संसारी पुरुषांप्रमाणें लोकांनीं केलेली निंदा इत्यादिकामुळें क्लेश होणें साहजिक आहे—असें कोणास वाटेल; ह्मणून श्रुति ह्मणते—" निंदा, गर्व, मत्सर, दंभ, दर्प, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, काम, क्रोध, लोभ, मोह, हर्ष, असूया व अहंकार इत्यादिकांचा त्याग करून " विरोधी पुरुषांनीं दिलेल्या दोषास निंदा ह्मणतात. इतरापेक्षां मी अधिक आहें, असें समजणाऱ्या चित्तवृत्तीस गर्व म्हणतात. विद्या, धन इत्यादिकांनीं मी दुसऱ्यासारखा होईन अशा बुद्धीस मत्सर म्हणतात. दुसऱ्याच्यापुढें जप, ध्यान इत्यादिकांचा आविर्भाव करून आपलें धार्मिकत्व व्यक्त करणें, हा दंभ होय. दुसऱ्यास तुच्छ मानण्याचा जो दृढ निश्चय त्यास दर्प म्हणावें. धनादिकांचा अभिलाष हीच इच्छा होय. शत्रूचा वध करावा इत्यादिप्रकारची जी क्रूर बुद्धि तोच द्वेष होय. द्रव्यादि अनुकूल वस्तूंचा लाभ झाला असता बुद्धि स्वस्थ होते. त्या स्वास्थ्यास सुख म्हणतात. दुःख याच्या अगदीं उलट असतें. म्हणजे प्रतिकूल अवस्थेचा लाभ झाला असतां—होणारें जें बुद्धीचें अस्वास्थ्य त्यास दुःख म्हणतात. स्त्रीविषयीं जो अभिलाष त्यास काम म्हणतात. इष्ट वस्तूच्या प्राप्तीस कांहीं प्रतिबंध झाला असतां उद्भवणारी जी संतापरूप चित्तवृत्ति तिला क्रोध म्हणतात. प्राप्त झालेल्या धनादि वस्तूंचा वियोग सहन न होणें यास लोभ म्हणतात. हितकर पदार्थांस अहितकर समजणें व अहितकर पदार्थांस हितकर समजणें हा मोह होय. चित्तांतील सुख व्यक्त करणारी व सुखाच्या विकासास कारण होणारी जी चित्तवृत्ति तिला हर्ष म्हणतात. दुसऱ्याच्या गुणांमध्यें दोषारोप करणें ही असूया व देह, इंद्रियें इत्यादिकांच्या समूहास हाच आत्मा असें समजणें हा अहंकार आहे. श्रुतिवचनांतील इत्यादिशब्दावरून विषयांचे ठायीं ममता ठेवणें; ते सुंदर आहेत असें समजणें इत्यादि दुसऱ्या बंधोत्पादक वृत्ति घ्याव्या. निंदा—इत्यादिकांबरोबर त्यांच्या विरुद्ध असलेल्या स्तुति—इत्यादिकांचाही त्याग करावा. सारांश, मागें सांगितलेल्या वासनाक्षयाचा अभ्यास करून निंदा—इत्यादि या सर्व चित्तदोषांचा त्याग करावा. पण देह असेपर्यंत त्यांचा त्याग करितां येणें शक्य नाहीं, असें कोणास वाटेल, म्हणून श्रुति म्हणते " ज्याअर्थी शरीर चिदात्म्याहून भिन्न

केलेलें असतें, त्याअर्थी ज्ञानी स्वशरीरास शवाप्रमाणें पहातो " आत्मज्ञान होण्याच्या पूर्वी आपलें म्हणून जें वाटत असतें तेंच शरीर आत्मज्ञानानंतर चैतन्याहून अगदीं भिन्न आहे, असें समजल्यामुळें ज्ञान्यास तें प्रेतासारिखें दिसूं लागतें. ज्याप्रमाणें एकादा श्रद्धालु कर्मठ, आपणास शवाचा स्पर्श होईल या भीतीनें दुरूनच त्यास पहातो त्याप्रमाणें हा ज्ञानी शरीर व आत्मा यांचा ऐक्यभ्रम होईल या भीतीनें सावधानचित्तानें शरीरास चिदात्म्याहून नेहमीं अगदीं भिन्न समजतो आणि तें चिदात्म्याहून निराळें आहे, असें जाणल्यानें तें ( शरीर ) चैतन्यरहित शवाप्रमाणेंच अमंगल आहे, असा याचा दृढ निश्चय होतो. त्यामुळें शरीर विद्यमान असतांनाही त्यास निंदा, स्तुति इत्यादिकांचा त्याग करितां येतो. एकाद्यास रात्रीं, आकाशांत मेघ असल्यामुळें दिशाविषयीं झालेला भ्रम सकाळीं सूर्य उगवला कीं नाहींसा होतो खरा; पण तो पुनः होणेंही संभवनीय असतें. त्याप्रमाणें देहच आत्मा आहे, असा भ्रम आत्मज्ञासही पुनरपि होणें शक्य आहे व त्यामुळें त्यास निंदादिकांमुळें क्लेश होणेंही साहजिक आहे, असें कोणी म्हणेल म्हणून श्रुति म्हणते " संशयज्ञान, विपरीतज्ञान व मिथ्याज्ञान यांचा जो हेतु त्यापासून नित्यनिवृत्त, तन्नित्यबोध व स्वरूपावस्थितिसंपन्न असें त्यानें व्हावें. " आत्मा कर्तृत्वादि धर्मयुक्त आहे कीं त्यांनीं रहित आहे ? हें संशयज्ञान व तो देहादिरूपच आहे, हें विपरीतज्ञान होय. पण हें दोन्ही प्रकारचें ज्ञान भोक्त्याविषयीं आहे. येथील मिथ्याज्ञान या शब्दानें भोग्याविषयींचें मिथ्याज्ञान घ्यावें. तें अनेक प्रकारचें आहे, व त्याचें स्पष्टीकरण " संकल्पापासून उद्भवणाऱ्या सर्व कामांचा पूर्णपणें त्याग करून " इत्यादि वाक्यांनीं वर ( प्र. ३ रें पृष्ठ १०४ ) केलें आहे. त्या मिथ्याज्ञानाचा हेतु चार प्रकारचा आहे. " अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या " या योग सूत्रांत त्याचा स्पष्टपणें निर्देश केला आहे. १ पर्वत, नद्या, समुद्र, इत्यादि अनित्य पदार्थांचे ठायीं नित्यत्वाची भ्रांति होणें; २ स्त्री, पुत्र, इत्यादिकांच्या अपवित्र शरीराचे ठायीं पवित्रतेची भ्रांति होणें; ३ कृषि ( शेती ), वाणिज्य ( व्यापार ) इत्यादि दुःखकर उद्यमांमध्यें सुखभ्रांति होणें व ४ गौण आणि मिथ्या आत्म्याचे ठायीं ह्मणजे पुत्र व देह यांच्या ठायीं मुख्य आत्म्याची भ्रांति होणें, अशी ही चार प्रकारची अविद्या आहे व तीच मिथ्याज्ञानाची जननी होय. असो; वर श्रुतींत सांगितलेल्या त्रिविधज्ञानाचें कारण—अद्वितीय ब्रह्मात्मतत्त्वास आच्छादित

करणारें अज्ञान व त्याची वासना–हें आहे. परमहंस योग्याचें अज्ञान महावाक्यजन्य बोधानें निवृत्त झालेलें असतें, व त्याची अज्ञानवासना योगाभ्यासानें निवृत्त होते. शंका घेतांना उदाहरणार्थ दिलेल्या दिग्भ्रमाची सूर्यदर्शनानें जरी निवृत्ति झाली, तरी त्याच्या वासनेची निवृत्ति न झाल्यामुळें पुनरपि भ्रांति होणें शक्य असतें. पण परमहंस योग्याचे ठायीं तसा प्रकार संभवत नाहीं. कारण त्याच्या भ्रांतीचीं दोन्हीं कारणें निवृत्त झालेलीं असतात, व ती निवृत्ति क्षणिक नसते, तर नित्य असते. कारण अशा योग्यतेस चढलेला योगी चित्तविक्षेपाच्या सर्व निमित्तांस दूर सारून केवळ परमात्मचिंतन सतत करीत रहातो. त्यामुळें त्यास होणारा आत्मबोध नित्य व स्थिर असतो, अशा बोधाच्या योगानें होणारी अज्ञान–वासनानिवृत्तिही नित्यच असणार, हें उघड आहे शिवाय वेदान्तवाक्यावरून ज्ञात होणारा परमात्मा कोठें दूर असतो. व त्याचा येथें साक्षात्कार होणें अशक्य असतें, असें नाहीं; तर हा परमहंस तें तत्त्व मीच आहें, माझ्या साक्षिस्वरूपाहून तें निराळें नाहीं, असा निश्चय करून रहातो. आतां श्रुति त्याच्या ब्रह्मानुभावाचा प्रकार सांगते. "जो शांत (क्रोधादि विक्षेपरहित), अचल (गमनादि क्रियारहित) व अद्वयानन्दविज्ञानघन (स्वगत, सजातीय, विजातीय भेदशून्य अद्वितीय सच्चिदानंदैकरूप) परमात्मा आहे, तोच मी व तेंच परब्रह्म माझें परम धाम (वास्तविक स्वरूप) आहे." कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि हें माझें रूप नव्हे. कारण तें मायाकल्पित आहे, असें तो जाणतो. पण यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं, आत्मा जर परब्रह्मच आहे तर अज्ञान–अवस्थेंतही ब्रह्माच्या आनंदरूपतेची प्राप्ति कां होत नाहीं. ? याचें समाधान पुढील दोन श्लोकांत केलें आहे.–

> गवां सर्पिः शरीरस्थं न करोत्यङ्गपोषणम् ।
> तदेव कर्मरचितं पुनस्तस्यैव भेषजम् ॥ १ ॥
> एवं सर्वशरीरस्थः सर्पिर्वत्परमेश्वरः ।
> विना चोपासनं देवो न करोति हितं नृपु ॥ २ ॥

गायींच्या शरीरांत असलेलें तूप त्यांच्या अंगास पुष्ट करीत नाहीं. तेंच दुधाच्या रूपानें बाहेर काढून, तापवून, विरजून, घुसळून व कढवून त्याचें घृत केलें ह्मणजे तेंच त्या गायींच्या व इतर प्राण्यांच्याही शरीरास पुष्ट करणारें उत्तम औषध होतें. त्याचप्रमाणें परमेश्वर घृताप्रमाणें सर्व शरीरांत

आहे खरा; पण उपासनेनें त्यास प्रसन्न केल्यावांचून तो मनुष्यांचें हित करीत नाहीं १, २. यास्तव त्याच्या आनंदाच्या प्राप्तीकरितां शुद्ध भावनेनें त्याची उपासना केली पाहिजे. उपासना न केल्यामुळेंच आनंदाचा अनुभव येत नाहीं.

एकादे वेळीं असें होतें कीं, संन्यास घेतल्यावर, पूर्वाश्रमांतील कर्मठ व श्रद्धाजड गुरु, पिता, भ्राता इत्यादि आप्तजन 'अरे याला शिखा नाहीं; याच्या गळयांत यज्ञोपवीत नाहीं; हा पंचमहायज्ञ करीत नाहीं; हा धर्मभ्रष्ट, नास्तिक व पाखंडी झाला आहे.' असें बोलून त्यास मोह पाडितात. यास्तव तो निवृत्त व्हावा ह्मणून श्रुति विद्वान् योग्याचा निश्चय सांगते. "वेदांतवेद्य परब्रह्माचें जें ज्ञान तेंच कर्मांगभूत बाह्य शिखायज्ञोपवीतादि-स्थानीय होय." अर्थात् बाह्य शिखा इत्यादि साधनांच्या योगानें साध्य होणारीं जीं कर्में तीं स्वर्गादि देत असतात. पण स्वर्गादिकांच्या लाभामुळें होणारे सर्व आनंद ब्रह्मानंदांत येतात. ब्रह्मसाक्षात्कारानें होणारें सुख स्वर्गादि-सुखाहून अनंतपट अधिक असतें. ह्मणूनच विषयानंदांस शास्त्रकार लेश ह्मणतात. "याच ब्रह्मानंदाच्या अंशांवर सर्व भूतें आपली उपजीविका करितात" असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. ह्याच अभिप्रायानें ब्रह्मोपनिषदांत असें ह्मटलें आहे.–

"शिखेसह वपन करून बाह्य सूत्र, नदी, समुद्र इत्यादि पवित्र स्थळीं टाकावें. आणि अक्षर पर ब्रह्म हेंच सूत्र धारण करावें. स्वरूपसूचक अशा त्यासच सूत्र व परम पद ह्मणतात. अशा प्रकारच्या या सूत्राचा ज्याला साक्षात्कार झाला आहे तोच वेदपारंगत विप्र होय. दोऱ्यांत जसे माळेचे मणी ओंवलेले असतात त्याप्रमाणें हें सर्व चराचर वस्तुजात ज्याच्यामध्यें ओंवलेलें असतें तें सूत्र होय. तत्त्वज्ञानें बाह्य सूत्राच्या ठायीं त्यास धारण करावें." "मी ब्रह्म आहें, हें सूत्र जो धारण करितो तो सचेतन होय. याचें धारण केल्यानें ज्ञानी उच्छिष्ट किंवा अशुचि होत नाहीं. हृदयांत जे ज्ञानयज्ञोपवीत धारण करितात तेच सूत्रज्ञ व यज्ञोपवीतयुक्त होत. ज्ञान हेंच त्यांचें परम पद व ज्ञान हेंच पवित्र होय. अग्नीला जशी ज्वालारूपी शिखा असते त्याप्रमाणें ज्ञान्याला लांबलचक शिखा नसते, तर ज्ञान हीच त्याची शिखा होय. अशाप्रकारची शिखा धारण करणारासच शिखी ह्मणावें, डोक्यावर भाराभर केंस वाहणाऱ्यास शिखी ह्मणूं नये. कर्मांमध्यें निमग्न अस-

ज्ञान्या लोकांकरितांच ही बाह्य शिखा व सूत्र आहे. ज्ञान्यास आंतर शिखा व यज्ञोपवीत उक्त आहे. बाह्य शिखा इत्यादिकांच्या अभावीं त्यांचें ब्राह्मण्य नष्ट होत नाहीं. " इत्यादि.

तस्मात् योगी परमहंसास शिखा व यज्ञोपवीत हीं असतात. त्याचप्रमाणें संध्याही असते. शास्त्रगम्य परमात्मा व अहं ( मी ) या प्रत्ययावरून ज्ञात होणारा जीवात्मा यांचें ऐक्य आहे, ह्मणजे ते परस्पर भिन्न नाहींत, असें ज्ञान महावाक्यांवरून झालें असतां भ्रांतीनें भासणारा भेद विशेषेंकरून भग्न होतो; ह्मणजे पुनरपि त्याचा उद्भव होत नाहीं. अशाप्रकारची जी ही एकत्वबुद्धि ती उभय आत्म्यांच्या संधीमध्यें होत असल्यामुळें ज्ञान्याची तीच संध्या होय. दिवस व रात्र यांच्या संधीच्या वेळीं जें कर्म करितात ती संध्या होय, हें सर्वांस ठाऊक आहेच; सारांश, याप्रमाणें ज्ञानी पुरुषास कर्मठांचीं भाषणें ऐकून मोहित होण्याचें कांहीं कारण नाहीं. बाकी यथाशास्त्र संन्यास न घेतां जे गृहस्थ—आम्हीं ज्ञानी आहों, अशा मिथ्या अभिमानानें व शरीरास क्लेश होतील या भीतीनें—कर्में सोडितात, ते निंदेस पात्रच आहेत, हें येथें विसरतां कामां नये. असो; नारदांनीं जो परमहंसाच्या मार्गाविषयीं व स्थितीविषयीं प्रश्न केला होता त्याचें सक्षेपतः उत्तर देऊन व त्या उत्तराचाच आणखीं थोडासा अधिक विस्तार करून

सर्वान्कामान्परित्यज्य अद्वैते परमे स्थितिः ।

या वचनानें दुसऱ्या स्थितिविषयक प्रश्नाचा उपनिषदांत उपसंहार केला आहे. क्रोध—लोभादि दोष कामपूर्वक असतात. म्हणजे काम हा त्यांच्या मुळाशीं असतो. यास्तव कामाचा त्याग केला असतां सर्व चित्त दोषांचा त्याग केल्यासारखें होतें. म्हणूनच "काममयच हा पुरुष आहे" असें बृहदारण्यकांत म्हटलें आहे. तात्पर्य, निष्काम योग्याच्या चित्ताची स्थिति अद्वैतामध्यें निर्विघ्नपणें होऊं शकते

आतां दंडग्रहणविधिवासनेनें युक्त असलेले विविदिषासंन्यासी, दंडरहित योगी परमहंस आहे, असें मानीत नाहींत. यास्तव त्यांची शंका घालविण्याकरितां—

ज्ञानदण्डो धृतो येन एकदण्डी स उच्यते ।
काष्ठदण्डो धृतो येन सर्वाशी ज्ञानवर्जितः ॥ १ ॥

स याति नरकान्घोरान्महारौरवसंज्ञितान् ।
तितिक्षाज्ञानवैराग्यशमादिगुणवर्जितः ॥
भिक्षामात्रेण यो जीवेत्स पापी यतिवृत्तिहा ॥ २ ॥

असें श्रुतीनें म्हटलें आहे. या वचनांचा सारांश असाः—ज्यानें ज्ञानदण्ड धारण केला आहे त्याला एकदण्डी म्हणतात. पण काष्ठदंड धारण करून जो सर्वभक्षक व ज्ञानशून्य असतो तो महारौरवादि अनेक घोर नरकांस जातो. तितिक्षा, ज्ञान, वैराग्य, शमादि गुण इत्यादिकांनीं रहित असून जो केवल भिक्षेवर निर्वाह करितो तो पापी यतिवृत्तीचा नाश करणारा आहे. सारांश यतीचा वेष, केवल भिक्षा मिळविण्याकरितां नव्हे, तर तितिक्षा इत्यादि संपादन करण्याकरितां घ्यावयाचा असतो; हें प्रत्येक यतीनें ध्यानांत धरिलें पाहिजे.

असो; संन्याशांचा दंड दोन प्रकारचा असतो. एक ज्ञानदंड व दुसरा काष्ठदंड. त्रिदंडी संन्याशास मनूंनीं बाह्य तीन दंडांची अपेक्षा न धरितां वाग्दंड, मनोदंड व कर्मदंड असे आंतर तीन दंड सांगितले आहेत. व 'या तीन दंडांचा सर्व भूतांचे ठायीं उपयोग करून व कामक्रोधांचें नियमन करून मानव परमसिद्धीस प्राप्त होतो,' असेंही म्हटलें आहे. दक्षांनीं त्या तिन्ही दंडांचें स्वरूप सांगितलें आहे, तें असें—मौन हा वाग्दंड आहे. शरीराची चेष्टा न करणें हा कर्मदंड अथवा कायदंड आहे व प्राणायाम हा मनोदंड आहे. अल्प भोजन करणें हा कर्मदंड आहे, असें एका स्मृतींत म्हटलें आहे. पण हे आंतर तीन दंड परमहंसालाही आहेत. कारण प्रजापतिस्मृतींत पितामहांनीं तसें स्पष्टपणें सांगितलें आहे. तात्पर्य मौन, प्राणायाम व चेष्टाराहित्य हीं तीन, वाणी, मन व शरीर यांचें क्रमानें दमन करीत असतात; ह्मणून त्यांस जसें दंड ह्मणतां येतें त्याप्रमाणें अज्ञान व त्याचें कार्य यांचें दमन करणाऱ्या ज्ञानासही दंड ह्मणतां येतें. यास्तव अशा प्रकारचा ज्ञानदंड ज्या परमहंसानें धारण केला असेल तोच मुख्य एक दंडी होय. मग काष्ठदंड धारण करण्याचें कारण काय ? ह्मणून ह्मणाल तर सांगतों. ज्ञानदंड मनोमय असतो. त्यामुळें चित्त विक्षिप्त झालें असतां त्याचें स्मरण होत नाहीं. तें व्हावें ह्मणून हा बाह्य काष्ठदंड सांगितलेला आहे. पण हें शास्त्ररहस्य न जाणतां केवळ वेषानेंच पुरुषार्थसिद्धि होईल, असें समजून ज्या परमहंसानें काष्ठदंड धारण केलेला असतो तो मरणो-

त्तर असह्य क्लेश भोगितो. कारण परमहंसाचा पूज्य वेष पाहून धार्मिक श्रद्धाळू, हा ज्ञानी आहे, असें समजतात व त्याला आपापल्या गृहीं पुढीस बोलावून त्याचा उत्तम प्रकारें सत्कार करितात. पण त्यामुळें तो वेषधारी यति गोड गोड घांस खाऊन जिह्वालंपट होतो; तो वर्ज्यावर्ज्याचा विचार करीत नाहीं; व त्यामुळें शेवटीं महादोषी व दुःखी होतो. आतां स्मृतिशास्त्रांत 'संन्यासी अन्नदोषानें दोषी होत नाहीं' 'चारी वर्णाच्या लोकांच्या घरीं संन्याशानें भिक्षा मागावी' इत्यादि जें सांगितलें आहे, तें पूर्ण ज्ञान्यास उद्देशून आहे. त्यामुळें अज्ञ संन्यासी मनसोक्त वागूं लागल्यास त्यांस नरकप्राप्ति होणें योग्यच आहे. ह्मणूनच अज्ञ संन्याशांच्या भिक्षेविषयीं मनूनीं असे नियम सांगितले आहेत.–

"ज्योतिष, हातपहाणें, शिकविणें, वाद करणें, औषधोपचार करणें इत्यादि उपायांनीं संन्याशानें भिक्षा कधींही मिळवूं नये, एकवेळच भिक्षा मागावी. उगीच पुष्कळ घरें फिरत बसूं नये. कारण भिक्षेमध्यें आसक्त झालेला यति विषयांमध्येंही आसक्त होण्याचा संभव असतो." इत्यादि.

ज्ञानाभ्यासी परमहंसाविषयींही "परमहंसानें एकवेळ किंवा दोन वेळां भोजन करावें. सारांश ज्याच्या योगानें ज्ञानाभ्यासास बाध येणार नाहीं, असें त्यानें आचरण करावें" असें त्यांनीं ह्मटलें आहे, यास्तव ज्ञानदंड व काष्ठदंड यांच्यामधील अंतर जाणून ज्ञानदंडाचाच जो आश्रय करितो तोच मुख्य परमहंस होय; असें जाणावें.

असो; अशा त्या ज्ञानदंडयुक्त व काष्ठदंडरहित परमहंसाची इतर चर्या कशी असावी, तें परमहंस–उपनिषदाच्या उत्तर भागांत सांगितलें आहे. "त्यानें आशांबर असावें." आशांबर ह्मणजे दिगंबर, अर्थात् दिशा हेंच ज्याचें वस्त्राच्छादन असतें तो दिगंबर (नग्न) होय. 'गुडघ्यांच्यावर व नाभीच्या खालीं एक वस्त्र नेसून व दुसरें पांघरून घरोघर भिक्षेस जावें' असें जें स्मृतींत सांगितलें आहे, तें अयोगी परमहंसाविषयीं आहे. "त्यानें कोणाला नमस्कार करूं नये." स्मृतींत 'आपल्याहून जुन्या संन्याशास व धर्मतः तुल्य असणारास मात्र प्रणाम करावा' असें जें म्हटलें आहे, तेंही वर सांगितलेल्या अमुख्य संन्याशाकरितांच होय. "त्यानें गया इत्यादि तीर्थस्थळींही पितरांस उद्देशून पिंडादिकांचें दान करूं नये." वर दुसऱ्यांनीं केलेली निंदा सहन करावी, असें म्हटलें आहे. येथें 'त्यानें स्वतः कोणाची निंदा करूं नये' असें सांगितलें आहे. "या मुख्य परमहंसानें कोणत्याही प्रकारचा निरोध बाळगूं नये." 'भिक्षाटन, जप, शौच,

स्नान, ध्यान व देवपूजन हीं सहा यतीनें अवश्य करावींत.' असें जें शास्त्र-वचन आहे तें मुख्य यतीकरितां नव्हे, तर पूर्वोक्त गौण यतीकरितांच आहे. यास्तव "यानें कोणाचें आवाहन करूं नये व विसर्जनही करूं नये. त्याचप्रमाणें यानें मंत्र म्हणूं नयेत. ध्यान व उपासनाही करूं नये." इष्ट देवतेचें एकदां स्मरण करून तोच प्रवाह चालू ठेवणें हें ध्यान व वारंवार स्मरण करून चित्त स्थिर करणें ही उपासना होय. ज्याप्रमाणें योगी परमहंसाला स्तुति, निंदा इत्यादि लौकिक व्यवहार नाहीं किंवा ज्याप्रमाणें देवपूजादि धर्मशास्त्रीय व्यवहारही नाहीं त्याप्रमाणें लक्ष्यत्वादि ज्ञानशास्त्रव्यवहारही नाहीं. साक्षि-चैतन्य हें 'तें तूं आहेस' या महावाक्यांतील तूं या पदाचें लक्ष्य आहे. देहादिविशिष्ट चैतन्य हें तूं या पदाचें वाच्य आहे, लक्ष्य नव्हे. तेंच वाच्य चैतन्य आपल्या शरीरांत अहं (मी) व दुसऱ्यांच्या शरीरांत त्वं (तूं) या व्यवहारास योग्य होतें. लक्ष्य व वाच्य अशा या दोन्ही प्रकारच्या चैतन्यानें जें युक्त असतें तें सर्व चैतन्यभिन्न जड जग होय. पण योग्याचे चित्तांत अशा प्रकारचा कोणताही विकल्प नसतो; कारण त्याचें चित्त सर्वदां ब्रह्मामध्यें गढून गेलेलें असतें. "त्याचप्रमाणें त्यास वसतिस्थान नसतें." कारण नियमितपणें निवास करण्याकरितां जर त्यानें एकादा मठ संपादन केला तर 'तो माझा आहे' असें वाटणें व त्याची हानि किंवा वृद्धि झाली असतां दुःख व हर्ष यांच्या द्वारा चित्त विक्षिप्त होणें साहजिक आहे. एवढ्याकरितांच गौडपादाचार्यांनींही 'चलाचलनिकेतश्च' असें म्हटलें आहे. यतीला मठ संपादन करणें जसें अनुचित आहे, त्याचप्रमाणें भिक्षा, आचमन इत्यादिकांकरितां सुवर्णाचीं, रुप्याचीं, तांब्याचीं इत्यादि धातूंचीं पात्रेंही जवळ ठेवणें अयोग्य आहे. यमस्मृतींत यतींनीं धातुपात्रें घेऊं नयेत, असें सांगितलें आहे. मनुस्मृतींत 'तुंबा, दारुपात्र, मृण्मयपात्र किंवा वेळूचें पात्र यतींस उक्त आहे.' असें म्हटलें आहे. 'स्वतः काढलेल्या किंवा खालीं गळून पडलेल्या पानांवर यतीनें भोजन करावें. पण वड, अश्वत्थ आणि करंज यांच्या पानावर भोजन करणें निषिद्ध आहे. यतीनें आपत्कालींही कांस्यपात्रांत भोजन करूं नये. त्याचप्रमाणें सुवर्ण, रौप्य, ताम्र मृण्मय, जस्त, कथिल इत्यादिकांच्या पात्रांतही त्यानें भोजन करणें प्रशस्त नाहीं;' असें बौधायनांनीं सांगितलें आहे. मनुस्मृतींत 'कोणाचेंही सहाय न घेतां यतीनें एकट्यानेंच पर्यटन करावें.' असें विधान केलें आहे. त्यावरून

शिष्यसमूह, लोक इत्यादिकांचा संग्रह करूं नये, हें उघड होतें. मनुस्मृतीचे टीकाकार मेधातिथि यांनीं थोडक्यांत यतिधर्म असे सांगितले आहेत.—

" आसन, पात्रलोभ, संचय, शिष्यसंपादन, दिवसा निद्रा घेणें व व्यर्थ भाषण, हीं सहा यतींचीं बंधनें आहेत. १ वर्षर्तूचे दोन महिने सोडून बाकीच्या दिवसांत, गांवांत एका दिवसाहून अधिक राहणें व पुरांत पांच दिवसांहून अधिक रहाणें हें आसन होय. २ वर सांगितलेल्या पात्रांतील उक्त व अनुक्त अशा कोणत्याही पात्राचा भिक्षासमयीं अथवा भोजनसमयीं लोभ धरणें हा पात्रलोभ होय. ३ दंड इत्यादि अवश्य वस्तूंतील एकेक वस्तु जवळ असतांना, पुढें उपयोगीं पडेल या आशेनें, दुसरा दंड, दुसरी शाटी इत्यादि घेऊन ठेवणें हा संचय होय. ४ शुश्रूषा, लाभ, पूजा, यश किंवा कृपा यांतील कोणत्या तरी निमित्तानें शिष्य जमविणें हा शिष्यसंग्रह होय. ५ प्रकाशमय विद्या हाच दिवस व अप्रकाशमय अविद्या ही रात्रि असें ह्मणतात. यास्तव विद्याभ्यासाकडे दुर्लक्ष करणें हाच दिवास्वाप ( दिवसा झोंप ) आहे. ६ आत्म्याविषयीं भाषण करणें, भिक्षा मागणें, देवाची स्तुति करणें व मार्ग विचारणें यावांचून इतर सर्व भाषण वृथालाप आहे. " इति ।

शिष्यसमूह बाळगूं नये इतकेंच नव्हे तर त्यांचें दर्शनही करूं नये. कारण त्यांस भेटणें, बोलीभाषण करणें हें सर्व बंधकारक आहे. यतींना ज्यांचा त्याग करणें अति अवश्य आहे अशा आणखी कांहीं वस्तु व क्रिया मेधातिथींनीं सांगितल्या आहेत. त्या अशा:—

" स्थावर, जंगम, बीज, सुवर्णादि धातु, विष, व आयुध यांचा यतीनें मूत्राप्रमाणें किंवा विष्ठेप्रमाणें संग्रह करूं नये. रसायन, कर्मवाद, ज्योतिष, क्रयविक्रय ( व्यापार, देवधेव ) व नानाप्रकारचीं शिल्पें यांस त्यानें परस्त्रीप्रमाणें वर्ज करावें. " इत्यादि.

सारांश परमहंस योग्यास लौकिक व वैदिक व्यवहारांत जें जें बाधक असेल त्याचा त्याचा त्याग करण्याविषयीं सांगतलें आहे. पण बाधक काय काय आहे, हें कसें समजणार ? असा प्रश्न कोणी करील, असें समजून श्रुति अत्यंत बाधक काय आहे, तें सांगून तें वर्ज आहे, असेंही ह्मणते—" भिक्षूनें सुवर्णाकडे अभिलाषानें व आदरानें अवलोकन केल्यास तो तात्काल ब्रह्महा होतो. " कारण सुवर्णामध्यें चित्त आसक्त झाल्यामुळें त्यास संपादन करण्याकरितां व त्याचें रक्षण करण्याकरितां प्रयत्न करणारा तो ' तें व्यर्थ

नाहीं; उलट सुवर्ण हा फार उपयोगी पदार्थ आहे. ' असें सिद्ध करण्यास प्रवृत्त होईल. पण सर्व प्रपंच मिथ्या आहे, या वेदांतसिद्धांतास दोष दिल्यावाचून त्याला सुवर्णाचें समर्थन करितां येणार नाहीं. ह्मणून त्याला प्रपंच सत्य आहे, असेंच मानावें लागणार, हें उघड आहे. पण तसें केल्यानें शास्त्रसिद्ध अद्वितीय ब्रह्म त्यानें नाहींसें केल्यासारखें होतें व त्यामुळें तो ब्रह्महा ठरतो. स्मृतीमध्येंही–

ब्रह्म नास्तीति यो ब्रूयाद्द्वेष्टि ब्रह्मविदं च यः ।
अभूतब्रह्मवादी च त्रयस्ते ब्रह्मघातकाः ॥ १ ॥
ब्रह्महा स तु विज्ञेयः सर्वधर्मबहिष्कृतः ।

असें ह्मटलें आहे. ब्रह्म नाहीं असें जो ह्मणतो; ब्रह्मवेत्त्याचा जो द्वेष करितो; व ब्रह्म साध्य आहे, सिद्ध नाहीं, असें जो सांगतो ते तिघेही ब्रह्मघातक आहेत. ब्रह्माचा तिरस्कार करणारा ब्रह्महा सर्व धर्मांपासून बहिष्कृत केलेला आहे, असें समजावें. अभिलाषपूर्वक सुवर्णास स्पर्श केल्यास भिक्षु पतित व म्लेच्छसदृश होतो. कारण ' बुद्धिपूर्वक रेतःसेक व द्रव्यसंग्रह केल्यानें भिक्षु पतित होतो. ' असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें भिक्षूनें अभिलाषपूर्वक सुवर्ण ग्रहण केल्यास त्यानें देहेंद्रियादिकांच्या साक्षीस, अर्थात् चिदात्म्यास, मारिल्यासारखें होतें. कारण त्याच्या स्वाभाविक असंगत्वाचा तिरस्कार केल्यावांचून मी या द्रव्याचा भोक्ता आहें, असें त्यास समजतां येणें अशक्य आहे. व " मी भोक्ता आहें " ही विपरीतभावना सर्वपापरूप आहे, असें सांगितलें आहे. ' आत्मा एका प्रकारचा असतांना त्याला त्याच्या अगदीं उलट जो समजतो, त्या आत्म्याचा अपहार करणाऱ्या चोरानें कोणतें पाप केलें नाहीं ? ' असें सनत्सुजात प्रकरणांत म्हटलें आहे. शिवाय अशा आत्मघाती लोकांस ' ज्यांत सुखाचा लेशही नाहीं व जे अनेक दुःखांनीं भरलेले आहेत, असे लोक मिळतात ' असें ईशावास्योपनिषदांत म्हटलें आहे. यास्तव सुवर्णाचें अभिलाषपूर्वक दर्शन, स्पर्शन व ग्रहण वर्ज करावें. फार काय पण त्याचा वृत्तांत ऐकणें, त्याचे गुण सांगणें, त्याची देवघेव करविणें इत्यादि सर्व व्यवहारही दोष उत्पन्न करणारे आहेत. यास्तव त्यांचाही भिक्षूनें सर्वथैव त्याग करावा. सुवर्ण वर्ज केल्यानें कोणतें फळ मिळतें तें श्रुति सांगते.—" त्याचा त्याग केला असतां मनांतील सर्व

इच्छा आपोआप निघून जातात. " कारण पुत्र, स्त्री, क्षेत्र, गृह इत्यादि सर्व सुवर्णमूलक आहेत. तें जवळ नसलें तर यांतील एकही वस्तु प्राप्त होत नाहीं. अर्थात् त्यांच्याविषयीं मनांत कितीही जरी इच्छा असल्या तरी सुवर्णांच्या अभावीं त्या मनांतच लीन होतात; इच्छा निवृत्त झाल्या ह्मणजे प्रवृत्ति खुंटते; त्यामुळें दुःखप्रसंगीं होणारा उद्वेग व सुखाविषयीं स्पृहा होत नाहीं. पहिल्या प्रकरणांत स्थितप्रज्ञाचें वर्णन करितांना याविषयीं बरेंचसें सांगितलें आहे. ऐहिक सुखदुःखांचा असंभव झाल्यानें पारलौकिक विषयांविषयींचें प्रेमही कमी होतें, कारण ज्याला ऐहिक सुखाची स्पृहा असते तो त्याच सुखाच्या दृष्टान्तानें पारलौकिक सुखाचें अनुमान करून त्याविषयीं अभिलाष धरितो; असा सामान्य नियम आहे. त्यामुळें ऐहिक विषयांविषयीं निःस्पृह असणारा पारलौकिक विषयांविषयींही निःस्पृह असणें योग्यच आहे, आणि असें झालें असतां " दोन्ही लोकांतील अनुकूल व प्रतिकूल विषयांवर त्याचा क्रमानें लोभ व द्वेष नसतो. " ह्मणजे तो अनुकूल असलेल्या वस्तूंवर प्रेम करीत नाहीं व विरुद्ध वस्तूं विषयीं किंवा विरुद्ध आचरण करणाऱ्या पुरुषांविषयीं द्वेष धरीत नाहीं. याप्रमाणें रागद्वेषशून्य होऊन जो पुरुष सदां आत्म्याच्या ठायीं स्थिरचित्त होऊन रहातो " त्याच्या सर्व इंद्रियांची गति बंद होते. " इंद्रियांची प्रवृत्ति बंद पडली असतां निर्विकल्पसमाधीस केव्हांही विघ्न येत नाहीं.

असो; परमहंस योग्याचा मार्ग व स्थिति यांचें वर्णन करून व सुवर्णनिषेधानें त्याचेंच अधिक स्पष्टीकरण करून परमहंसोपनिषदांत शेवटीं विद्वत्संन्यासाचा उपसंहार असा केला आहे—" आणि वेदांतांत, जें ब्रह्म परिपूर्ण, आनंद व बोधरूप म्हणून ह्मटलें आहे तेंच मी आहें, असा सर्वदां अनुभव घेत तो योगी परमहंस कृतकृत्य होतो. " स्मृतींतही ' ज्ञानामृतानें तृप्त व कृतकृत्य झालेल्या योग्यास कांहीं कर्तव्य नसतें व ज्याला कांहीं कर्तव्य असतें तो तत्त्ववेत्ताच नव्हे ' असें ह्मटलें आहे, व त्याचा उल्लेख वरही एक दोनदां केला आहे.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत जीवन्मुक्तिविवेकसाराचें पांचवें विद्वत्संन्यासप्रकरण समाप्त झालें.

**येथें हा ग्रंथही समाप्त झाला.**

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**